पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद

# २६



# ताराबाई आणि संभाजी

१७३८—१७६१

[किंमत—२ रुपये १० आणे किंवा ६ शिलिंग ३ पेन्स]

संपादक—गो. स. सरदेसाई, बी. ए.

# *TARABAI AND SAMBHAJI*

## (*1738–1761*)

Under this section many papers have been brought together, which in reality form a supplement to Selection 11, already published under the heading "Shahu's relations with Sambhaji of Kolhapur". Udaji Chavan is a permanent factor, playing the part of an opportunist in the affairs of the period, and making the best of any opportunity that offers, now joining the Peshwa and the next moment opposing him. In fact, the position of many of the older members of the Maratha Confederacy became very embarrassing after the death of Shahu: The Chhatrapati, Tarabai and the Peshwa constantly disagreed, and each started his own independent faction. It was extremely precarious for the many neutral sardars to join either party, as they were certain to be crushed out of existence by the power that eventually proved successful. This accounts for the vacillating attitude of men like Babuji Naik, the Pratinidhi, Murarrao Ghorpade and others. One sees from these papers also how skilfully the Peshwa managed to checkmate his various rivals and effect a kind of order at that critical juncture. Sambhaji and his Rani Jijabai are seen struggling to maintain their prestige against the all-engrossing Peshwa, who refused to tolerate irresponsible rulers in the midst of the state. The letters of Bhagwantrao Amatya are an appropriate commentary upon the chaotic state of the country, shewing as they do, the abject condition to which this son of a trusted minister of Shivaji was reduced. Bhagvantrao is a confirmed pessimist. Ramchandra Bawaji, Vyankatrao Moreshwar and Banaji Madhav are some of the other more prominent news-writers in this selection and record information of the utmost value to the student. Chimnaji Bapuji is an otherwise unknown sardar (probably a Saraswat), who was faithful to the Peshwa's cause and whose letters bring to light a campaign of which little was known hitherto. The Pratinidhi and the rulers of Ichalkaranji and Sawantwadi also take their share in the troubles and confusions of the time. Sambhaji died childless on 18th December 1760 but his queen Jijabai managed to declare that her co-wife Kusabai was *enceinte* and even reported the birth of a supposititious heir.

This selection presents many more letters pertaining to Tarabai's activities and other allied topics. Tarabai, who acts a leading *role* in Maratha history for over 60 years, is a remarkable figure. She was an able but ambitious and obstinate woman, and takes a worthy place alongside Ahalyabai Holkar and Laxmibai of Jhansi in the portrait gallery of Maratha women who have proved themselves to be capable and energetic rulers. She was the daughter of Hambirrao Mohite and was married while very young to Rajaram. She was besieged in Jinji with her husband, and practically ruled the Maratha kingdom after his death for some twelve years. She was confined by Sambhaji at Kolhapur about the year 1714 and from 1730 onwards took up her residence at Satara with Shahu although even

there she was a virtual prisoner. The death of Shahu gave her the longed-for opportunity of once more wielding political power; but the Peshwa proved more than a match for her. Throughout her chequered career she carried on intrigues and a voluminous correspondence with most of the prominent statesmen of her day. The Shahu Daftar contains many letters addressed to her, a few of which are here presented by way of specimens to illustrate her activities. They are by no means exhaustive. The Peshwa gradually got the better of her, and so completely outmanoeuvred her as to leave hardly a vestige of power in her hands. She died on November 9, 1761.

These letters supply important details of the various trials and difficulties through which the Peshwa and his helpmates found it possible to overcome their opponents and obtain a free scope for the expansion of the Raj both in the North and the South. Babuji Naik and his ambitions in the Karnatak were gradually subdued; Tarabai was slowly conciliated; Murarrao Ghorpade was quickly made inocuous; and the Nizam was checked. In all these affairs the wonderful diplomacy of the Peshwa, his patience and perseverence, his circumspection and controlling powers are clearly discernible. For a close study of the complicated situation the full and comprehensive account presented in these papers will surely be very helpful. Letters 13-29, 156, 162, 187, 229, 232, 240 refer to one topic and should be read together. The map given in Selection No. 11 may be advantageously used for places mentioned in this Selection also.

No. 1] [27-4-1738?

श्री

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री माहादोबास. प्रति मल्हार तुकदेव कृतानेक आशीर्वाद उपरी. येथील कुशल ताा छ १८ मोहरम मुाा भिलवंडीची वाडी यथास्थित असे विशेष. राजश्री स्वामीची व राजश्री उदाजी चव्हाणाची भेटी छ मारी जाली तें आद्यंत वर्तमान तीर्थरूपाचे पत्री लिहिले आहे, त्यावरून कळो येईल. बहुत काये लिहिणे हा आसीर्वाद.

¶*Mahadoba Purandare is informed by Malhar Tukdeo of the visit of Udaji Chavan to King Shahu.*

---

No. 2] [24-7-1738?

श्री

**तीर्थरूप राजश्री राऊ तथा**
**राजश्री आपा स्वामीचे सेवेसी**

अपत्यें मल्हार तुकदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ १७ रबिलाखरपर्यंत मुाा कोा म्हैसाल स्वामीच्या आसीर्वादें-करून यथास्थित असे विशेष. राजश्री बाबूराऊ माहादेव व त्रिंबकराव लक्ष्मण यांस पागेच्या घोडियासहित स्वामीनी राजश्री तुबाजीपंतासमागमे चव्हाणाचे मसलतीस पाठविलें. त्या दिवसापासून या उभयेतानी व बारगिरानी स्वामि-सेवेंत कांही अंतर पडो दिल्हें नाहीं. सोनी वगैरे ठाणी चव्हाणाकडील हस्तगत जालीं, तेव्हां स्वामीच्या पागेच्या लोकानी श्रम बरेच केले. त्यास बारगिरांचा हिसेब कितेब होणे यास्तव बाबूराव माहादेव सेवेसी आले आहेत. सविस्तर सेवेसी निवेदन करितील, त्यावरून लोकांची बेगमी करणार स्वामी समर्थ आहेत. विदित जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना. राजश्री बाबूराव माहादेव याणी घोडियाची निगादास्त कस्त मेहनत करून केली. आपणहि पाहिली. याणे वडिलांचे खानाजाद म्हणविलें आहे. याची शरम वडिलास आहे. सैद सला सैला[१] आणखी बारगिरानी कामकाज केले आहे त्यास बकसीस द्यावे लागते. महाराज राजश्री स्वामीसमीप दो चौ ठाणियास बरी चाकरी केली, स्वामी बहुत खुसवख्त जाहाले. तेव्हा आपणास पुसिले की हे लोक कामाचे

---

१ हा शब्द दुबार पडलेला दिसतो.

आहेत आणि पहिले कोणाकडे होते ? तेव्हा आपण सांगितले की रा भावसिंगराव ठोके याजकडे होते. माहाराज बोलिले आसीया लोकाचे चालवावे. रा बाबूराव माहादेव यांस आपण रागे येतील की तूं का आलास ? तर आपण बारगिराचे हिसेबाबदल रवाना केलेल हा यत नव्हा परंतु आपण निरोप दिल्हा. हिसेबाची ( ) करून लोकाची बेहबुधी होये तो केला पाहिजे. रा बाबूराव म्हाहादेव याणे लोकास दिलदिल्हासा देऊन समजाविले. आपण श्रीमंताकडे जातो. मग श्रीमंत आज्ञा करितील तेणेप्रमाणे वर्तणूक करून. सैदसला यास घोडे पागेत नाहीं. चाकरीचा माणसास घोडे पाहिजे. घोडे द्यावयाची आज्ञा केली पा. रा बाबूरायास लौकर रवाना करणें. तेथें घोडियाची बचिता (?) होईल. त्याज-वाचून दुसरियाच्या पागा नेणे असेल तर तैसेंच लिहिणे. घोडियाचा सामान ती वरसाचा जाहला आहे. मोड तोडा गेंद जीन खोड * * * सामा-नाची आज्ञा * * * होत नाही. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. रा बाबूराव यास काये ते आज्ञा करावी.

¶*A letter from Malhar Tukdeo to Bajirao and Chimaji Appa referring to the expedition against Udaji Chavan, and recommending the services of Baburao Mahadeo, Trimbak Lakshman and Said Sala to their attention.*

---

*No. 3*] [*28-8-1738?*

पा छ २३ जमादिलौवल

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ व तथा**
**राजश्री आपा स्वामींचें सेवेसी**

विनंती. स्वामींनी पाटसच्या मुकामीहून पत्रे पाठविली ती पावली. लिहिले वर्तमान कलले. राजश्री नारबावा व राजश्री येमाजीपंत वगैरे राजश्री उदाजी चव्हाण यासी अणावयासी गुरुवारी दो प्रहरा गेले ते कामेरी नजीक रिहिमतपूर येथें गेले, तों वर्तमान त्यास आले की, उदाजी चव्हाण याणी सावलेजेस वेढा घातला होता त्यास गाव घेतला, व पोलाचे कबिले होते ते धरिले, आणि सात आठसे राऊत सेंडे[1] निवडून धावले आहेत. कोणीकडे गेले हे न कले यैसे वर्तमान आले. यास्तव तेथे मुकाम करून उदाजी चव्हाण याजकडील रामाजी-पंत व पत्रे व जासूद पुढे रवाना केले, त्याचे उतर येईल व कोठें आहेत ते ठिकाण लागेल, तेव्हां पुढे जावे यैसा विचार केला आहे. पुसेसावलीस जाऊन

---

१ शेलके,

राहिले आहेत. पुढे होईल वर्तमान ते लेहून पाठऊ. विदित जाहले पाहिजे. येविसीचे वर्तमान पहिलेहि स्वामीस लेहून पाठविले आहे त्यावरून विदित जाहले असेल. स्वामींनी कृष्णातीराहून चिठी लिहिली होती, की उदाजी चव्हाण याच्या कारकुनास काही सागणे त्यावरून त्याचा शोध केला, परंतु ते राजश्री नारबावाबराबर गेले. स्वामीस कळावे म्हणून लिहिले असे हे विज्ञापना.

¶*Bajirao and Chimaji are informed that Narbawa and Yamajipant have proceeded to summon Udaji Chavan (for an interview with Shahu), who, however, has marched off devastating and capturing several places on his way.*

---

*No. 4*] [*1738?*

**श्री**

**राजश्री चिमणाजीपंत आपा गोसांवी**

**यांसि**

ॐ सकलगुणालकरण अखडितलक्ष्मीलआलकृत राजमान्य श्री उदाजी चवाण हिमतबहादर दंडवत् विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय निजानंद-लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. पत्र पाठविलें ते उतम समयी प्रविष्ट होऊन लखनार्थश्रवणें परम संतोष. आम्हाकडील साहित्याविसी राजश्री जानोजीराव निंबालकर यास जे लिहिणें ते लिहिले आहे म्हणोन लि॥; तर सर्वप्रकारें आम्हास आपण वडील आहां. आम्ही कोठें आसिलों तरी आपल्या पदरींचे आहों. इतर पदार्थ नाही. याच अन्वयें निरंतर पत्रद्वारे सांभाल करीत असिले पाहिजे. विशेष काये लिहिणे ? उपरोधिक प्रसंगहि दिसतो. कृपा वर्धमान असो देणें हे+ वीनंती.

¶*Udaji Chavan assures Chimaji Appa of his loyalty.*

---

*No. 5*] [*1738?*

**श्रीगजानन**

**पुरवणी राजश्री नाना स्वा-**
**मींचे शवेसी**

विनंती उपरी. राजश्री चिमाजी आपा यांणी राजश्री उदाजी चव्हाण हिमतबहादर यांकडे बालाजी विश्वनाथ काणे यांस पाठविले आहेत. त्यासमागमे येथील

---

\+ उदाजी चव्हाणाचें अक्षर बाळबोधींत.

साहित्याविसीहि पत्रे लिहिली होती. त्यास अगत्य जाणून तेहि काली सिरोलास आले. त्यांची आमची भेटी जाहाली. कितेक मायेममतेचा विचार बोलिले. सेनापति व ते येका विचारें राहावयाची तजवीज आहे. याउपरीहि आणखी येथील साहित्याविसी आपाचे नावें आपण उदाजी चव्हाण यांस पत्र ल्याहावें. सेवेसी श्रुत होये, बहुत काये लिहीणें हे विनती.

¶*Nana Purandare is informed of the good relations existing between Udaji Chavan and the Senapati. Kane was deputed to Chavan by Chimaji Appa.*

---

*No. 6*] [*1738?*

## श्रीरामचंद्र

### राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री धोंडोपंत स्वामी गो।

पोष्य भगवंतराव रामचंद्र कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम श्रावण वद्यपर्यंत जाणून स्वकुशललेखन केलें पाहिजे विशेष. तुम्ही * * याजबराबरी पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन लिहिलें वृत कळों आलें. राजश्री अंताजी बलाल यांस पत्र लिहिलें तेंहि त्याहीं विदित केलें. घोडियाविसीं लिहिलेंत तर तुम्हापेक्षां विशेष तें काय? पागेची घोडीं रा। अंतोबास नेऊन दाखविलीं आहेत. त्यांच्या विचारास येईल तो घोडा त्यांच्या स्वाधीन करून. वरकड राजश्री महादाजीपंताचा प्रसंग लिहिला तरी कृष्णास्नानाच्या उदेशें त्यांही निरोप घेऊन गेले आणि परस्पर लस्करांत जावें ऐसे काय होतें? आपण येविशीं च्यार गोष्टी त्यांस सांगोन समाधान करून पाठविले पाहिजेत. त्यांचें सर्व प्रकारें आम्हांस आवश्यक आहे. मौजे तिसंगी व मौजे वेतवडेविसी तुम्हांस लिहीलें आहे त्याप्रमाणें धण्यास विनंती करून राजपत्रें घेऊन पाठवणें. त्याप्रातें[1] आमची खेडीं गांव मुकासे आहेत, वतनें आहेत, त्याची राजपत्रे करून घेणें. जिलेची राजपत्रें पेसजी प्रा। सुभे व महालास व साहित्यपत्रे घेऊन पाठवणें. यादी पाठविली आहे त्याप्रा। पा।. श्रीरामचंद्राचे घर जतन होये, वडिलाची कीर्ति राहे, आम्हास लोक बरे म्हणत येसा विचार करणे. कृपा असो दीजे हे विनंती. मलारराऊ पळून हुफैलन (?) गेला, त्याला समाधान करून येक सोवत लाऊन पा।. त्याची मातुश्री श्रमी होत आहे. हे विनंती[2]

¶*A request to Dhondopant Purandare from Bhagawantrao Amatya for the return of his Vatans. The date of this letter must be previous to 1755, the year of the writer's decease.*

---

१ येथून अक्षर लेखकाचें. २ 'यादी गांव मुकासे रा। बाजीराव प्रधान' व पुढें ८ गांवांचीं नांवें याच कागदावर खालीं लिहिलीं आहेत. त्यावरून वरील कागद बाजीरावाचे वेळचा दिसतो.

No. 7] [Recd. 21-8-1739 ?

पाा छ २९ जमादिलाखर

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री
राऊ व तथा राजश्री आपा
स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. राजश्री येसाजी सिंदे येथे येऊन बसले आहेत. त्यांच्या कारभाराचा काही मजकूर कोणी करीत नाही आणि राजश्रीहि मजकूर करीत नाहीं. सांप्रत स्तब्धच कारभार आहे. त्यांच्या चितांत आहे की, भलते निमित्य करून निरोप घेऊन जावे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

¶*Bajirao and Chimaji Appa are informed of the arrival of Yesaji Sindia at the court of Shahu, who does not however attend to his affairs. (Is this Yesaji the brother of Jijabai of Kolhapur ?)*

---

No. 8] [Recd. 19-11-1739 ?

छ २८ सावान

श्रीरामचंद्र

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी-[1]
आलंकृत राजमान्य राजश्री बाजीराव
पंडित स्वामी गोसावी यांसी

पोष्य भगवंतराऊ रामचंद्र कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत गेले पाहिजे विशेष. आपण राजश्री बालाजीपंत-यांजबराबर पत्रे पाठविली ती पावली. त्याजउपरी गोंदजी जाधव याजबाा पत्रें पाा तीहि पावली. लिहिले वर्तमान कलों आले. राजश्री संभाजी पडवल यांस फार दिवस लागले. उत्तरे लवकर पाठविलीं नाही, याजस्तव चितांत काही विपर्यास आला असेल, तरी राजद्वारचा विचार दिरंगाचा आहे हे आपणास परस्पर श्रुत जाहालेंच असेल. येथील बोली सत्यमिथ्य कलावी, तडीस कोणता विचार लागतो हें पाहावे, दढतर विचार होईल तो आपणास लिहून पाठवावा, या अर्थे विलंब लागला; दुसरा विचार नाही. आपली दया आम्हांवर अकृत्रिम असतां आपणाजवल तफावत करावी अथवा वैलावर जावे[2] असा अर्थ नाहीं.

---

१ याच मजकुराचें दुसरें पत्र चिमाजी आपास लिहिलेलें आहे. २ वेळ घालवावा, विलंब करवावा.

आपले कृपेची जोड केली आहे तेथें किमपि विनाभाव होणार नाही. राजश्री बालाजीपंत आले यांणी सविस्तर आपले ममतेचा व दयेचा अर्थ सांगितला त्यावरून बहुत समाधान पावलों. आम्हीं बावडेयाहून राजश्री छत्रपतीच्या दर्शनास कोलापुरास आलों. दर्शन जाहले. पनरा दिवस क्षेत्रवास केला. धणियांची आज्ञा घेऊन मागती स्वस्थलास गेलों. राजश्री येसवंतराऊ गायकवाड आपणाकडून येथें आले त्यांचें दर्शन जाहलें. पुढें होईल विचार तो लिहून पाठऊं. राजश्री संभाजी आंगरे याकडील भले माणूस आम्हाकडे आले आहेत, येविसीचा साकल्यार्थ राजश्री चिमाजी आपा यासी लिहिला आहे त्यावरून विदित होईल. बहुत काये लिहिणें? +आम्ही आपले पदरी पडिलो आहो. मन:पूर्वक दया केली पाहिजे. कर्जदार जाले आहो. घर संसार सरदारी आपले पदरी आहे, यैसे समजोन सारथ्य करावें. सर्व सकट आपणास अथवा श्री देवास आहे. कृपा करावी हे विनंती.

¶*Bhagwant Ramchandra Amatya assures Bajirao of his sincere devotion to him.*

---

*No. 9*] [*10-1-1740 ?*

छ २७ सवाल

**श्री**

**श्रीमंत राजश्री आपा स्वामीचे सेवेसी**

पोष्य जिवाजी खंडेराव कृतानेक दंडवत प्रणाम विनंती उपरी. येथील कुशल तागाईत छ २१ सवालपर्यंत येथास्थित असें विशेष. फौजेची रवानगी विठ्ठल शिवदेव यांजबराबर केली. सरलष्कर व संभुसिंग घोगांव बोरगावावरी आले आहेत. उदाजी चव्हाण शिरोळास आहे हें वर्तमान तपासिलवार राजश्री माहादोबा लिहितील त्यावरून कळेल. वरकड अर्थ स्वामीचे आज्ञेप्रमाणें राजश्री स्वामीस विदित करणें तो करून विदित जालें पाहिजे. राजश्री येशवंतराव यांजकडे बाबूरायाबराबर कजिया होता, त्यास राजश्री राऊ येथें आले ते समयीं त्यांणीं कजिया चुकऊन विल्हे लाऊन घेतले. ते स्वामीस विदित जालेंच असेल; ऐशियास पूर्वी स्वामीची कृपा मशारनिलेच्या ठायीं विशेषात्कारें होती. याचीहि निष्ठा अकृत्रिम आहे. आपण चालवावयाचें तें चालवीतच होते. प्रस्तुत मशारनिले आपले दर्शनास येऊन पूर्ववत्प्रमाणें कृपा संपादून

---

+ येथून अक्षर निराळें, लेखकाचें.

घ्यावी या विचारें स्वामिसंनिध येत आहेत. तरी स्वामिनीं पूर्वीपेक्षाहि याजवरी दया करावी. हे स्वामीचे कार्याचे आहेत; यांजपासून सेवेसी किमपि अंतर होणार नाहीं. यांचे गांवचें व वर्षासनाचें चालतें करावया आज्ञा केली पाहिजे. बहुत काय लिहिणें ? कृपा असो दिल्ही पाहिजे हें विनंती.

¶*Jivaji Khanderao to Chimaji Appa, recommending for favourable consideration the affair of Yashvantrao (Potnis ?).*

---

*No. 10*] [*Recd. 28-6-1738 ?*

छ २१ रावल

**श्री**

**पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामीचे सेवेसी**

विनंती उपरी. अकिवटास मोर्चे लाविले आहेत तसेच आहेत. मोर्चे पुढें कांही चालिले नाहींत. ठाणेकरी यास जे समयीं अनकूल पडतें तेच दिवसीं रात्रीचें भलत्या मोर्च्यावर येऊन पडतात. सांप्रत गांवकरी यांचीच सलाबत मोर्चेकरी यांवर येऊन पाडिली आहे. राजश्री स्वामी उतर तीरी कृष्णेच्या तटाकीं आहेत. दक्षण तीरीं आकिवाट आहे. राजश्री तुबाजीपंत देखील अकिवाटासच आहेत. सांप्रत कृष्णेस पोहणाव पाणी आहे याकरितां राजश्री स्वामीचे जाणे पलीकडे होत नाहीं. भांड्यांचे[1] गोल्यानी कांही भिंताड व थोरला येक बुरूज थोडासा पाडिला आहे. परंतु गांवकरियानी पडल्या जागास लांकडाचा मेढा घालून कांब्याचे पेटे लाऊन बलकटीने राखत आहेत. प्रज्येने कांही हा कालपर्यंत या प्रांते नाहीं. विदित जालें पाहिजे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

¶*Purandare writes to Chimaji Appa about mounting batteries on Akiwat in the South.*

---

*No. 11*] [*1740 ?*

**श्री**

**श्रियाविराजित राजमान्य राजश्री**

**मल्हारपंत स्वामीचे सेवेसी**

विनंती. पो तुको आकदेव सा नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीय लेखन आज्ञा केली पाहिजे. यानंतर स्वामीचा निरोप घेऊन स्वार जाहलों ते

---

१ तोफ.

गावास सुखरूप पावलो. नलेगावास राजपत्र व रा फतेसिंगबावाचे पत्र पाठविले. गावास रोखेही आम्ही पाठविले. गावकरी बहुत खुशाहल जाले. त्यास जानोजी बंडगर आम्हा वसूल होऊ देत नाहीं तरी त्यास मागती रा फत्तेसिंग-बावांची ताकीद पाठविले पाहिजे. तैसच माणकोजी बंडगर याचे पत्र जनोजीस पाठविले पाहिजे. म्हणजे मामला सुरळीत चालोन उसूल येईल. आगत्य पाठवणे. संताजी बंडगर यान पैके अद्यापि दिल्हे नाहींत; व कामाची विले करून दिल्ह आहे. कलल पाहिजे. रसीदखानाकडे वरात पाठविली होती; तो पैके देत नाहीं. कळल पाहिजे. त्यास मागती ताकीद राा बावाची पाठविले पाहिजे. लस्करे माघारे येईल तेव्हा अवघ पैक्याच विल्हे होऊन येईल. कळल पाहिजे. सरदार अवघे तिकडे आले आहेत. कळल पाहिजे. उदगीर त्रिलगी याचे सनद आगत्य करून पाठवणे. गई न करणे. लोकामध्यें बहुत हस जाले आहे. रा अमात्य पंताचे बाबती मुकासे निघाले ऐसे हस जाले आहे. तरी एकदा मागती उदगीर निलग करून पाठवणे. गई न करणे. गोपाळ राम याच मजमूच सनद करून देविले पाहिजे. बाळाजीपंत रिकामे आहेत. त्याच नाव मजमू दिल्ह पा-हिजे. रुस्तमराऊ पांढरे याच मजमूच सनद पाठवणे. गई न करणे. आम्ही चाकरीस चुकणार नाहीं. अभिमान धरून सनदा महालच व हे पाठवणे. गई न करणे. बहुत काय लिहिणे कृपा निरंतर असो दीजे हे विनंती.

रा वासदेवपंतास व समस्तास साा नमस्कार. कृपा असो दीजे हे विनंती.

¶*A private letter by Tuko Akdev to Malharpant describing the affairs of Amatya Bhagwantrao.*

---

*No. 12*] *[3-4-1747?*

पाा छ ३ राालाखर

श्री

श्रीमंत राजश्री पंतअमात्य

स्वामीचे सेवेसी

(शाहू द. रु. नं ४८)

पो धोंडो मल्हार कृतानेक साा समस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन केले पाहिजे विशेष. आपण कृपा करून पत्र पाठविलें व राजश्री आपाजी रंगनाथ यांणी जबानी सांगितलें त्यावरून अवगत जालें. ऐसियासी येविसी तीर्थरूपानी लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. निरंतर पत्र पाठऊन सांभाळ करीत असावें. बहुत काय लिहिणे? लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Dhondo Malhar alias Appa Purandare to the Pant Amatya, reporting that a reply has already been sent to him.*

3300

No. 13] [23-9-1747 ?

श्री

पुरवणी राजश्री रामचंद्र बावा
स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी. राजश्री संभाजी राजे यांच्या मुलकांत राजश्री बाबूजी नाईक जाऊन मुलुक खराब केला, प्रतिवर्षी त्यास पैका पावत होता तो पालेगारानी मना केला, याजकरितां राजश्री संभाजी राजे सातारियास अडून बैसले. राजश्री स्वामीजवळ नित्य याच गोष्टीची जीदे[1] होत गेली. बाबूजी नाईक यास अणवावेसें ठहरलें. राजश्री केशवराव मशारनिलेस आणावयास पाठविले. हे जाऊन नाईकास घेऊन आले. नाईक सातारियास आलियानी राजश्री संभाजी राजे याचा कजिया पडेल याजकरितां राजश्री स्वामीनी नाइकास परभारें बारामतीस जावयाची आज्ञा केली. ते बारामतीस गेले. आबाजी नाईक येथें आहेत. राजश्री संभाजी राजे याचा निकाल फार कठिण पडलों. नित्य जीव देण्यासी प्रसंग आहे. कोणे परिणामास जाईल ? नाईकाची पत सावकाऱ्यांत गुदस्ताचे गुल्यामुळे कम जाहाली. दुसरे संभाजी राजे याचे मुलकांत न जावे हेही गोष्ट ठहरली, याजमुळें बहुत मामला आफ्त[3] पडला. राजश्रीची बाकी फार, कसकसा निभाव होऊन स्वारीस जातील पाहावे. दैवगतीवर हवाला आहे. सावनूरकर पठाण, मुराररात्र हे बहुत मर्द शाहाणे, अणखीही पटणास त्यास अनकूल, त्याजमुळें ते नाईक थोडीबहुत फौज घेऊन गेले तरी खातरेस आणणार नाहींत ऐसें दिसते. छ २८ रमजान हे विनंति.

¶*Peshwa Nanasaheb informs Ramchandra Bawa that Sambhaji of Kolhapur has been greatly offended at the activities of Babuji Naik in Karnatak and has sought redress in a personal interview with Shahu at Satara.*

---

No. 14] [4-12-1747 ?

श्रीव्यंकटेश

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत
राजमान्य राजश्री नाना स्वामी गोसावी यांसी

पोष्य व्यंकटराव नारायेण कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुषललेखन करीत गेले पाहिजे विशेष. छ १९ जिलकादीचें

---

१ जिकीर. २ एथून अक्षर निराळें, लेखकाचें. ३ अडचणींत.

प्रांत मकडई येथून पत्रें पाठविलीं तीं छ १२ जिल्हेज मुकाम उडूरीं[1] पावोन लेखनाभिप्राय कलो आला. मौजे सुलकुड पा। मिरज येथील ठाणें हस्तगत केले येविषयीं करवीरवासी राजश्री स्वामीस विषाद येऊन माहाराज राजश्री स्वामी-सनिध सातारा नालीस[2] केली. तेणेंकरून राजश्री स्वामीस क्रोध होऊन ठाणे वस्तभाव समेत द्यावयाची आज्ञा करून राजश्री सदोबा यांसी पत्र सादर केले त्यावरून ठाणे द्यावयाविसीं तुम्हास चिरंजिवानी व राजश्री दादोबा यांणी पत्रें लिहिलीं तीं पावतांच ठाणे करवीरवासी राजश्री स्वामी याजकडें दिलेच असेल. कदाचित कालकलेवरी दृष्टि देऊन अनमान केला असिला तरी दिसती वस्तभाव समेत ठाणे त्याचे स्वाधीन करून राजश्री छत्रपति स्वामीची मर्जी राहे संतोषी होत ते केले पाहिजे म्हणून कितेक विस्तारे लिहिले. यैशास सुलकुड गाव पूर्वी-पासून घोरपडे यांस इनाम. त्यांणी आम्हांस आपले तर्फेने दिल्हा. तेथील पाटील हरामजादगीने सांप्रत वर्तणूक करूं लागला. त्यास आम्ही फौजेनसी या प्रांते आलो. पुढें कार्यभागास जावे तो शरीरीं अनारोग्य प्राप्त जाहले यास्तव उडूरीं दैवी व मानवी उपायाकरिता राहिलो. राजश्री राणोजी घोरपडे सेनापति सह-वर्तमान फौज पुढें च्यार दिवस पोट भरावयास चालिली. सुलकुड गावाजवळून जात असतां गावच्या प्याद्यांनीं गोल्या टाकून राजश्री मानाजी पायगुडे याजकडील दोन माणसे व सेनापतीच्या लस्करची येक दोन जखमी केली. त्याजमुळें गावावरी मुकाम करून सेनापतीनी गाव घेऊन पाटलाने ठाणे बांधिले होते तेथे प्यादे घालून नवी चौबुर्जी इमारत जुंजती[3] बांधावयास काम लाविले. पाटिलकी सोमवंसी चव्हाणाच्या साक्षीने म्हणऊन करीत होता तो पलोन करवीरवासी यांजकडे जाऊन त्याच्या सांगितल्यावरून करवीरवासी यांनी नालीस राजश्री स्वामिसंनिध केली. त्यांणी ठाणे माघारे देविले. पुरातन गाव घोरपड्याचा असतां लटकीच नालीस आमची न करावी. असु. प्रस्तुत राजश्री स्वामीची मर्जी ठाणे माघारे द्यावे व राजश्री सदासिव पंडित यांचे येविसी पत्र व आपले पत्र व राजश्री दादोबा यांची पत्रें आलीं त्याजवरून सुलकुडचे ठाणे द्यावयाचा सिधांत करून राजश्री स्वामी करवीरवासी याजकडील हुजरे राजश्री बाबूराव बलाल यांजबराबरी आले आहेत त्यांस ठेऊन घेतले आहेत. आपले आज्ञे-वरून ठाणे त्याचे हवाले करून आम्ही पुण्यास जाऊन. करवीरवासी यांचा सर्व अर्थ आपणास विदितच आहे. विस्तारे ल्याहावे यैसे काय आहे! आम्हास

---

१ ऊदुंब्री (औदुंबर). २ तक्रार. ३ झुंझण्यायोग्य.

आपले आज्ञेपेक्षा अधिकोत्तर नाहीं. बहुत काय लिहिणे ? कृपा लोभ असो दिल्हा पाहिजे हे विनंती.

*¶Vyankatrao Narayan to the Peshwa explaining to him why he captured the village of Sulkud. He did it, he says, because it was an Inam granted to the Ghorpade. But, he concludes, he is handing it over to the Raja of Kolhapur again according to the instructions of the Peshwa and Shahu Chatrapati to whom the Raja had complained in the matter.*

---

*No. 15]* *[30-12-1747?*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान**
**स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक सेवेशी विज्ञापना. स्वामीचे कृपादृष्टी-कडून सेवकाचे वर्तमान ता। छ ९ मोहरमपर्यंत यथास्थित असे. येथून छ १७ जिल्हेजी जोडी सेवेसी रवाना केली होती. त्या आलीकडील वर्तमान राजश्री स्वामी बाईसाहेबसाहित इंगलीवरी मुकाम होता, तेथे राजश्री सेनापति व यमणां यांणी बहुतसे आड घालोन अर्जोजीकडील बोली लांबणीस पाडिली, आपलेहि मुदे कितेक घातले. मुराररायांस लाऊन द्यावे, हती द्यावे, स्वामीकडील बोली आपले व अर्जोजी यादव यांचेच विद्यमानें व्यावी इत्यादि. अर्जोजीस पूर्ववत स्थापावे असे बोलत असतां त्यांचे समाधान तसेच राखून बाईसाहेब छ २४ रोजीं कोडोलीस आली. दुसरे दिवसीं मुराररात्र कोडोलीस गेले. त्यांचे यांचे बोलणें होऊन तिसरे दिवसीं बाईसाहेब लस्करांत इंगलीचे मुकामास गेली. मुरारराव करवीरास आले. वडगावचे लोकांत शकटभेद होऊन अर्जोजीकडील व लोकांकडीलहि पैगाम मुराररायांकडे आले ते सर्व बाईसाहेबांकडे रुजू करून मुराररायांची फौज तयार होऊन इंगलीजवल गेली. बाईसाहेब स्वार होऊन त्या फौजेत आली. तसीच वडगावास चालली. अर्ध कोशावरी दाखल जाली, तेव्हां कराराप्रमाणें अर्जोजीहि आपली फौज घेऊन भेटीस आला. भेटी होऊन त्यास पुढें करून दरवाज्याजवली गेली. तेथें कांहीसी बोली पडली. बोलीप्रमाणें जमाव बाहेर ठेऊन बाईसाहेबी किल्यांत जावे ते सारीच फौज चालिली हे काय, असे अर्जोजी बोलोन मागें पुढें पाहातो तों दरवाजकरानीं दरवाजे उघडले, तेच अर्जोजीस पुढें घालोन बाईसाहेब फौजेनसी छ २७ जिल्हेजी वडगांवात दाखल जाली. रात्रौ भिकाजी नीलकंठ व अर्जोजिकडील स्वार व सेनापतीकडील व यमणांकडील जे होते ते बाहेरचे बाहेर पलाले. ते पलाल्याची खबर कलतांच अर्जोजीकडील लोक बुरुजावरी होते ते उतरोन अर्जोजीस चौकी बसविली आणि बाईसाहेब

हेरल्यास गेली. करविरीहून मुराररावहि गेले. हेरले दोन प्रहर झुंझले. याकडील पांच सात माणूस जायां जाले. संध्याकाळीं हेरले हस्तगत जाले. तेथें प्यादे यमणांचे व सेनापतीकडील होते त्यांस कौल देऊन गांवगनाचे नावनिसी लिहून घेऊन सोडून दिल्हे. तसेच आलतेहि तेच दिवसीं आले. दुसरे दिवसी सावगावावरी गेले, तो तेथील चिकोडीकर व सेनापतीकडील प्यादे ठाणें सोडून चालिले ते सेनापतीचे लस्करात पावविले. सेनापति व यमणाहि उठोन आपलाले ठिकाणास गेले. बाईसाहेब मुरगूडपर्यंत जाऊन टिपकुरली देखील ठाणी हस्तगत करून छ ४ मोहरमी सांगवडीयाचे मुकामास आली. सेवक दोन रोज अगोधरच लस्करांत गेलो होतो. बाईसाहेबाची भेट होऊन बोलणेंचालणें जाले. राजश्री स्वामीहि कितेक बोलले तो समग्र अर्थ अलाहिदा पत्रावरून विदित होईल. छ ५ मोहरमी बाईसाहेब करविरास आली. राजश्री स्वामी व मुरारराव दुसरे दिवसीं कूच करून जाऊन तलदगे घेतले. गंगाजी सिंगाडा पडला. दोन अडीचसें घोडे सापडले. पांच सा हजार गुरें वरकड दाणागला वगैरे लूट बहुत सापडली. कितेक सावकाश बोलणे आहे म्हणोन सेवकास बाईसाहेबी समागमे करविरास आणिले. तेथें आल्यावरी दोन वेला येकांती बोलाऊन नेऊन कितेक भाष जाले तो समग्र अर्थ अलाहिदा विनंतीपत्रावरून विदित होईल. मुरारराव यांची फौज गणती साडेतनि हजार स्वार आहेत. तीन तोफा समागमे आहेत. प्यादे दीड हजारपर्यंत जमा जाले. खर्चास बाईसाहेब देत असतात. आजीपर्यंत पनास हजार रुपये पावले. आजी रोजमुऱ्याकरिता म्हणून दाहा हजार रुपये येथून पाठविले. उदईक लस्करात बाईसाहेब जाणार. सेवकहि त्यासमागमे जातो. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji reports to the Peshwa the activities of Jijabai in the Karnatak region. She has succeeded, adds the writer, in occupying Vadgaon, Herle, Tipkurli, and Taladge. Murarrao Ghorpade is also reported to have joined her with his forces. This and the following letters of Ramchandra Bawaji, up to No. 29 and 156, 162, 187, 229, 260 refer to one topic and should be read together.*

---

*No. 16*] *[Received on 30-12-1747?*

छ ९ मोहरम

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामींचे सेवेसी

कृतानेक विज्ञापना. बाबूजी नाईकांचे स्वारीकरतां पनाळकर माहाराजांचे प्रांतास उपसर्ग होतो या गोष्टीचा बंदोबस्त सातारेयाहून होत नाहीं हा अर्थ

चितांत आणून नवाबाकडे संदर्भ लाविला आहे. नवाबांचीं पत्रे माहाराजास व सिदोजी घोरपडे यांस गेली आहेत. सिदोजी घोरपडे नवाबाचे भेटीस येणार म्हणोन बोली निघाली आहे. पूर्वी कैलासवासी रायांचे वेळेस नवाबानी पनालकर माहाराजांस हातीं धरून उपद्वाप केला तोच मनसुबा आतां आहे! सातारियांत राणीयांचा कारभार जाला आहे, या गोष्टीच्या बातमिया येथें येतात त्याजवरून मोगलाच्या डेन्यांस चर्चा करितात. नवाबाचे मुनसियाकडे राजश्री नागो राम जात असतात. त्याजवल मुनसी बोलत होते कीं पूर्वीच्या प्रसंगात राव जबरदस्त होते त्यानी साहस करून मनसुबा ठांसून राखिला. आतांहि तोच प्रसंग दिसतो. कैसें होईल पाहावें म्हणोन बोलत होते. हें वर्तमान नागोपंती सेवकास सांगितलें व रावप्रतिनिधीकडील देवराव ये जागां आहेत त्यांसहि हा मजकूर आढलला, तेहि सेवकाजवल बोलत होते. सत्यमिथ्य न कले. राजश्री तुकोपंती राव प्रतिनिधीस हा मजकूर लिा आहे याजकरितां सेवकानें सेवेसी विनंती लिा आहे. नागो राम येहीं सेवेसी लिहिले आहे. विनंतीपत्र लिहीत असतां बाबूजी नाइकाकडील जासूद धनाजी नाईक लस्करांत आहे, तो तुकोपंताचे भेटीस आला. तो वर्तमान सांगत होता कीं काल जोडी नाइकाकडून आली. अंताजी सिवदेव किंचित फौजसुधा जाऊन नायकास सामील जाले. नाइकांचा मुकाम सांवलजेवर आहे. सांवलजेहून विज्यापूर दोन मजला आहे. जासूद सांगत होता कीं नाईकांबराबर पांचेक हजार फौज आहे. विरापा येऊन भेटला, परंतु अद्याप फौज जमा होत नाहीं. फौजेनें आव सोडिला आहे. येकेकाचे वरास च्यार च्यार माणसें पाठविली, परंतु लोक निघत नाहीं. अवसान सोडिलें आहे. नाईक कृष्णेचे तीराने येणार. जासूद बोलत होता कीं आपण अबदुल खेरखानाकडे गेलो होतों. भेटलों. खान बोलिले कीं सालगुा नव लाख रुा नाईकास देत होतो परंतु घेतले नाहीं. मोठे कमबख्त आहेत म्हणोन बोलिले, याजप्रों वर्तमान सांगितले ते सेवेसी विदित व्हावयाकरितां लिा असें. नाइकानी सोनजी भापकरास आपणाकडेस ठेविले म्हणोन जासूद सांगत होता. राजश्री तुकोपंत व देवराव, रघूजी भोसले यांकडील, या उभयेतानी येक पत्र बाबूजीनाइकांस पाठविलें कीं पूर्वी कैलासवासी राव होते त्यानी कोणे प्रकारें मोगलास हांरीत आणिला त्या गोष्टी तुम्ही सालगुदस्तां विसरलेस. सालमारीं तर तुम्हाबराबर फौज जमा होत नाहीं म्हणोन बातमी मोगलाकडे येते याचा विचार पाहाणें; पंचवीस तीस हजार फौज निवडुक धराल आण मोगलास दुतर्फा फौज करून शह द्याल तरच काही बंदोबस्त होईल तर होईल. गतवर्षीचें मजकुरावरून मोगलास गर्वाचा फुगारा

बहुत जाला आहे. याउपर सावध असणें म्हणोन तपसिलें पत्र लेहून पाठविलें आहे. स्वामीचे सेवेसी विदित व्हावयाकरितां विनंती लिा आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶News-letter from the Nizam's camp that the Raja of Kolhapur has opened negotiations with the Nizam as a retaliatory measure to Babuji Naik's annual expedition in Karnatak. It further adds that the Naik's preparations for the year are feeble and would bring him nothing but disgrace.*

---

*No. 17]* *[1747-48?*

**श्री**

विनंती. सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक सेवेशीं विज्ञापना. संस्थानचे ताकीदरोखे देऊन रवानगी करावी म्हणून पहिलें विनंती करीत होतों. अलीकडे तो मतलब सोडून पर्यायेकडून आज्ञा घेऊन यावयाचे तरतुदेत सेवक आहे. सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब यांणीं तों अंत:कर्णपूर्वक स्वामीं-कडील पूर्ण भरवसा धरून इकडीलच साधनांचे पैरवींत आहेत. अर्जोजी यादव यांचे कजियामुळें खर्च भारी जाली. हुजूरचा बोढीचा प्रसंग. सिधेदुर्गचे संकट. मुराररायांची समीपता अद्याप टलेना. याकरितां कोहिली[1] आहेत. स्वामींचे आगमन पुण्यास जालें हे यैकोन बहुत संतोषी जाली. यवनास हतदर्प करून विजयप्रयाणाचें पत्र त्याणींहि आपणांस लिहिलें नाहीं व याणीहि आगमनवृत लिहून बहिणीस संतोषप्रद न जाले हें उचित कीं काय, इत्यादि ममतायुक्त प्रतिक्षणीं विविध प्रकारें भाषण होत असतें. आपणावरी राज्यभाराचें वोझें समर्थ पडिलें होतें, परंतु श्रीने मजला साहकारी निर्माण केले तन्मुळें आपण बेफिकीर जालों, चितास येईल तें करोत; याउपरी कीर्ति आपकीर्ति त्यांची आहे; यैसे बोलतात. मुररायांचे मिष्ट भाषणाने मोहग्रस्त केलें होतें. याकरितां संक्षेपें दिनचर्येचा विचार मात्र लिहीतों त्यांत सारांष प्रारंभापासून अंतरंग बाह्यरंग दुसरे प्रकारीचा परिछिन्न नाहीं. साताराकडील तारतम्य बहुत प्रकारे रक्षिले, इत्यादि अर्थें व विचारें पाहातां स्वामीविना दुसरा आधार आश्रा या राष्ट्रास आहे यैसे नाहीं. अत:पर स्वामीनी उपेक्षा केली तरी हें राज्य कथाशेष जालें आहे व पुढेंहि होतें असा अर्थ आहे. कतब्याचे मजकुराची पुरवणीच बजिनस दाखऊन विनंती करणे ते केली. तेव्हां कतबा आणवावा त्याची वाईवाट करूं, यैवज आणऊ

---

१ उद्विग्न.

3306

म्हणून बोलत होते. त्यांस समक्ष बोलाऊन आणून सांगितले कीं तुम्ही सांगितल्या-प्रमाणें कतबा यावयाचा करार होऊन सिक्यानिसी त्यांचे पत्र आलें. याउपरी त्यांचे रुपयांची निशा करून कतबा आणा म्हणून आज्ञा केली. यावरी त्याणीं उतर दिल्हें कीं, साहेबी रुपये देवऊन कतबा येथें आणावा मग आपण राज-कारणेकडून यैवज आणऊ. यैसे यैकतांच त्यास बहुत रागास आली. आम्ही रुपये द्यावे, कतवा आणावा, मग तुम्ही राजकारण करणार! कतबा सोडवयाचे रुपये निशा तुमचे वस्तू न होय यैसें असतां लबाडी कां करीत होता? राजश्री-कडील पेंच कां आपणावरी घातलात? इत्यादि बोलणारावरी बहुत निक्रष जाला. तन्मुळें ते समई जावसाल जाला नाहीं. मुराररायांचे जाण्याराहाण्याचे निवडे तों हेहि गोष्टीचा जाबसाल करून सेवक स्वार होऊन येतो. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. वेदमूर्ती राजश्री दादंभटजी क्षणक्षणा आम्हांसमक्ष विचारितात की, काही लडा ठेऊन लिहिलें नव्हतें, असें असतां त्या पत्राचे उतर किंवा आणविली पत्रे न आली याच भाव काय म्हणून पुसतात. हे निरोतर होतात. असे नसावे. हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji reports the state of affairs at Kolhapur and particularly the attitude of Jijabai towards the Peshwa.*

---

*No. 18*] *[17-1-1748*

छ ९ सफर

**श्री**

**श्रीमंत राजश्री नाना व भाऊ स्वामीचे शेवशी**

विनंती. सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक सेवेशी विज्ञापना. स्वामीचे कृपादृष्टी-कडून सेवकाचें वर्तमान ताा छ २७ मोहरमपर्यंत यथास्थित असे. राजश्री नारायणराव यांकडील गांवास उपसर्ग न लागावा म्हणून राजश्री वजारतमाब यांस स्वामींनी पत्र पाठविलें होतें ते सेवकाचे आज्ञापत्रसहित प्रविष्ट जालें. वजारतमाब यांस पत्र प्रविष्ट करून आज्ञेप्रमाणें सांगावयाचें तें सागोन उतर घेऊन सेवेसी पाठविलें आहे. तळदगेकरावरी सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेबाचा निग्रह बहुतां दिवसांचा होता. हालीं वडगांवचे प्रसंगांत त्यांणी अर्जोजी यादवाकडून नालबंदी घेतली होती. प्यादे स्वार धण्यासी जुझावयासी अर्जोजींस सामील जाले. इतकेहि प्रत्यय आणून देऊन वजारतमाब यांजकरवी तळंदग्यावरी निग्रह करविला. हे कार्य होतांच बाईसाहेबीं नांदणी, इचलकरंजी, कुरंदवाड

यांचे पारपत्याचा मजकूर केला. तिन्हीं ठिकाणचे प्यादे हेरले वडगांवात जुंझले. राजश्री त्रिंबक हरि यांणी राजश्री सेनापति व यमणा यांचे मतांत सिरोन अर्जोजीस बल पाडिलें. याविषईची कितेकाचीं पत्रें वडगांवात सांपडलीं. ती आणून दाखऊन खामखा या गांवासी खटपट करावी म्हणून तोफा हशम दारूगोला आणून फौजेस रोजमुरा आपण देतों इत्यादि अर्थ वजारतमाब यास बाईसाहेबी बहुता प्रकारें सांगितले. तथापि याणीं दुरंदेशीनें स्वामीचा शब्द लागेल या अर्थावरी नजर देऊन या गोष्टीचा निशेध करून अनमान केला. बाईसाहेबासहि बहुता प्रकारें समजाऊन सांगितलें की, जरी आपले राज्याचा बंदोबस्त करून घेणेंच साहेबास जरूर असेल, श्रीमंतास साहेबी वचन दिल्हे आहे तेणेंप्रमाणें करार करून त्यांची आपली गांठी घालावी म्हणिजे साहेबाचे चितानुरूप सर्वहि बंदोवस्त होईल. ऐसा कितेक पदार्थ वजारतमाब यांचा अर्थ शोधून पाहातां स्वामीचे ठाई दुसरा विचार नाहीं. निरंतर स्वामीची ममता आठवितात. राजश्री भाऊसाहेबी लोभ केला. जेवणाखाण्याचे तारतम्य नित्य स्मरतात. पुढे उमेद बहुतसी धरली आहे. ऐसे असतां सदरहू खेडियांकरितां स्वामींनी लिहिल्यावरी त्यापासून अंतर होईल ऐसे नाही. येविषई सेवकाचा निशा आहे. धण्यासी व आपणांसी अन्यथा विचारें न वर्तेत असी स्वामींनी नांदणी, इचलकरंजीकरांस आज्ञा करावी असा वजारतमाब यांचा हेतु आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Ramchandra Bawa to Nanasaheb and Bhausaheb informing them that letters addressed to Murarrao Ghorpade asking him to cease molesting the villages of Narayanrao have been handed over to him. The writer further informs them how Jijabai instigated Murarrao to attack some of the villages who however discarded the proposal.*

---

*No. 19]* *[Recd. 30-1-1748?*

छ १० सफर

**श्री**

विनंती. सेवक रामचंद्र बाबाजी कृतानेक सेवेशी विज्ञापना. इकडेहि कितेक स्वामीचे ममतेचे लोक आहेत. त्यांचे विचारें करवीरकरांची क्षणभंगुरबुधि म्हणून स्वामींनी तिरस्कारून या प्रांताची व इकडील मनसुबियाची उपेक्षा न करावी. तो दरबार कलेल ते रीती रक्षून इकडील बहुतसी विवंचना न करितां आपलें कार्य चालीस लावावें, म्हणिजे हे सहजेंच यथास्थित रीतीनें वर्ततील. बेलगांव साहा कर्याती व मामले हुबली चौदा कर्याती व परगणे

धारवाड हीं मोंगलाईतून खालीं पडिली आहेत. निजामनमुल्क यांकडील सौरस्य प्रसंगात सनदपत्र आल्यानें करून द्यावी. बल्केंकीं[1] त्या दरबारांतून मोंगलबाब म्हणून स(न)दपत्र चालऊन उद्योग करावा म्हणिजे येखादें ठिकाण हस्तगत होऊन आखेर[2] पडतो. आखर पडल्यावरी सर्वेहि प्रांत स्वामीचा आज्ञांकित आहे. सारांष कितेक भुमे व वतनदार व अंगेजाचे लोक यांचे विचारें स्वामींनी इकडील अनास्था परिछिन न करावी. हरयत्नें या प्रांते पाया धरावा म्हणिजे स्वामींचे पुण्यप्रतापें इकडे नूतन श्रिष्टी[3] किले कोट अरमार मुलूक स्वाल्पायासें सर्वेहि स्वामींचे शासनांत येतील. सिधेदुर्गचे कदीम भंडारी लोक च्यार पांचसे माणसाचा जथ आहे. त्यांतील नाईक येऊन भेटोन गेला की, वरघांटे स्थल करून मुले लेंकरें आमची जतन करा आणि पोटास द्यावें, कार्यै अचंबा करून सरफराजी करून घेऊ. इत्यादि कितेकजण कितेक येऊन बोलोन जातात. सर्वत्रांस हिमत देऊन उमेदवार केले आहेत. त्यांपासून सेवा घेणार स्वामी समर्थ आहेत. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji requests the Peshwa not to neglect the affairs in the South simply on account of the wavering attitude of the King of Kolhapur. The writer also suggests to him that a sanad for only one village in the South secured from the Nizam will make it easy to bring the whole province under subjugation. He writes that a number of people have come and offered themselves for service.*

---

*No. 20]* *[Recd. 30-1-1748?*

छ १० सफर

**श्री**

कृतानेक सेवेशी विज्ञापना. सौभाग्यादिसंपन्न मातुश्रीबाईसाहेबांची यकांती गाठ पडोन स्वामींचे मर्जीप्रमाणे जे विनंती करणें ते केली. त्यांचे मायेममतेत सिरोन बुधिवादहि बोललों. कितेकांचे गुणदोष पुढील परिणाम इत्यादि अर्थ त्याचा खुलासा बाहेर निघाला. तोरगलास मुराररायांची भेटी होऊन बोलीचाली जाली, तेव्हा मुराररायानीं तीन्हीं संस्थानें आपणाकडे द्यावीं म्हणून बहुत रदबदल केली. ते समई बाईसाहेबी साफ उतर दिल्हें कीं, संस्थानें आंम्ही तिकडे देऊन चुकलो. तेव्हा मुरारराव बोलिले कीं, संस्थानें दिल्हीत तेव्हां तुम्ही आम्हासच देऊन चुकला! याउपरी आमचा उबार राहात नाहीं. ते समर्थ सामर्थ्यवंत. त्यांचा पाय या प्रांते सिरल्यावरी आंम्ही कोण, केवढ्याचे आहों इत्यादि अर्थं त्यांचा

---

[1] किंवा. [2] पायंडा. [3] सृष्टि.



Ca 69—3

रुसवा पडला. ते समई बाईसाहेबी करार वचन दिल्हे कीं, तीन्हीं संस्थानें त्यासहि देत नाहीं; तुम्हांसहि देत नाहीं. सरकारांत जैसा वहिवाट करणें तो करू. या गोष्टीवरी बोली ठराऊन समजावीश निवाली आहे. पुढें कसें करावें म्हणोन बाईसाहेबी विचार सेवकास विचारिला. सेवकें विचारिलें की तुम्हांस संस्थानें श्रीमंताकडे देणें आहे किंवा नाहीं हे साफ सांगा. मग त्यासारिखा विचार सांगितला जाईल. त्यावरी ती बोलिली कीं, संस्थाने त्यांकडे देऊन त्यांचे हातें राज्याचा बंदोबस्त करून घेणे हा निश्चय. मुराररायांचें मनोधारणांस अतर न करितां त्यांची याची गाठ घालावी म्हणिजे आपण कृतार्थ जालों. ये गोष्टीस तुंम्ही मुराररायांकरवी निखालसपणें अर्ज करवा कीं, संस्थाने श्रीमंताकडे द्यावी. इतकें जालें म्हणिजे मग तुम्हासी कितेक बोलणे आहे तें बोलोन कागदपत्र करून देऊन तुमची रवानगी करूं. सेवकें विनती केली कीं, जरी करितां ते निखालसपणे न बोलतच तरी पुढें आस्ता काय? त्यास उतर दिल्हे की, सेवटीं दोन्हीं कसी साधतात? प्रथम श्रीमंताकडे वचन गुंतलें तें खरें. वरकडहि कितेक मायेममतेचे बोलणे जालें. त्यावरी सेवकें युक्त सांगितली. सेवक निरोपाची निकड करितो. साहेबी निरोप दिल्हासा करावा. तदुतर त्यांचा खुलासा कलेळ. तेणेप्रमाणें दुसरे दिवसीं सेवकें राजश्रीकडे व बाईसाहेबाकडे निरोपाची निकड केली. बाईसाहेब वडगावास जाऊ लागली ते समई राजश्री स्वामीस सांगितलें की, यास निरोप देणे. संस्थानें आम्ही सरकारांत ठेविली यैसें सांगोन ते गेली. यावरी राजश्रीजवली निरोपाचे विडे मात्र द्यावे म्हणून अतिष्य करून बसलों. तें वर्तमान मुराररायांस कलतांच येथ आज सा दिवस राहाणें म्हणोन बहुता प्रकारें समाधान करून आपले डेरयास घेऊन गेले. बहुत मायेममतेने बोलो लागले. सेवके यांची उतरे श्रीनिवासरायाजवली बोलो म्हणून बिराढास आलों. रात्रौ श्रीनिवासरायांस बोलाऊन आणून बोललों कीं, राजश्री स्वामीनी व बाईसाहेबी संस्थाने श्रीमंताकडे दिल्ही, तेव्हां आपले वस्तू संस्थानचा यैवज वसूल होत नाहीं म्हणून दिल्ही होती. आतां संस्थानचा यैवज वसूल करून देणार तुम्ही निर्माण जाला म्हणून त्याणी साफ उतर सांगितले. यैसे असतां मनांत येक पोटात येक यैसे कश्यास बोलतां? इत्यादि न्यायनिष्ठुरवादे बहुतच बोली जाली. त्याणी जाऊन सांगताच मुराररायानी सेवकास बोलाऊन नेऊन समग्र अर्थ सांगितला. सेवटी क्रियापूर्वक बोलिले कीं, संस्थाने श्रीमंताकडे करून देऊन तुमची रवानगी करितों. हे धणी न यैकेत तरी आपली समजाविशी नाहीं. इत्यादि बोलोन सेवकास राहऊन श्रीनिवासरायास बाईसाहेबाकडे पाठविले. तेथेंहि बहुत रदबदल करून त्याचे समर्पक उतर

आणऊन आम्हास बोलिले कीं, तुम्हीं श्रीमंतास लिहून इकडे राजश्री भाऊसाहेबाचे येणे जाले तरी उत्तम. नाहीं तरी पांच हजार फौज तऱ्ही यावी लागते. त्याची व खासगत मजकुराची तयारी करवा. करवीरास जाऊन दों चहू दिवशी तुम्हांस रवाना करितों. इतका मजकूर जाला आहे. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Ramchandra Bawaji writes to the Peshwa that the Raja of Kolhapur has assigned the three Karnatak states under his jurisdiction to the addressee for levying tribute and that Murarrao Ghorpade has consented to the arrangement.*

---

*No. 21]* *[Recd. 30-1-1748?*

छ १० सफर

श्री

सेवेशी विज्ञापना. येथील सविस्तर वर्तमान पेशजी वार्तिकांसमागमें सेवेशी लिहिले आहे. अलीकडे संक्रांतीचे दिवसीं सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब करवीराहून लस्करास आली. त्यासमागमें सेवकहि वेदमूर्ति दादंभटासहित लस्करांत आलों. दुसरे दिवसी अर्जोजीस वडगांवाहून पालखींत घालून आणून दोन वस्त्रें देऊन करविरास रवाना केला. येथें अटकेंत ठेविले. त्याची स्त्री वडगांवीं होती तिलाहि नेऊन करविरीं ठेविली. वस्तभाव सर्व जप्त केली. पौष्य बहुल प्रतिपदेस बाईसाहेब वडगांवास गेलीं. त्यांसमागमें दादंभटास रवाना करून सेवक बाईसाहेबांचे आज्ञेप्रमाणें मुराररायांजवळी राहिलों, तो समग्र अर्थ दुसरे पुरवणीवरून विदित होईल. बाईसाहेब येथून गेल्यावरी पांचसाहा रोज राजश्री येथे होते, त्यावरी तेहि गेले. अलीकडे पांचसात रोज मुराररायांस नित्य पत्रें संन्निध यावयाविषयीं येतात. गांवचा मुकदमा उरकोन लस्करची समजाविशी करून येतों, येसी यांची उत्तरें जातात. माघ शुध प्रतिपदेस यांणी इकडून करविरास जावें, त्यांणी तिकडून यावें येसें आहे. चिकोडीकर व सेनापति आपलाले जागा प्यादे जवादे जमा करून जोमानें आहेत. यांणी आणिखी कोठें तोंड टाकिलें नाहीं. इंगलीवरी कांहीसा निग्रह होता त्यास बाईसाहेब यथून वडगांवास जातेसमयीं इंगलीकर जाऊन भेटून हजार दोन हजार देऊन कौल घेतला. मुराररायांस लिहून पाठविलें कीं इंगलीकरास आम्हीं कौल दिल्हा, तुम्हीं त्याचे रानांत कही न पाठवणें. त्यावरून हे कांहीसे श्रमीच जाले. मनांत बहुत खटे आहेत. इतकें वर्तमान आहे. नांदणी इचलकरंजीस उपसर्ग न लागावा, म्हणून पत्रें स्वामींची आलीं ती पाहून मुरारराव बहुत समाधान जाले, की पत्रांत कांहीं विधिकरण किंवा नौदिगर लिहिले नाहीं. आपला गिला तों

लिहिणारांनी बहुत लिहिला असेल. तथापि श्रीमंतांनी आपणांस काही सोडून लिहिलें नाहीं. तुमचे पत्रहि दाखवा म्हणून बहुत गला पडोन सेवकाचेंहि पत्र पाहिले. त्यांत स्वहस्ताक्षरें च्यार वळी होत्या. त्यांत लिहिले होते की मुराररायांपासून हरगीज अन्यथा विचार होणार नाही म्हणून. त्यावरी बहुतच संतोष मानून स्नेह संपादावा, पदरी असावें तरी त्यांचे असावें इत्यादि, गतवर्षी भाऊसाहेबी लोभ केला, दिल्हे घेतले, भोजन समारंभ, आदर, सर्वहि आठऊन बोलिले कीं, याउपरी आपण त्यांचे वर रिघालों, बरें करोत किंवा बाईट करोत, करविरास जातांच तुमची रवानगी करितों ऐसें बोलोन आली जोडी रवाना केली. नांदणी इचलकरंजीचे मजकुराचें पत्र त्यांणी आपले हातें मसुदा करून लिहविलें, तदनुरुप लिहून आलाहिदाच लखोटा करून दिल्हें आहे. स्वामीचे मर्जीसिवाये परिछिन्न आपणास वर्तणें नाहीं, म्हणून शफतपूर्वक बोलिले. सेवशी श्रुत होये हे विज्ञापना. वेदमूर्ति दादंभटजीने बहुत श्रम केले व पुढें स्वामी कार्यावरी सादर आहेत. त्यांस पत्र येत नाहीं, तन्मुळे ते श्रमीं होतात. तरी त्यांस पत्र येत जाये ते आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The favourable attitude of Jijabai and Murarrao Ghorpade towards the Peshwa is reported.*

---

*No. 22*] [*Recd. 30-1-1748?*

छ १० सफर

**श्री**

विनंती. सेवक रामचंद्र बाबाजी कृतानेक साष्टांग दंडवत विज्ञापना उपरी. स्वामीचे आज्ञेप्रमाणें तिन्हीं संस्थानचे मामलियतीचा जाबसाल मनास आणितां कोठें काहीं थाक दिसेना. आजी आजउद्यां म्हणतां पहिलें वेदमूर्ति दादंभटजी येऊन पांच महिने जाले. सेवकास येऊन अडीच महिने जाले. याकरितां सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेबांस निष्टंक विनंती केली. तेव्हा त्याणी राजश्री स्वामींस सांगितले कीं जो जाबसाल करणें तो करून यांस निरोप द्यावा, म्हणोन सांगोन ती वडगावांस गेलीं. सेवकें राजश्री स्वामीजवळी आज्ञा मागितली, उतर विचारिलें. त्याणीं उतर सांगितलें कीं संस्थानें आम्हीं सरकारांत ठेविलीं. त्यावरी सेवकें विडे मागोन स्वार होऊन येत होतो तों राजश्री वजारतमाब याणीं बहुता प्रकारें समाधान करून राहविलें. येथून करवीरास जाऊन बाईसाहेबासीं

जे विनंती करणें ते करून समर्पक उतर करून देऊन श्रीनिवासरायांस तुम्हांसमागमें रवाना करितों. आपण श्रीमंतासी स्नेह केला; भिन्नता उरली नाहीं; यैसे असतां त्याकडून प्रसंगात नौदिगर जाव होईल हें काय घडो पाहातें? त्यांचे मनोदयाप्रमाणें कार्यसिधि करून देऊन. त्याची आपली गांठ पडावी, मातबर कार्यें मनसुबे करावे, हा आपला हेतु धण्यास कलेल त्या रीतीनें सांगोन कार्य सिधीस पावऊन तुम्हांस रवाना करितों. या उपरी तिकडून फौज येणें व खासगत सरंजाम होणे ये गोष्टीची मात्र सूचना पुढें लिहून पाठवावी तों तुम्हांस रवाना करितो यैसें बोलोन ठेऊन घेतलें आहे. याउपरी सत्वरीच कार्य सिधीस पावऊन श्रीनिवासरायांसहित सेवेशी सत्वरींच येतों. स्वामीची नजर इकडील साहित्यसरंजामावरी असावी. वजारतमाव याणीं स्वामीचे ठाई अपरशरीरभाव धरिला आह. तदनुरूप उतम रीतीने कीर्ति विस्तारे तें करणार स्वामीं समर्थ आहेत. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना. वजारतमाव याणीं शफतपूर्वक निश्चय केला आहे कीं धण्यांस अर्ज करून स्वामींकडील कार्य सिधीस पावऊन उभय यैक्यतेने आपलेहि दौलतीचा थर बसवावा. कदाचित धणी हे गोष्टी न यैकेत तरी आपली धण्यांसी ना रजावंदी; यांकडून कार्य प्रयोजनांत आपणहि तन न द्यावें, येथवरी याचा करार आहे. भगीरथप्रेत्ने कार्यसिधि करूनच सेवकाची रवानगी करितील. स्वामीनी हुजूरचे देण्याघेण्याची व खासगत यांची व फौज या प्रांते पाठवावयाची योजना असो द्यावी, म्हणून पुन्हा पुन्हा वजारतमाव याणीं सांगितलें, तदनुरूप सेवेशी लिहिले असे. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Ramchandra Bawa to the Peshwa informing him that Jijabai had gone to Vadgaon without settling the question of the mamlat of the three states (Savanur, Bednur and Sondhe?) and that Murarrao had now taken the initiative to settle it. "Murarrao", he says, " is favourably inclined towards the Peshwa."*

---

*[Recd. 30-1-1748?*

*No. 23]*

छ १० सफर

**श्री**

विनंती. सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक सेवशी विज्ञापना. बिदरूराहून बातमी जोडे आले होते तेथील वकील इकडे येणार होता. परंतु यथें स्वामीकडील बोली कसी निवडते ते पाहून त्यासारिखें येणारानी यावें हा त्यांचा विचार. सावनूरकर बिलकूल मुराररायाचे लगामी आहेतसारिखे राबत्यावरून दिसते. हाली राजश्री स्वामीनीं गोसाव्याजवलील घोडा कुमईत अठावीससें रुपयांस घेऊन वरात सावनुरावरी करून देऊन गोसावी तिकडे लाऊन दिल्हे. सोंधेकरांकडील बोली राजश्री

रामचंद्र नाईक मंत्री याजकडे आहे. त्याणीं दाहा वीस हजार रुपये मुराररायांस कर्ज देऊन सोध्याची वकिली त्यांचे तर्फेची करून घेतली. यैवजहि आपणांकडे लिहून घेतला. राजश्री स्वामींकडे बाईसाहेबांकडे वरिचेवरी विनंती करितात कीं, संस्थान सरकारांत असों द्यावें. रुपये आपण देतों येसें म्हणतात. परंतु बाईसाहेबीं अद्यापवरी तुटकाहि जाब सांगितला नाहीं. गोवेकरांनी रेडीचे किल्याची इमारत चालीस लाविली, इंगरेजी तेथें बाधतात. नूतन येक दोन घरें बाटविलीं. वेंगुरल्यास सावंताची दोन गलबतें होतीं ती येऊन जाळून गेले. यैसा त्याणीं हळू हळू पैसे[1] बहुतच आरंभिला आहे. वरकड देसक कांटक. आपणांत आपण नित्य कांही कांही साधणें ते साधितच आहेत. राज्यास मात्र कोणी नाथ नाहीं. किले कोट जेरदस्त जाले. येथें हुजूर वडगांवचा प्रसंग ज्याहांबाजीने साधला ये गोष्टीने कृतार्थ व परम संतोषी! तेथील बंदोबस्तांत मग्न आहेत! सातारां वरिचेवरी पत्रे जातात की, आम्हास दर्शनास यावयाची आज्ञा करावी. कर्नाटकचा बंदोबस्त आमचे विचारें करावा. ये विषईची विनंती करावयास येतों, म्हणून दोन तीन पत्रें गेलीं. उतर येकहि आलें नाहीं. स्वामींकडे संस्थानें होऊ न द्यावी ये विषई थोरली धनीन व फतेसिंगबावा व रघोजी भोसले व यशवंतराव आदिकरून यांचे प्रेष हुजूर व मुराररायांकडे वरिचेवरी येतच आहेत! राजश्री बाबूजी नाईकांकडूनहि पूर्वील रावत्याचा प्रहस्त येऊन जबानी बोलावयासी आला होता. परंतु त्याचें दर्शनहि याणीं घेतले नाहीं. येथें राजदरबारीं नित्य यकेक राजकारण खलबतें होतात. परिणाम येकहि नाहीं. भिवगड, पारगड, कलानिधीकडील लोक, तैसेच डिचोली, सांखलीकडील व बेलगाव प्रांतीचे वोलखी येऊन भेटोन गेले. स्वामीकडील आशा लोकानी बहुत धरिली आहे. सर्वत्रांचा हेतु कीं, स्वामींचें निशाण या प्रांतीं यावें; आणि ज्यांत जितकी उमेद आहे तितकी सेवा करून ऊर्जितें करून घ्यावी यैसें आहे. बाईसाहेबांचे बोलण्यांत व्यत्यय काही दिसत नाहीं परंतु कुचाले करणार फार. आणि हे स्थिरबुधीची नव्हेत. याकरितां कांही प्रमाण मानवत नाहीं. याकरितां यथास्थित दिनचर्या सेवेशी लिहितों. स्वामीचे आज्ञेप्रमाणें येक लक्ष दाहा हजारावरी मामलियत ठरवावयाची रदबदल करावी तरी अद्याप देण्याघेण्याचा प्रसंग निवाला नाही. तथापि बोलीमध्ये भाषापत्रांचा व खर्चवेच जाऊन यैवज उरतो त्याप्रमाणें जाले तरीं श्रीमंताचे मर्जीस येऊ सके. अन्यथा दिडाचे बेरजेवरी तीं परिछिन्न बनणार नाहीं ह्मणून समक्ष बोललों. ते गोष्टीस त्याणीं पेशजीप्रमाणें उतर दिल्हें की, भाषापत्रें आम्ही गुंडाळून ठेऊन तुमचे खावंदाचे स्वाधीन संस्थानें

---

१ प्रवेश.

केली आहेत. आता पाच घेवोत किंवा पंचवीस घेवोत. आम्हासी करार केला आहे तेणेप्रमाणें देतील. न देत तरी त्यांची इच्छा. आम्ही जे केले ते केलेच आहे. कमपेश म्हणून पंचवीस तीस हजार उणे आमचे केल्याने त्यांचे दौलतीत किर्तीकसी भरती पडावी आहे? लक्ष स्वार बालगतात. त्यांत जाजती सें दीडसें स्वारांचा खर्च मानिला म्हणिजे त्यास अगाध नाहीं. आह्मी त्याजपासून घेऊ ते देतील. वरकड तीं होऊ द्या ह्मणून या तऱ्हेने उतर करितात. दुसरे मुराररायांस येथून लाऊन देण्याचे गोष्टीस यांचा त्यांचा जडाव न व्हावा ये गोष्टीचे साक्षेपांत कितेक लाविले आहेत. तलंदगे घेतल्यावरी यांचा मनसबा जथोन नजर बरी लांब जाली होती. परंतु स्वामीचे पुण्यप्रतापें आपणांत आपण कलवंडावयास लागोन पुनरुक्त मनसबा करविरास दाखल जाला! पुढें जे होईल तें वरिचेवरी सेवेसी लिहून पाठवितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji discusses with the Peshwa the general situation in the Karnatak before the province was taken over by the Peshwa. The writer intimates to the addressee that the Raja of Kolhapur is well-disposed towards him.*

---

*No. 24]* *[10-3-1748?*

**श्री**

**श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचे**
**शेवेसी**

विनंती. सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक साष्टांग दंडवत प्रणाम विज्ञापना. स्वामीचे कृपादृष्टीकडून सेवकाचें वर्तमान ता॥ छ २१ रविलावलपर्यंत यथास्थित असे. वडगावीहून सिवरात्रीस येथे आल्यावरी फालगूण शुध सप्तमीस राजश्री मुरारराव निरोप घेऊन तलंदग्यास गेले. सेवकेहि निरोप घेऊन यावयाची योजना केली आहे. सत्वरीच सेवेशी यतों. मुरारराव जातेसमई तीन च्यार रोज प्रस्थानास येथील सेवकाचे घरीं येऊन उतरले होते. स्नेहवाद इष्टालाप बहुतच बोलिले. स्वामी कारणें वस्त्रे दिल्ही आहेत. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawa to Bhausaheb informing him that Murarrao had put up with the writer for some days prior to his departure from Kolhapur. (See No. 156 later on.)*

श्री

श्रीमंत राजश्री भाऊ स्वामींचे

शेवेशी

विनंती. सेवक रामचंद्र बाबाजी कृतानेक साष्टांग दंडवत प्रणाम विज्ञापना. स्वामीचे कृपादृष्टीकडून सेवकाचें वर्तमान ता।। छ २० रबिलावलपर्यंत यथास्थित असे. इकडील वर्तमान सविस्तर पेशजी सेवेशी लिहिलेच आहे. अलीकडे राजश्री वजारतमहाब याणी तलंदग्याबाबत घोडी करविरी ठेऊन येक मातबर ग्रहस्तास बाण्याउदम्यांचे देण्याचे तिसां हजारांचे हवाले देऊन दो महिन्याचे मुदतीनें येथील गुंता वारला. तलंदग्याहून कूच व्हावयासी काही नकदी यैवज पाहिजे, याकरितां सूर्यवंसी यांचे मारफतीनें हातीं गहाण ठेऊन व काही राजश्री सिदोजी थोरात यांचे विचारें कर्जवाम मेळऊन वर्षप्रतिपदेचे दिवसी कूच करावें असा इत्यर्थ होता. तों छ २२ रोजीं लस्करची कही चिकोडीकरांचे मुलकांत गेली होती. त्यावरी चिकोडीकरांची स्वारी येऊन वीस पंचवीस तटे नेली. दोन च्यार माणसें जायां केली. हे खबर येताच फौज घेऊन मुरारराव भोजेजवली गेले. तेथें त्यांचे दाहा पांच प्यादे मारिले आणि मांगनूर म्हणून खेडे होतें त्यावरी हला केला. खेडें घेतलें. मागाहून लस्कर कूच करून नेलें. बारवाडास घेरून बसले जाहेत. यांची फौज दोन अडीच हजार आहे. चिकोडीकरांचेहि प्यादे दोन हजारापर्यंत भौजेत आहेत. स्वारहि ठाई ठाई जमा होत आहेत. यांत त्यांत हर्षामर्ष वाढला. पुढें होईल ते सेवेशी लिहून पाठवितों. राजश्री येसाजी भोसले याणी नारबाबा मंत्री यांचे गाव बागणी म्हणून होतें ते घेतलें. यक दोन माणसें पडिली. तुळाजी आंगरे सातारा भेटीस जावयाची तयारी करीत आहेत. गोवलकोट नजर करणार म्हणून खबर आहे. फिरंगियाणीं लहान सिबाडा आरमार बहुत सजले. सिंधेदुर्ग विजयदुर्गचे बारयापर्यंत उगाच फिरत असतो. अलीकडे सोंधेकरासीहि सख्तीने वर्ततो. सोंधेकरानी विसाजी कासी म्हणून वकील सातारां पाठविला आहे. चंदनी पलंग व वस्त्रे व जिनस हुजूर व इत्यादिकास पाठविला. मतलब जे पूर्वी पांच हजार होनांचा तह जाला होता तो यैवज थोरले माहाराज राजश्री स्वामींनी या राजश्रीस देविला होता. यांचा यैवज यांचे हातास न ये तेव्हा तो वसूल होणे कैचे? प्रस्तुत तो यैवज प्रतिवर्षी महाराजास द्यावा आणि स्वामीची स्वारी मौकुफ करवावी, हा यत्न आरंभिला आहे. येथें

हुजूरचे वकील आलेच आहेत. दों चहूं रोजांत मुराररायाकडील कूच मुकामचा प्रसंग पाहून स्वार होऊन सेवेसी येतों. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji reports to Bhausaheb news from Kolhapur. He speaks of a skirmish between Murarrao and Chikodikar and also refers to the growing ill-feeling between the Portuguese and the Chief of Sondha.*

---

No. 26] [March 1748?

श्री

विनंती सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक सेवेसी विज्ञापना. सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेबी सांगवड्याचे मुकामी राजश्री मुरारराव आपले डेऱ्यास उठोन गेल्यावरी सेवकास बसऊन घेऊन दाटी काढून विचारूं कागलीं कीं, उभयता बंधूची माया आपणावरी आहे कीं नाहीं? आपण मनोभावें त्यांस च्याहातों आणि त्यांकडून कांहीं ममतेचा लेश दिसोन येत नाहीं. सेवकें उत्तर दिल्हें कीं आजी केलें तें उद्यां नाहीं, असी येथील रीत आहे तसा तेथील विचार नाहीं. जेथें जो हेत धरला त्यास कदापि अंतर नाही. तेव्हा सरसाऊन बसोन अंतरें स्थापावयास आरंभ केला जे, आपण तोरगलास मुराररायांस आणावयास जाऊं लागलों ते समईं राजश्री दादंभट, सोनो मेघश्याम यासमागमें कितेक अर्थ सेनापतीकडील व अर्जोजीकडील सांगोन पाठविले; त्यांत सारांश बोलीप्रमाणें आपणांकडील मातबर जो पाठवावयाचा तो पाठवावा, हत्याचा यैवज सत्वर यावा, सेनापतीस बल तुम्हांकडून किमपि न पडावें, इत्यादि कितेक ममतेनें सांगोन पाठविले, त्याचा दोन तीन महिने जाब ना साल. आपण येथें आलियावरी पत्रें वस्त्रें घेऊन आले. यैवज मालवजाचा(?) जाबसाल कांहींच नाहीं. मातबर योजतां इकडील प्रयोजनास राजश्री नारायणराव योजिले आहेत. भूवरगढ सत्वर खाली करून द्यावा तेव्हां यैवज देऊं. हे न होये तरी गतवर्षींच्या मनसब्यास आपणांस पंचवीस लक्ष खर्च जाले आहेत, त्याकरितां दाहा वीस हजार फौजेनसी येऊन आम्हांस आपला यैवज उगऊन द्यावाच लागेल, यैसे राजश्री हरिपंत आदिकरून बोलों लागले. तेव्हां आपणास सर्वहि गोष्टीचा संदेह निर्माण जाला. अर्जोजीचा प्रसंग तुटक्या ताल्यास आला. सेनापति व यमंणा याणी तों आपणांसी दच बांधली आहे. हेंहि साहित्य त्यांतच मिळालें. आपण केलें ते उफराटें जाले यैसे भासले, तथापि त्यांचे स्थितीचा पूर्ण भरवसा आहे. याकरितां हरिपंतास बहुता प्रकारें आपण सांगितलें कीं, पुण्यास टाकोटाक जोडी रवाना

करून आर्जोजीस व सेनापतीस यमणास पत्रें बरी नर्साहेतपूर्वक आणून अर्जोजी आमचा आम्हाजवळी येई ते करावें. तुमच्या वचनेंकडून कार्य होईल. माझी उपहास राहील. पुढील उद्योग चालीस लागेल. यैसे कितेक सांगितलें. त्याणीं उत्तर दिल्हें कीं, जोडी रवाना केली आहे. येणेंप्रमाणें पत्रें आणवितों, कार्य करितों, यैसे बोलिले. ते गोष्टीचा विश्वास धरून आपण होतों तों सेनापतीकडील पैगाम आला कीं, राजश्री स्वामींनी कापर्सीस यांवें. मोहनसुंदर हती द्यावा. मुराररायास चालवावें म्हणिजे आपण अर्जोजीस आणून भेटवितों त्यामुळें राजश्री जावयास तयार जाले. तों पुण्याची जोडी आली. हरिपंत जवळी नव्हते. आमचे प्रयोजनाची पत्रें आलीं असतील म्हणोन आतुरतेनें लाखोटा फोडिला. त्यांत वरकड मजकूर यथायुक्तच होते. परंतु हे बोलीचें उत्तर प्रत्योतर काहींच नाहीं. तेव्हा त्यास शब्द लाविला कीं, इतकी गोष्ट तुम्हांस बेजीद[2] होऊन सांगितली असतां तुम्ही त्यास लिहिली नाहीं आणि लिहिले आहे म्हणून कसें सांगितलेत ? असें बोलत असतां त्यांणी आपणावरी निमित्य घातलें कीं पुरवणी येक तुम्ही काढून घेतली आहे ते द्या म्हणून बहुत अनर्थ केला. पुरवणी तों शफतपूर्वक नव्हती. पत्रांत मात्र लिहिले होते कीं, पुरवणींत लिहिले आहे. यैसे याच जाबसालाचे घोरांत पडिलों. परंतु यैसे आमचे या संकटप्रसंगीं 'बरें तुम्ही कांही फिकीर न करणें,' असे पत्रहि आपणास आलें नाहीं. यैसे कितेक भाषण जाले. आणिखी उद्या बोलो यैसें बोलली. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawa writes to the Peshwa that Jijabai has begun to view with suspicion the attitude of the Peshwa especially since the affair of Murarrao Ghorpade, Arjoji and the Senapati.*

---

*No. 27*] [*March 1748*?

श्री

विनंती. सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक शंवेसी विज्ञापना. गुदस्ता यैवजाची हफ्तबंदी जाली त्यापैकी किंवा कसे दिल्हे न कळे, पनास हजार रुपये आपणांस पावले आहेत. हतीबाबत यैवज म्हणून यैकत होतों. परंतु आपणांस येक रुपया पोंहचला नाहीं. म्हणून सहज बोलण्यांत बाईसाहेब बोलत होती. कतब्याचा मजकुरास बहुतकरून सांगोन आज्ञा केली आहे कीं कतब्यामुळें राजश्री स्वामीकडील बहुत पेच आपणावरी आला आहे. तरी कतब्यावरी जे रुपये दिल्हे असतील तितके रुपयाची निशा सातारा साहुकाराकडे करून देतों.

---

१ शिक्षा. २ आर्जवयुक्त.

कतबा सोडून द्यावा म्हणून बहुत बहुत विचारें सांगों लागली. सेवकें उत्तर दिल्हें कीं, कतव्याचे रुपये ठेऊन साहेब कतबा सोडून आणवितात तेव्हां संस्थानचे मामलियतीचा जाबसाल सर्वहि उरकला. लागलाच सेवकासहि निरोप द्यावा. निशा करणारांची गांठ घालावी म्हणजे कतबाहि सोडोन पाठवितों. तेव्हां बोलिली की मामलियतीचें कारभारांत कतव्याचा मजकूर नाहीं. सेवकें उत्तर दिल्हें कीं तुम्ही धणी. केला मामलियत नाहीं असें तोंड बोलणार नाहीं. आलीं मनुष्यें ठेऊन घेऊन आज उद्यां म्हणोन आपला मतलब साधणार. याकरितां तुमचे चितांतील अभिप्राय बाहेर पडावयाकरितां कतबा ठेऊन घेतला होता. त्यास तो अभिप्राय प्रगटतेस आला. याउपरी साहेबी न बोलतां सेवकें न लिहितां त्यांस मामलियतीचा जाब कलोन गेला. येैसें बोलतांच बोलली कीं, तसा कांहीं विचार असेल तरी श्रीअंबेची शफत आहे. आपणावरी पेंच सबल आहे. याकरितां लिहून उत्तर मात्र आणवा की, फलाणे साहुकाराचे हवाला कतबा केला आहे तो दिल्हे थैवजाची निशा करून कतबा न्यावा इतकें पत्र येऊ द्या, तों तुमचीहि रवानगी करितों. राजश्रीचे कारभाराचा कतबा त्यांचा त्यांचे स्वाधीन होऊन पुन्हा त्यांचेच मुखें तुम्हांकडे कतबा यावयाचें अगाध नाही. निःसंदेह लिहिणें म्हणून सागितलें. त्यावरून सेवेसी लिहिलें असें. तरी बाईसाहेबास पत्र स्वामीचें यावें की, कतव्याचा मजकूर सागोन पाठविला, तरी साहेबांस संकट असतां आम्ही उजूर करावासारिखा काय आहे ? फलाण्या साहुकाराकडे कतबा दिल्हा आहे, त्यावरी दिल्हेले रुपये इतके, त्याची मिती फलाणी, येकूण व्याजसुधा रुपये फलाण्या साहुकारांची निशा कतबा घेऊन जावें, येैसें पत्र सत्वर यई ते आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawa writes to the Peshwa about some monetary settlement between Jijabai and the King.*

---

*No. 28*] [*March 1748?*

श्री

विनंती. सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक सेवेसी विज्ञापना. सांगवड्याचे मुकामीं बाईसाहेबांचे व राजश्री स्वामीचे भाषण जालें तें अलाहिदा पत्री लिहिले आहे. करविरास येतेसमई मुरारराव्यांस विचारिलें की, पुढे आम्हास काय विचार सांगतां ? त्याणी सांगितले की तुम्हांस समागमें बोलावितात. जा. समर्पक जाबसालच जाला तरी उतमच जालें. नाही तरी त्यांसमागमें येथें या. आपण बोलिलेप्रमाणें गुदस्तांची बोली करारांत आणून तुम्हासमागमें श्रीनिवासरायास

देऊन रवाना करितों. आपले सध्या कार्य लक्ष दीड लक्ष रुपयेपर्यंत कर्ज मागणे आणि ते सांगतील त्याप्रमाणें धण्यांची व त्यांची सेवा करणें. आपणासी जे बोली करितील त्यात आधी कर्ज उगऊन घ्यावें. त्यांचे संस्थानाचा बंदोबस्त व कितेक बोलणें ते गतवर्षी भाऊसाहेबाजवळी बोललोंल आहो. इतकें बोलोन ते तलेदग्यावरी गेले. सेवक करविरास आलों. दुसरे दिवसीं देवढीस जाऊन पाठवितांच बोलाऊन नेलें. प्रहरभरपर्यंत समीप बसऊन घेतलें. अर्जोजीपासून अंतरे पडल्याचा तपसील व हाली साध्य केल्याचा पराक्रम सर्वहि सांगितला. त्यांत बोलतां बोलतां भाव दर्शविला कीं, घटपेअर्लीकडे आपला खुलासा मुल्क त्यांत कितेकांनी कितेक गांव खेडी आटोपिलीं आहेत. सेवाचाकरी तों कोणी कोणांस पुसो नये. येखादें खेंकटें निर्माण जालें म्हणिजे त्यांत सर्वांनीं सामील होऊन धण्यावरी कमरबंदी करावी असा इकडील विचार जाला आहे. याकरितां आम्ही ज्यांणीं हिंदुस्थानांत आपले शासन चालविले त्यांचा पदर धरिला असतां आमचीही संकटें दूर होत नाहीत; दवाती[1] न जाय तेव्हां काय म्हणावें ? सेवकें उतर दिल्हे की, येक वचन जतन केल्यावरी सर्वहि चित्तानुरूप घडतें. तेव्हां फिरोन बोलिली की, तुमचे यजमानासीं तों आम्ही वचनास अंतर केलें नाहीं व पुढेंहि करणें नाहीं. सेवकें उतर दिल्हें की, दोन्ही गोष्टी त्यांचे प्रत्ययास येतील तेव्हां ते साहेबांचे चरणांसी कदापि अंतर करणार नाहींत. त्यावरी बोलिली कीं, आपण सर्व प्रकारें भरवसा त्यांचा धरिला आहे. उद्यां परवा लस्करांत जाऊन तुम्हांसी जे बोलणे ते बोलोन तुम्हांस रवाना करितों. अर्जोजीमुलें दिवसगत लागली. मुरारराग्रास आणिले आहे. त्यांत संस्थानची बोली त्यांसी लेशमात्र बोलिलों नाहीं. हे संस्थानाची बोली तोरगली पडिली तेव्हां आपण साफ उतर दिल्हें की, संस्थानें आपण कोणासहि देत नाहीं असें बोलोन आपण कांही गुंतलों नाहीं. यैशास लस्करांत जाऊन राजश्री व मुरारराव देखील आसोन पायाशुध विचारें जे बोलणे ते तुम्हांसी बोलों. अर्जोजी इकडे काय बोलत होता, तिकडे कसे बोलला हेहि सर्व मनास आणून सर्व समते तुम्हांस उतर सागो. सेवकें उतर दिल्हें कीं, प्रस्तुतचे प्रसंगांत तुम्हांस टक्याचीहि वोढ व फौजेचीहि गरज आहे. यैसे असतां आम्हांस तुम्ही कांही आज्ञा करीत नाहीं. दिवस मात्र घालवितां, तेव्हा साहेबी वचन दिल्हें आहे तें प्रमाणसें कसें मानावें ? रंग कलोन गेलाच. हे आजी न बोला, उद्यां बोलाल. चिंता काय आहे ? म्हणोन भोजनास जावयास निरोप मागितली. तेव्हां आणिखी क्षणभर बसऊन बोलली की, थोरासी बोलल्यास आम्ही त्यांसी अंतर न करावे. त्याणी आम्हांसी अंतर न करावे.

---

१ दवात.

3320

आमची फिकीर आम्हांस लागली आहे. आपण चित स्वस्थ असों द्यावें. असे बोलोन श्वानास जावयास निरोप दिल्हा. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji reports to the Peshwa an interview which he had with Jijabai in which she complained about the Peshwa's failure to help her in maintaining order in her pargana near the Ghatprabha though she had relied on him. The writer attributes this indifference of the Peshwa to vacillation on the part of Jijabai. He further writes that Jijabai has promised to settle the affair of Murarrao's villages.*

---

*No. 29*] [*March 1748?*

श्री

विनंती सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक विज्ञापना. बाईसाहेबांचे विचाराचा अंत कोणास लागत नव्हता. त्यांत हाली मुराररायांची यांची गांठ पडली आहे. वडगांवचा मनसबा सिधीस गेला. फौज मिळाली, तेणेंमुळें नजर चढोन गेली आहे. पुढे काय मनसुबा योजितात हें न कळे. सातारांहून राजश्री केशवराव मुराररायांस वरिचेवरी लिहितात कीं, तुम्ही श्रीमंताचे स्नेहांत अंतर न करावें. त्यांचे मामलियतींत तुम्ही दुराशा धराल तरी गलाठाल. येसी त्यांची मात्र पत्रें येतात. वरकड कितेक कार्यभागी कर्नाटकचे संदर्भाची आशा धरणार व थोरली धनीन देखील लिहून सांगोन पाठवितात कीं, स्वामीकडील पाय इकडील मामलियतींत परिछिन्न सिरों न देणें, राजश्री स्वामीची आज्ञाहि असीच आहे म्हणून लिहितात. यांचेहि कागदपत्र माणसें जाणें येणें रावता दाट आहे. राजश्री स्वामी व उपाध्यबावा व यशवंतराव गायकवाड यांचे विचारें खामखा स्वामीकडील मामलीयत सजवावी, परंतु राजश्री गोविंदरावजीचे विद्यमानें बोली ठरली आहे त्याप्रमाणें ठरवावें हा त्यांचा विचार. मुराररायास तिन्ही संस्थानचा प्रसंग दखल. ते गोष्टीचा मजकूर बोलतात कीं, आमचे यैवज आम्हांस करार आहेतच. त्यासिवाय जबरदस्तीनें जाजती तहरह होईल तेव्हां हिश्यावाब्यांमुळें आम्हांसच च्यार रुपये अधिक मिलतील, सावनूरची चौथ सरदेशमुखी वाजिबी अमल करूं. सर्वार्थे आमची किफायत आहे. हे करावें व खामखा करूं. अंतरबाह्य बोलतां येसें बोलतात. बाईसाहेबांचे बोलण्याची दिनचर्याच लिहिली आहे. घोरपड्याबावत व संस्थानचे मोर्तोदेचा[1] यैवज वजा करून मामलीयत ठरऊन घ्यावयाची गोष्ट पेशजी भटजीनी बाईसाहेबास श्रुत केली नाही. सेवकें मनुष्यमुखें

---

१ महर्धतेचा ; मर्यादितपणा (?)

बाईसाहेबांस श्रवण करविली होती. त्याचें उतर सांगोन पाठविले तें पेशर्जी सेवेसी लिहिलेच आहे. समक्ष बोलावयाचा प्रसंग प्राप्त होतेक्षणी बोलोन जे उतर होईल तें मागाहून सेवेशी लिहून पाठवितों. सेवकास स्वामींचे चरणाचा वियोग नसावा हे वासना सेवकाची. असें असतां ज्या मंडलीस वेजार होऊन निघालों आहे त्याच मंडलींत प्रथमता कार्यास येणे प्राप्त जालें आहे. हरि संकल्प. स्वामीचे चरण दृष्टीस पडतील तो सुदिन आहे. सेवेशी श्रुत होंये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji reports that Murarrao and Jijabai were at one regarding the taking over of the management of the province in the South, though the former was asked not to interfere with it. " Shahu and his senior queen also desired that the Peshwa should not be allowed to have anything to do in the South", says the writer.*

---

*No. 30*] [*26-12- 1748?*

पौ छ १८ मिनहू

जाबसूद

## श्रीराम

### राजश्री त्रिंबकराऊ विश्वनाथ गोसावी यांसी

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति उमाबाई दाभाडे दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणऊन स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते राजश्री बाळाजी गोविंद यांणी जबानी सांगितलेवरून कळले. ऐसीयास कितेक मायाममतेच्या गोष्टी सांगोन पाठविल्या तर तुम्ही पुरातन आमचे मायेचेच आहां, तेथे विस्तारे लिहावें ऐसे नाहीं. कित्येक मजकूर राजश्री बाळाजी गोविंद जबानी सांगितील त्याजवरून कळेल. सरसुभेच्या कागदाविसी तुम्हांस सांगितलेच होते, आपणही मान्य केलेच आहे. तर सरसुभेयाचा कागद पाठऊन द्यावा म्हणजे सरसुभा सालस माणसास सांगोन पाठऊन. तुम्ही आपल्याकडील कमाविसदारास ताकीद करऊन ज्या प्रो चालत आले आहे त्या प्रों देवणे. म्हणऊन ताकीद आपल्या कमाविसदारास लिहिणे. वरकड कितेक मजकूर मारनिले आपल्यास सांगतील त्याप्रो कार्य करून पाठविले पाहिजे. रा छ १६ माहे मोहरम. बहुत काय लिहिणे ? लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Umabai Dabhade asks Trimbakrao Vishvanath Pethe to despatch at once the papers regarding the appointment of the sarsubha.*

No. 31] [November 1749

श्री

राजश्री पंतप्रधान
गोसावी यासी

श्रीसकलगुणअलंकरण अखंडितलक्षुमीआलंकृत राजमान्य श्री सिदोजी थोरात कृतानेक दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लेखन करावया आज्ञा करीत गेलें पाहिजे विशेष. या प्रांतींचें वर्तमान तरी माहाराज करवीरवासी करविरीं आहेत. बाईसाहेव कोंडोलीस गेली होती तिकडून येमाणा चिकोडीकर जमाव सुधां आले. भेटी जाली आणि मावारे राणोजी घोरपडे यासी आणावयासी गेले. त्याची व बाईची भेट करावी, तैसेंच चव्हाणाकडेहि राजकारण केलें आहे. त्या विचारांतहि येमाणा आहेत. चव्हाण इंगलीवर रायबागनजीक उतरला आहे. पुढें काय तिकडील मनसवा होईल तो सेवेसीं लिहून पाठऊं. येथील बंदोबस्ती करून तांदुलवाडीवर मुकाम करून राहिलों असों. वरचेवरी जें वर्तमान होईल तें सेवेसी लिहून पाठऊं. कललें पाहिजे. विशेष काय लिहिणे ? कृपा निरंतर असों द्यावी हे विनंती.

¶*Sidoji Thorat reports to the Peshwa the plans and movements of Sambhaji of Kolhapur and of Udaji Chavan.*

---

No. 32] [November 1749

श्री

श्रीमंत राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी

सेवक संकराजी राम विज्ञापना येसीजे. स्वामींनी आज्ञापत्र छ २६ जिलकादचें पाठविलें तें छ ११ जिल्हेजी दोहों प्रहरां पावलें. तेथें आज्ञा जे, मातुश्री उमाबाई दाभाडे सततरुसीस[1] कधीं येणार व कोणत्या मार्गीं म्हणून आज्ञा. त्यास मातुश्री उमाबाई तों प्रस्तुत राजश्री दमाजी गाईकवाड याचे लस्करांत देहिवेलींत राजश्री माधवराव निंबाजी याचे घरीं आहेत. वीस रोज होत आले, आद्यापि गुंता उरकत नाहीं. गुंता काये म्हणावा तरी कर्जदाराची समजाविसी करावी, शागीर्द-पेशाची जाबसालाची समजाविसी करावी व सातारियास जावें लागतें त्यास पंचवीस लक्ष रुपये पाहिजेत, यास्तव येथें येऊन राहिली आहे. परंतु तूर्त काही

---

१ खानदेशांत.

याचें येणें होतां दिसत नाहीं. मातुश्रीनी आम्हास नेऊन स्वमुखें सांगितलें कीं, आम्हास माहाराजाची व देवडींची बोलावणी येतात. राजश्रीस समाधान नाहीं, प्रसंगी असावें हे गोष्ट प्रमाण. परंतु श्रीमंत राजश्री पंतप्रधान याचा व मातुश्री सकवारबाईचा कटाक्ष फार वाढला. आम्ही तेथें जावें त्यास मातुश्री सकवारबाई साहेबांकडे व्हावें त समई राजश्री पंतप्रधान यांच्या स्नेहास आंतर पडे. ते आज राज्यांत भारी, यास्तव आम्ही सातारियास तूर्त जात नाहीं. श्रीकृपेनें राजश्रीस आरोग्य जाहलियाउपरी सर्वहि गोष्टी घडोन येतील. नाहींतर तसाच प्रसंग ईश्वरें केला तर दाहावीस हजार फौजेनसीं राजश्री पंतप्रधान यांजकडे जाऊं. तावत्कालपर्यंत तेथून कूच करीत नाहीं, याप्रमाणें बोलिलीं आहेत. हें वर्तमान सेवेसी लिहिणार होतों त्यास जासूद आज्ञापत्र घेऊन आले. तेथें कांहीं तूर्त फौज नाहीं. नवीहि ठेवीत नाहींत. दाभाडे व गाईकवाड मिलोन लाहानमोठे दोन आडीच हजारपर्यंत होतां प्रयास आहेत. राजश्री दमाजी गाईकवाड व माधवराव निंबाजी यांचे चित्तीं स्वामीच्या पायांसी आंतर न करावें यैसा येकनिष्ट-पणें बोलतात. वरकड अधिकोत्तर वर्तमान कांहीं नाहीं. सेवेसीं विदित होय हे विज्ञप्ति.

¶*Shankaraji Ram to Bhausaheb, informing him that Umabai is staying in the camp of Damaji Gaikwad at Dahiwal with a view to finding 25 lacs for the settlement of debts and outstanding claims. He adds that Umabai is not likely to proceed to Satara, as in that case she will have to stay with Sakwarbai, which she does not want to do for fear of incurring the displeasure of the Peshwa. 'She will', he says, 'go there when the King improves in health.'*

---

*No. 33*] [*13-11-1749*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंत भाऊ**

**स्वामीचे सेवेसीं**

विनंती. सेवके शामजी येमाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत कार्तिक वदे प्रतिपदा इंदुवार मुकाम पानगांव स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री येमाजी शिवदे यानी शिरोळचें ठाणें घेतलें. अंताजी सिवदे यास पत्र पाठविलें, आपण ठाणें घेतलें, राजश्री बाजीराव[1] यास घेऊन सतरुसीस जाऊन फौज पाठवितों, तुम्ही राजपुत्रास घेऊन येणें म्हणून लिहिलें. त्यास अंताजीपंतानी तें पत्र आपलें पत्र ऐसें कमलोजी मुलें (मुळीक) यासी पाठविलें कीं, तुम्ही पानगांवकरास पष्ट विचारणें, राजपुत्रास

१ भगवतराव अमात्य.

पाठवणें, मोगल जवळ आला अस, तेथें मूल ठेवणें कामाचें नाहीं, म्हणून लिहिलें. तें पत्र आणून राजपुत्रास दाखविलें. मग यास विचारलें कीं, यास उत्तर काय द्यावें? मग राजपुत्रानीं येमाजीपंताचे पत्राचें उत्तर यास दिल्हें कीं, आमचा जावसाल मातुश्रीस विचारणें. मग मातुश्री तुळजाबाई (?) पासी न्यायधीश व मुळीक गेले, त्यास विचारलें. त्यानी उत्तर दिल्हे, आपण बातमीस माणसें सप्तरुसीस पाठविलीं असत. माहाराजास आरोग्यता जाहलियावेगळें राजपुत्रास पाठवीत नाहीं म्हणून उत्तर दिल्हें, आणि कमळोजी मुळीक यांस वाटे लावणें. मग राजपुत्र यानी विचारलें, कमळोजी मुळीक आम्हांपासीं मुदामी राहवयास आले अगर आम्हास न्यावयास आले अगर आम्हांपासी असावें? त्यास मातुश्री म्हणाले, आपले पदरचा खर्च खाऊन तुम्हास खर्चास देऊन फुकाची चाकरी करितील तर सुखरूप राहोत. आपण कांहीं याबरोबर वाटे लावीत नाहीं आणि यांस राहा म्हणत नाहीं, ऐसें उत्तर द्वादसीस संध्याकाळीं दिल्हे. मग आपले बिऱ्हाडास गेले. राजपुत्र यानी आपला ब्राम्हण सप्तरुसीस मातुश्री ताराबाईकडे पाठविला तो येकादसीस संध्याकाळीं आला. पांचवे दिवसी येथे दाखल जाहला. राजपुत्रास मातुश्रीनीं सांगून पाठविले, विना राजश्रीस आरोग्यता जाहलियावेगळे तुम्हीं न येणें. तैसेंच दर्याबाईस सांगून पाठविलें, तुम्ही मुलास न पाठवणें. श्रीमंत राजश्री नानासाहेबाची भेट घेतली, त्यानी बहुत मायेच्या गोष्टी सांगितल्या, म्हणून राजपुत्रासी सांगत होता. मोगलांची फौज भारी. मंगरूळ परगणे नळदुर्ग येथें असतो. दोन मजली पुढें गेलियावर अंताजी सिवदे यानी फौज सुधां पानगांवास यावें ऐसें असे. आणीकहि आपला विचाराचें सूत्र मोंगलाकडे अंताजी सिवदे यानी आपले ब्राह्मण वस्त्रें नजर कांहीं पाठविलीं अस. आपण आज्ञा केलियाप्रमाणें सेवेसीं निवेदन केलें अस. आणीक नूतन वर्तमान होईल तें सेवेसीं निवेदन करूं. स्वामीचे आज्ञेप्रमाणे वर्तणूक करूं. याचप्रमाणें राजश्री बहिरोपंत याचीहि आज्ञा अस. परंतु राजपुत्र म्हणतात आपणांस तीन जीव. निराळे कोन्हाचा इतबार येत नाहीं. माहाराज व मातुश्री व नानासाहेब यासिवाय आपण कोन्हाचा इतबार धरीत नाहीं. जें करणें तें श्रीमंताचे विचारें करावें ऐसा यांचा हेत असे. पेसजीं पत्र पाठविलें त्यास कागद चांगला नव्हता म्हणून सेवकापासून अंतर पडलें. या गांवात चांगले कागद मिळत नाहीं. राजश्री जानोजी निंबाळकर याचे नेत्र बरे जाहले. पंचमी करून लस्करास जाणार असत. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

¶*Shamji Yemaji informs Bhausaheb that the Prince (Ramraja) on the strength of his confidence in the Peshwa returned a flat refusal to the agent of Yemaji Shivdev when the latter offered to escort him to Satara.*

No. 34] [21-12-1749 ?

श्री

राजश्री पंतप्रधान

गोसावी यासी

श्रीसकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो सिदोजी थोरात कृतानेक दंडवत विनंती. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करावया आज्ञा केली पाहिजे विशेष. पूर्वील पत्रीं आज्ञेप्रमाणें तांदुलवाडीस येऊन मुकाम केल्याचें सविस्तर वर्तमान लिहिलें होतें. विदित जाहालेंच असेल. आजी छ २१ मोहरमी गुरुवारीं माहाराज राजश्री स्वामी करवीरवासी वडगांवीहून कूच करून करविरास आले. समागमें च्यारसें स्वार, दोनसें प्यादा, राजश्री आबाजी घाटगे कागलकर येैसे आहेत. याउपरी आम्हास आज्ञा काये करणें ते केली पाहिजे. आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं. राजश्री उदाजी चव्हाण थोरले उगारनजीक कुडची येथें हजार फौजेनसी आहे. त्याचे जासुदाची बातमी येथें आली होती. आमचीहि बातमी गेली आहे, वर्तमान तहकीक आलेवर लेहून पाठऊं. बहुत काय लिहिणें ? कृपा निरंतर असों द्यावी.

¶*The movements of Sambhaji of Kolhapur and of Udaji Chavan are communicated to the Peshwa by Sidoji Thorat.*

---

No. 35] [17-12-1749

श्री

राजश्री पंत प्रधान

गोसावी यांस

श्रीसकलगुणअलंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्नो सिदोजी थोरात दंडवत विनंती उपरी. येथील कुषळ जाणून स्वकीये लेखन-आज्ञा निरोपीत असिलें पाहिजे विशेष. माहाराज छेत्रपति कैलासवासी जाहले म्हणून वर्तमान कळलें. ईस्वरें अनुचित गोष्ट केली, परंतु मनुष्य येत्न नाहीं, ईश्वरइच्छा प्रमाण आहे. यानंतर करवीरवासी माहाराज राजश्री येणार म्हणून चिरंजीव सिवाजी थोरात व आणखी लोक रवाना केले. चिरंजीवाचे अगोधर पत्र आम्हास आलें त्याजवरून फौज सुधां तांदुलवाडचे उतारावरी येऊन राहिलों. चिरंजीव व इत्यादिक तेहि येऊन पोंहचले. माहाराज स्वामीनी यावयाचा दृढ

निस्छेये करून कोलापुराहून निघोन वडगावास आले. सोमवारी नदीपार होऊन आलेकडे यावें तों उतारास आम्ही पोहचलों. त्यांची बातमी, तेथें गेलियानंतर स्थिर जाहले. आमची बातमी तेथें आहे. माहाराज बोलतात जे, आम्ही निघोन जातों, आपले वाटे कोण जाणार आहेत, यैसें बोलतात. परंतु यावयाचा प्रसंग दिसतो. येद्यापि येऊं लागले तरी आज्ञेप्रमाणें सेवेसीं अंतर होणार नाहीं. उदाजी चव्हाण व मुधोलकर व चिकोडीकर येकत्र होऊन करवीरास येणार म्हणून वर्तमान आले आहे. तहकीकांत वर्तमान आणून लिहून पाठवितों. स्वामीचे पुण्येंकरून आवघे पराभवतें पावतील. वरकड कितेक अर्थ राजश्री भास्करपंतानी लिहिलेवरून विदित होईल. कलले पाहिजे. कृपा असों दीजे हे विनंती.

¶*Sidoji Thorat expresses his regret at the death of King Shahu. He intimates to the Peshwa that Sambhaji has advanced as far as Vadgaon and if he proceeds further on towards Satara, he will find his way blocked by the army posted by the writer as instructed by the Peshwa.*

---

*[19-12-1749*

*No. 36]*

छ २२ मोहरम

प्रात:काल

**श्री**

**श्रीमंत माहाराज राजश्री**

**पंतप्रधान स्वामीच्या शेवेसी**

विनंती शेवक उभयेतानी सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता मार्गसीर्ष वद्य षष्ठी इंदुवार मुा पानगाव येथास्थित असे विशेष. रा इंदरोजी कदम येथें सीनेवरी फौजसुधां येऊन पोहचले आहेत. त्यांजकडून रा हरि गोपाल सुपेकर आम्हाकडे आले. त्यानी वर्तमान येथील तपसीलवार मनासी आणिले. आम्ही निवेदन केलें. बंदोबस्ती येथास्थित आहे. मातुश्री दर्या-बाईचे मानस स्वामीकडे आहे. विकृति कोणेविसीं नाहीं. सांप्रत कारभारी हे सुरलीतच आहेती. कमलोजी मुलीक वगैरे कोण्हीं होते ते मागील चहु रोजांत गेले. न्यायाधीष यानी येक घोडी व ढालकटार देऊन उपार्जना करीत बैसले आहेत. जावयाचे त्यांच्या मनांत नाहीं. रा प्रतिनिधीकडील चिटनि-साचा बंधु काही वस्त्रे किंचित द्रव्य घेऊन आला आहे. त्याविसीं आम्ही बहुतेक विक्षेप घालीतच आहों. याप्रकारचे येथील सविस्तर. वरकड कोणाचे अनुसंधान नाहीं. याउपरी मातुश्री दर्याबाई यांचा मानसशोध आपण पाहिला

कीं, श्रीमंत पेशवे यानी राजपुत्रासी न्यावयाचा उद्देश धरिलाच तरी काये विचार ? त्यानी परिछिन उतर दिल्हे कीं, मातुश्री ताराबाई अथवा श्रीमंत पेशवे अथवा त्यांचा बंधु याजमधील कोण्ही येक आलियाखेरीज राजपुत्राचे जाणें घडत नाहीं. संकेत स्वामीस विदित व्हावा याजकरितां शेवेसी निवेदन केलें असे. याउपरी छ १७ मोहरम रविवारी मध्यरात्रीं रा। इंद्रोजी कदम यांजकडील स्वार पानगावांसी येऊन पोहचले. त्यानीं राजश्रीची निधनवार्ता निवेदन केली ती संपूर्ण क्षेत्रासी विदित जाली. येथून काये मजकूर तो लेखन करूं. येक दोनी पत्रें मागें स्वामीकडे पाठविलीं त्याजवरोन येथील भाव ध्यानांत आलाच असेल. आपणाकडील प्रत्योत्तर कांहीयेक न आले. त्याचा मार्ग लक्षून आहों. अति सत्वर आज्ञापत्र पाठविलें पाहिजे. शेवेसी विदित होये. कृपालोभ करीत जावा हे विज्ञापना.

¶*The Peshwa is informed of the arrival of Indroji Kadam at Pangaon bringing with him the news of the death of King Shahu. The Pratinidhi also, says the writer, sent robes of honour and some money, but Daryabai is not willing to hand over the prince unless some one of these three—Tarabai, the Peshwa or his brother—comes there in person to take him to Satara.*

---

*No. 37*] [*25-12-1749*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंत**
**प्रधान साहेबांचे सेवेसी**

विनंती. सेवक दमाजी गायेकवाड समशेरबहादूर दंडवत विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ २९ माहे मोहरमपावेतो येथास्थित असे विशेष. माहाराज राजश्री स्वामी यांस मार्गसीर्ष वद्ये त्रितिया भृगुवारी वैकुंठवास केला म्हणून वर्तमान यैकिले, त्यावरून परम चितास खेद प्राप्त जाला. तो विस्तार पत्रीं कोठवर ल्याहावा ? बहुत अनुचित जाले. यास उपाये नाहीं. ईश्वरी सता प्रमाण, हा विचार आपण विवेकेंकरून जाणत आहेत. आता आपला धीर भरोसा सर्वास. आपण सर्वांस वडील आहेत. तेथील मजकुरानरूप जे आज्ञा वडीलपणें कर्तव्य ते करीत जावी, आपले विचारासिवाये आन्य गोष्टी आहेसे नाहीं. सर्व मंडली आमचे येजमान सर्व अद्याप येथेंच आहों. याउपरी आपले पत्र येईल तदनरूप वर्तणूक होईल. पूर्वी राजश्री संकराजी राम याजबा। सेवेसी पत्रें पाठविली

ते पावलींच आसतील. त्याचे प्रत्योतर आज्ञा जाली नाहीं. सांप्रत जे आज्ञा कर्तव्ये ते आज्ञापत्रीं प्रत्योतरीं सांभाल करावा. तेणेप्रमाणे वर्तणूक करून कृपेची वृधी केली पाहिजे हे विज्ञापना.

¶*Damaji Gaikwad expresses his sorrow at the sad news of the death of Shahu and assures the Peshwa of his co-operation in his future programme.*

---

*No. 38]* *[28-12-1749*

परत करण्याचे

रु. ४८६

**श्रीशंकर**

सहश्राये चिरंजीव राजश्री खंडो प्रति सौ काकूबाईने कृतानेक आसीर्वाद उपरी. येथील क्षेम ता॥ मार्गेसीर्ष वद्य ३० जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशष. बहुत दिवस जाले, परंतु स्मरणपूर्वक पत्र न पाठविले. त्यासी एक दोन पत्रे श्रीमंत आले त्याजवरून कलो आले. त्यासी इकडील वर्तमान सतरुसीस श्रीमंत माहाराज राजश्री देवआज्ञा जाली. त्यासी हे वर्तमान पूर्वी संभु खिजमतगार याजबरोबर लि॥ त्याजवरून कललेच आसे. माहाराजाची राणी सेकवारबाई तेहि त्याजबरोबर सयागमण आ(जा?)लीत. श्रीमंत राजश्री पंत प्राधान हे फौज दाहावीस हजारानसी सातान्यास बंदोबस्तीणे आहेत. तुम्ही आपले जागा फार खबरदारीणे राहणे. त्या प्रातीचे लोक बहुत हरामखोर आहेत, म्हणून तुम्हास फार फार पत्री लि॥ आहे. त्यासी आपल्या ठान्याठुन्यात बहुत सावधता असून कामकाज उतम करणे. चिरंजीव रावजीचे लग्नाचे हा कालपावेतो कोठे नेमस्त नाही. त्यासी हिसेब कितेब दरबारी विल्हे लागलियावर मग लग्नाचा विचार होईल, त्याजप्रा॥ तुम्हास लिहून पाठऊ. साराश गोष्टी की तुम्ही आपल्या जागा सावध राहणे.

¶*The death of King Shahu and the presence at Satara of the Peshwa with a force of 10 or 20 thousand are the items mentioned in this private letter written by one Kakubai to Khandoba.*

---

*No. 39]* *[1750*

**श्री**

यादी सरंजाम मातुश्री आईसाहेब सुरू इहिदे खमसैन मया अलफ

रुपये

७००० राजश्री पंतप्रधान पैकीं

२००० गांव द्यावा

५००० नख्त द्यावे.

७०००

| | |
|---|---|
| २२००० | राजश्री पंतप्रतिनिधिपैकीं |
| | १७००० ऐवज बावती |
| | ५००० गांव द्यावे. |
| | ——— |
| | २२००० |
| १०००० | राजश्री फतेसिग भोसले यांजकडून द्यांव. |
| १०००० | राजश्री रघोजी भोसले सेनासाहिब सुभा यांपैकीं. |
| ३००० | किता सरंजाम देहे |
| | १००० कुसाजी येसाजी भोसले पैकीं देहे |
| | १००० सोमवंसी पैकीं देहे |
| | १००० थांडे पैकीं देहे |
| | ——— |
| | ३००० |
| ३००० | राजश्री बाबूजी नाईक पैकीं नगत रुा द्यावे |
| ——— | |
| ५५००० | |

¶*The details of an allowance to be fixed for Tarabai and its apportionment are specified in this paper.*

---

*No. 40]* *[1750*

रु. नं.

१६५८

श्री

यादी मातुश्री आईसाहेब याजकडे खासगीस वसुली सरजाम द्यावा सुा खमसेन मया व अलफ

रुपये

७५०००

* * * * लाव चार गाव गाव मिलोन ऐवज वसुली भरुन द्यावा क+रार

¶*Rs. 75,000 is proposed as an allowance for the private expenses of Tarabai.*

---

+ हीं अक्षरें रामराजाच्या हातचीं असावींत असें दिसतें.

No. 41] [25-8-1750

रु. नं.

१६५८

श्री

यादी राजश्रीनी आईसाहेबास नेमणूक सरंजामाची केली तिची नेमणूक वसुली,

| | |
|---|---|
| २०००० | प्रधान पंत |
| १०००० | सचिव |
| २०००० | फतेसिंगबावा |
| १०००० | खासगी |
| १०००० | प्रतिनिधि |
| ५००० | दाभाडे |
| ७५००० | |

यादी नानासाहेबानी नेमणूक आई साहेबाची वसुली,

| | |
|---|---|
| ३०००० | प्रतिनिधि |
| ४००० | खासगी |
| १०००० | दाभाडे |
| ६००० | पवार |
| ५००० | प्रधानपंत |
| ५००० | फतेसिंग |
| ६०००० | |

सुा इहिदे खमसैन मया अलफ. दर जागा पुणे बंगला राजश्रीकडील कारभारी देखील. छ ३ सवाल.

¶*Nana saheb Peshwa herein fixes the allowance of Tarabai and apportions it between the sardars mentioned.*

---

No. 42] [1750

रु. नं.

१६५८

श्री

यादी नेमणूक मातुश्री आईसाहेब

| राजश्री पंतप्रधान | राजश्री प्रतिनिधि |
|---|---|
| ७००० | २२००० |

| ता॥ | ता॥ |
|---|---|
| २००० गाव | १७००० बाबतीं |
| ५००० नख्त | ३००० गाव |
| ७००० | |

राजश्री फतेसिंगबाबा
१००००

राजश्री रघोजी भो॥
१००००

किता गाव

१००० येसाजी कुसाजी
१००० सोमवंशी
१००० बांडे
३०००

राजश्री बाबूजी नाईक
पैका ३०००

¶*This paper mentions the allowances of Tarabai as apportioned among the different sardars. This should be taken in conjunction with the preceding ones.*

---

*No. 43*] [*1750*
रु. नं.
१६५८

**श्री**

यादी मातुश्री आईसाहेब यास सरजाम वसुली नेमून दिल्हा :—

७००० राजश्री पंतप्रधान
२२००० राजश्री पंत प्रतिनिधि ऐवज बाबती
१५००० राजश्री फतेसिंग भोसले
५००० दाभाडे
५००० रघोजी भोसले
१००० सरलस्कर
१००० येसाजी भोसले
१००० सोमवंसी
१००० बांडे
३००० बाबूजी नाईक
६००००

येणेप्रमाणे साठ हजार करार.

¶*Ramraja fixes the allowance of Tarabai with specified contributions from the various sardars.*

---

+ हीं अक्षरें रामराजाच्या हातचीं असावींत असें दिसतें.

No. 44] [1750

रु. नं.

१६२८

नकल

श्री

यादी मातुश्री आईसाहेब यांस सरंजाम जमाव वसुली

| | |
|---|---|
| ३०००० | प्रतिनिधीपैकी |
| १०००० | दाभाडेपैकी |
| ६००० | पवारपैकी |
| ४००० | तन्हीही खासगीपैकी |
| ५००० | फतेसिंगबावापैकी |
| ५००० | राजश्री प्रधानपंतापैकी |
| ६०००० | |

¶*The net cash allowance of Tarabai is mentioned in this paper. (See No. 41 above.)*

---

No. 45] [17 Jan. 1750 ?

**श्रीरामो जयति**

**श्रीमंत माहाराज मातुश्री आई साहेब साहेबांचे सेवेसी**

विनंती. सेवक आज्ञाधारक येशवंतराऊ माहादेव खासनिवीस कृतानेक विज्ञापना. ताा पौष्य बहुल शष्टीपर्यंत साहेबांचे कृपादृष्टीकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशष. साहिबीं कृपा करून संक्रमणाचे तील शर्करायुक्त थैली पाठविली ते उत्तम समई प्रविष्ट होऊन आनंदावाप्ति जाहाली. आज्ञेप्रमाणें तिल शर्करा स्वीकारिली. सदैव पत्रीं सनाथ करणार साहेब धणी आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Yeshvantrao Mahadev Khasnavis sends to Tarabai his greetings for the season of Makar sankrant.*

---

No. 46] [Jan. 1750 ?

**श्रीराजाराम माहाराज रघुवीर**

विनंती उपर. मातुश्री आईसाहेबांची मर्जी कैसी आहे? चिरंजीव मुलास घेऊन दर्शनास येतो. अर्ज करणे. मायेबाप धणी देव गुरु आमचा आहे

दुसरे दैवत आश्रा आधार नाही. आम्हास वडिलाचे पायाप्रों वर्तावे लागते. सुख करून उठली आसली तर सत्वर उतर पो. अद्याप भोजन केले नाही. हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya requests to be informed whether Rani Tarabai was disengaged and free to receive a visit from him.*

---

*No. 47*] [*11-1-1750?*

पो छ २८ सफर

**श्री**

श्रीसकल तीर्थस्वरूप माहाराज मातुश्री आई-
साहेब साहेबाचे शेवेसी

अपत्यें मुधोजी नाईक निंबालकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल तागायेत छ १३ माहे सफर जाणोन यथास्थित असे विशेष. बहुत दिवस जाले. वडिलांकडील पत्रे येऊन वर्तमान अवगत होत नाहीं तर क्षणक्षणां आर्सार्वादपत्र पाठऊन चितास संतोश पावीत गेले पाहिजे. उपरी सदासिव साखरसेव्या यांच्या सेव्येपणाचा मजकूर लिहिला तर आपण वडिलाचे आज्ञेसिवाय काय आहे? आज्ञेप्रमाणें त्यांच्या स्वाधीन केले असे. आपणहि कूच करून मोगलाच्या शैन्यात छ मारी गेलों. वडिलास कळावें म्हणून लिहिले असे. सेवेसी शृत होय हे विज्ञापना.

¶*Mudhoji Naik Nimbalkar of Phaltan (1748–63) is seen in this letter helping the Nizam by order of Tarabai, evidently against the Peshwa.*

---

*No. 48*] [*15-2-1750?*

**श्रीवेंकटेश**

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब
साहेबाचे शेवेसी

विनंती. सेवक जिवाजी शामराव निा बंडगर विज्ञापना. ता छ १८ रबिलोवल-पर्यंत साहेबाचे कृपेंकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. साहेबी आज्ञापत्र सादर केले. तेथे आज्ञा की, किले वसंतगडास वेढा बसविला त्यास किल्यास वेढा बसवावयास सेवकास प्रयोजन काय आहे? सेवकाचे राऊत मौजे

---

१ निद्रा.

चरेगावास गेले होते. त्यास वसंतगडकरी याणीं धरून नेऊन हाणमार बहुत केला. त्यास साहेबी गडकरीयास ताकीद करून सेवकांचे राऊत सोडून देवणार साहेब धणी आहेत. सेवकाकडून साहेबाचे सेवेसी अंतर किमपि होणार नाही. सेवेसी श्रुत होय हे विनंती.

¶*Jiwaji Shamrao gives an explanation to Tarabai why he laid siege to Vasantgad.*

---

*No. 49*] *[15-2-1750*

पौ छ १९ राखर

**श्री**

**श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब**
**साहेबाचे सेवेसी**

विनंती. सेवक तुळाजी आंगरे सरखेल कृतानेक विज्ञापना. ता। माघ बहुल पंचमी गुरुवासर पावतो साहेबाच्या कृपावलोकनेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित आसे विशेष. साहेबाचे सेवेसी संक्रमणप्रयुक्त तिळशर्करा खलेती[1] येक पाठविली आहे. कृपाळु होऊन स्वीकार केल्याचे आज्ञापत्र सादर करवणार साहेब धणी समर्थ आहेत. सेवकास साहेबांच्या पायाविना अन्य दैवत आहे ऐसे नाही. वडील परंपरागत सेवा घेऊन चालविले त्याप्रमाणे सेवकाचे हातून सेवा घेऊन गौरव करून उर्जित करणार साहेब समर्थ आहेत. सेवेसी निवेदन जाहले पाहिजे. हे+ विनंती.

¶*Tulaji Angria sends Tarabai the customary New Year's greetings of tilgul, with the compliments of the season.*

---

*No. 50*] *[7-3-1750 ?*

छ १० राखर

**श्रीआईआदिपुरुष**

सेवेसी विज्ञापना. ता। छ ९ रविलाखर सौम्य त्रितीय प्रहर साहेबांचे कृपेकरून वर्तमान येथास्थित आसे विशेष. सिरवळ प्रांती हुजुरून लोक जाऊन धामधूम जाली याजकरितां पुणियाहून फौज राजश्री प्रधानपंत याची निघोन नीरेवरी येऊन मुकाम केला होता. वर्तमानहि बातमीचे साहेबाचे सेवेसी विनंत

---

१ खलेती = पिशवी. + बाळबोध अक्षरें तुळाजीच्या हातचीं.

जालेच आसेल. प्रस्तुत फौज वाटाखाले आली आहे. छ मजकुरी घाट चढोन फौज वरती येणार म्हणून वर्तमान यैकतों. त्यास आम्ही तो कूच करून पाहाटे जातो. त्याची फौज सनिध राहिलियाने साहेबाच्या चितात विक्लत येईल येईल[१]. त्यास तो नाइकाच्या फौजेच्या शहावरी राहाते लागते म्हणू (न) जनवार्ता आहे. त्यास हेहि संकट चितांत येऊन सेवेसी विनंतीपत्र पाठविले आहे. याचा विचार करणे तो साहेब करितील. सेवकास आज्ञा होईल त्याजप्रमाणें वर्तणूक केली जाईल. सुचला आर्थ लिहिला आसे. साहेबाजवली लोक सांगतात जे, मदतीस फौज यांनीच आणिली. आसियास त्याचे फौजेचे आगत्य आंम्ही धरिले किंवा नाही हेहि साहेबांस विदितच जाले. पुढेहि आम्हास त्याचे फौजेचे आगत्य काये आहे? परंतु आम्ही सेवक लोक सुचला अर्थ ल्याहावा म्हणून लिहिला आहे जे, राजश्री दिनकरपंत यासी सांगोन त्यांची पत्रें फौजेच्या सरदारास पाठवावी जे, तुम्ही राजश्री प्रतिनिधिसमागमे फौजसुधा चव्हाणाच्या पारपत्यास जाणे ऐसे पत्र राजश्री दिनकरपंत याचे आलियास आम्ही त्याजकडे येक भला माणूस पाठऊन फौज आली तरी त्या प्रांतास घेऊन जाऊ. साहेबाची आज्ञा होईल त्याजप्रा विचार केला जाईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶The Pratinidhi asks Tarabai for a large force to be sent with him on his expedition against Chavan, which the writer had undertaken.*

---

*No. 51]* *[9-3-1750?*

**श्री**

**श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेबाचे सेवेसी**

आज्ञाधारक खंडेराव कासी न्यायाधीश कृतानेक विज्ञापना येसीजे. चिरंजीव राजश्री देवराव याचा लग्न फालगुण शुध १३ त्रयोदशीस निश्चय केला आहे. शरीरसमध राजश्री येमाजीपंत चिकोडकर यांसी केला आहे. तर साहेबी चिरंजिवाचे साहित्य करून रवाणिगी केली पाहिजे. बहुत काय लिहिणे. हे विज्ञापना.

*¶An invitation to Tarabai from Khanderao Kashi for the marriage of his son Devrao.*

---

१ हा शब्द दुबार पडला आहे.

No. 52] [10-3-1750?

## श्रीराजाराम रघुवीर.

विनंती उपर. सिमगा आला. उदैक होली. येक तिरुका खर्चास नाही. धणियासी कोणी अर्ज करीत नाही. रा बाबाजीस स्मरण नाही. आम्ही काये करावे? इलाज नाही. दरमाहापैकी दोन महिने बाकीस आहेत. मुंजीस ठावच नाही. श्रीदेवाचा उछाह आला. वाणी उच्यापत देत नाही. उदमी सनंग देत नाही. मातुश्रीस अर्ज करणें. रा बाबाजीस विनंती करणें. सेवटी चिठी वाचून दाखवणें. तुम्ही विदेही न होणे. आमची फजिती होत आहे. रांडा-पोरास अन्न आजी दोन महिने नाही. मातुश्रींनी निर्दया केली आहे. काये निमित्य हे पुसावे हे विनंती. बाबू नाईक यास वस्त्रे देणार ते (फाटले).

¶*Bhagwantrao Amatya describes his unhappy condition and requests help.*

---

No. 53] [March 1750

## श्रीराजाराम रघुवीर

विनंती उपर. आपण थोर लोक आहेत. आम्ही या राज्यातील पुरातन ब्राह्मण गरीब लोक निराश्रित आहो. माहाराज याचे दयेस्तव या राज्यात आलो. सर्व राज्यभारी आपण आहात. येख्तियार धणियानी आपणावर दिला आहे. आम्हावर दया करावी, माया धरावी, हे उतम आहे. आम्ही बेइतबारी नव्हो. विश्वासघातकी लोक नव्हो. आपणाजवली विनंती केली परंतु दया माया धरीत नाही, हे ईश्वरास न माने. मातुश्रीस पुसावे. आम्ही येकवचनी लोक धणियाचे दये * * चे आहो. दुसरे काही कलत नाही. अनाहुत आहो. बेसरं-जामी हुदा मामला दौलत माहाराजाची आहे. आम्ही बारगीर आहो. आपण मध्यस्त होऊन विठलपंत दिवाण पा, आग्रहे आणिले. आद्याप दाद नाही. च्यार हजार रुा दिविले. हा तिसरा महिना चालिला. चिरंजिवाची मुंजी प्राप्त जाली. कर्जवाम करून केली. संकट धणियासी व आपणास आहे. अन्न-वस्त्राची खर्चाची बेगमी करावी. उतणे मातणे आम्ही नव्हो. वरकडाप्रो आम्हास लक्षू नयेत. कारभार मनसबा काही कलत नाही. आपण इमान शफत दिली आहे त्याचे स्मरण धरून दया करावी. आम्हापासून चूकवाक बोलीमध्ये जाली आसेल तर क्षमा करावी. ब्राह्मण आहो. विनंती चालवावी. चिरंजीव

---

मुलास ठेऊन चालवावे. आम्ही निकामी, वृध, कार्याचे नसिलो तर निरोप द्यावा; जाऊ. हे विनंती.

¶*Bhagwantrao (writing probably to the Peshwa) reminds him of his former promises and begs support.*

---

*No. 54*] [*April 1750 ?*

तूर्त कलरावरते ठाणे सरकारचे घालावे तदनंतर करणें ते करून. दंडकाप्रमाणे राजकारण आहे. त्रिंबकपंताचे चितास आले आहे सेवेसी श्रुत होये. तैसेच दुसरे चिंता फारच सरदेशमुख आधीं सरदेशमुखी सरकारांत घ्यावी, आणि आपला चौका बैसवावा म्हणतो. त्यानेही पत्र सेवेसी लिहिलें आहे त्याचें उत्तर द्यावयास स्वामी समर्थ आहेत. हिदायेत मोर्दीखान याचें राजकारण जालें आहे. त्यांत जीव नाहीं परंतु हे बोलतात, व राजश्री फत्तेसिंगबावाचे चित्तीं स्वामीचे पत्र येईल ते समई गंगातीरास यावें यैसें आहे. राजश्री विठल सिवदेव याची व दर्याबाईची भेट जाली. फत्तेसिंगबावासहि पत्र आलें आहे. याची त्याची भेट येक दोन रोजांत होईल. याच्या फौजा येत चालल्या. रोजबरोज सेदोनसें राऊत येतात. फौज भारी जमा होईल यैसें दिसतें. आपाजी प्रभू आजी लस्करांत आला. दोन हजार आहे. दर्याबाईहि येकदोन रोजीं येणार. वरकड वर्तमान जें आसेल तें लिहितों. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*News-letter, mutilated, from Satara to Poona, communicating the movements of Fatesing Bhosle, Daryabai Nimbalkar and Vithal Shivdev and the overtures of Muzaffarjang.*

---

*No. 55*] [*April 1750*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री भाऊ**

**साहेब स्वामीराजाचे सेवसी**

आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सा। नमस्कार विनंती जे. साहेबाची आज्ञा घेऊन श्वार जालो, ते का। खटाव * * * तेथे राजश्री गोविंदराव चिटनीवीस यांचे भाऊ राजश्री * * * * येणार होते, म्हणून च्यार मुकाम जाले. ते काल दसमीस आस्तमानी येऊन, * * * * * मंग आज तेथून कूच करून, येकादसीस येरलवाडी नजीक कातरखटाव येथें आले. तेथे राजश्री रघोजीबावा भोसले याजकडून पत्रे, राजश्री त्रिंबकजी भोसले व

बुऱ्हानजी मोहिते यासी आली. त्या पत्री लिहिले कीं, मुकाम बेगमपुरा नजीक पंढरपूर येथे आलो. तर तुम्ही मंडलीसहवर्तमान सत्वर येणे. आपण उदईक पंढरपुरावर येतो. त्याजवरून राजश्री त्रिंबकजी भोसले व राजश्री बुऱ्हानजी मोहिते याणी उदईक द्वादसीस पंढरपुरास जावे, हा निश्चये केला आहे. व जासुदानी जबानी सांगितले कीं, येकादसीस पंढरपुरास येणार. व त्यांचा हेत कीं, फौजसुधा सतरुसीस यावे. मग श्रीमंताच्या विचारे फौज वाटे लावा (वयाची) तेव(ढी) लावावी आणि जितकी ठेवावयाची ते ठेवावी आणि श्रीमंत * * * * सी शुभकार्यासी जाणार आहेत. लागलीच आज्ञा घेऊन, आपण पुणियासी जावे, श्रीमंताची कृपा संपादून, मग जे आज्ञा करतील त्याजप्राा वर्तनूक करू, यैसे आहे. माहाराजास श्रुत होये. हे विज्ञाती.

¶*Vyankatrao Moreshwar to Bhausaheb, describing the movements of Raghuji Bhonsle's army and informing him of his intention of going to Satara along with the forces of Trimbakji Bhonsle and Burhanji Mohite who are askd to join him.*

---

*No. 56*] [*15-4-1750*

रु. नं.
१६५७

श्री

यादी सरंजाम उदाजी चवाण हिमतबाहादर सुाा खमसैन मया अलफ छ ११ जमादिलौवल

४०००० प्रो अफजलपुर सरकार सोलापूर १
२५००० प्रो मंदरुप सरकार सोलापूर १
६११०० प्राा माण
१३५०० काा नाझरे १
१७००० काा कासेगाव १
१५६०० काा सांगोले १
१५००० काा ब्रम्हपुरी १
६११००
१२६१०० प्रो

सनदा करुन देणे

१०५००० या खेरीज सरंजाम माधवरावपैकी धर्मादाय आलाहिदा.

---

२३११००

| | | |
|---|---|---|
| १०००० | समत हवेली विजापुर | १ |
| १०००० | गलगले | १ |
| ५००० | मोलवाड | १ |
| १०००० | समत इंडी | १ |
| २०००० | समत गोटे | १ |
| १५००० | समत हलसगी | १ |
| ५००० | जैनापुर | १ |
| ५००० | पाा हसुर | १ |
| ५००० | ठाणे बिदरी | १ |
| ५००० | प्राा आईनी | |
| १०००० | प्राा बारगी महमदापुर | |
| ५००० | प्राा केमबावी | |
| १०५००० | | १२ |

सनंदा करुन देणे

¶*The Saranjam fixed for Udaji Chavan is detailed in this paper.*

---

*No. 57]* *[2-5-1750?*

पाो छ १० जमादिलाखर

**श्री**

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब

साहेबाचे सेवेसी

विनंती. सेवक परशराम जगजीवन अजहत देशमुख भोसले व देशपांडे पां कराड कृतानेक विज्ञापना येथील क्षेम ताा छ ६ जमादिलाखरपावेतो साहेबाचे कृपेकरून वर्तमान येथास्थित असे विशेष. साहेबी आज्ञापत्र पाठविले की, प्रांत मजकुरचे जमीनझाडे व देहझाडे घेऊन येणे म्हणोन आज्ञा जाहाली. यैसियास

---

+ हीं अक्षरें रामराजाच्या हातचीं असावींत असें वाटतें.

गावगना देहझाडे व जमीनझाडे तयार करावयास दिवसगत लागेल. याकरिता हुजुरे रवाना केले आहेत. सेवेसी विज्ञापना कारितील. मागाहून आज्ञेप्रमाणे सिधता करून सेवेसी येतो. येविसी माहाराजानी श्रीमंत राजश्री पंतप्रतिनिधि यास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Tarabai orders the village accounts to be presented to her. The writer regrets the unavoidable delay in executing the order.*

---

*No. 58*] [*29-5-1750* ?

पो छ १३ रजबु

**श्रीगजानन**

श्रीमंत राजश्री पंत प्रधान

स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक गोविंदराव मोरेश्वर साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ताा छ ४ रजबपर्यंत स्वामीचे कृपावलोकनेकरून यथास्थित आसे विशेष. स्वामीनी कृपापत्र सादर केलें तेथें आज्ञा कीं, त्या * * * (पाच) से राऊतांचे प्रयोजन नाहींत श * * * श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेबांचें चितात विपर्यास आणून कटाक्षाचा विच्यार * * (यो) जिला तरी पुण्यास राजश्री जिवाजी गणेश यास लेहून पाठवणें म्हणजे राऊत व हशमी लोक येतील. तुम्हीं बहुत खबरदारीनें चौकीपाहारा करून राहणे म्हणोन आज्ञा. यैशास स्वामीचे आज्ञेप्रमाणें बंदोबस्त करीत आहों. प्रस्तुत राजश्री बऱ्हानजी मोहिते फालगुन श्रुध पौर्णिमेस रात्रौ सतरुषीस दाखल जाले. त्यावरी दुसरे दिवसीं माारनिले यांणी आपणाकडील कारकून सेवकाकडें पाठविले * * णें मजकूर जवानी सांगितला जे श्रीमंत मातुश्री आईसाहेब यांणी आपणाकडील * * जी नेवरे हुजुरी पुण्याचे मोकामीं पाठवावी याजबराबर आज्ञा सांगोन पाठविली जे तुम्ही सिताब येणें, तुमचे विचारें राजश्री स बाहेर काढावयाचे करावें लागतें. तुम्हीं राज्यांतील लोक, याजकरितां येणें म्हणोन आज्ञा जाहाली. त्याजवरून आम्ही मातुश्रीचे दर्शनास आलों. वरकड जो विचार करणें तो तुमचे विच्यारें करू म्हणोन बाह्योपचारें गोष्टी बोलत गेला. तदनंतर माानिलेचे कबिले वडिलास * * * सतरुषीस गेली. मोहिते यास वर्षप्रतिपदेस मातुश्रीनी बादली पोषाख देऊन बहुमान केला. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Govindrao Moreshwar writes to the Peshwa about the plans of Tarabai for the removal of Ramraja from power.*

No. 59] [12-5-1750

श्री

सेवेसी सदासिव रघुनाथ चरणावरी मस्तक ठेऊन सां नमस्कार विज्ञापना. ता। वैशाख वैद्य द्वितीयापर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेबाची आज्ञापत्रे व राजश्री बाबाजीचे पत्र ऐशी आली तीच बजिनस सेवेसी पाठविली असेत. तेथील सारांश अर्थ दिसतो कीं मातुश्रीच्या मतें श्रीमंतानी (आपली) फौज सातारियाहून मावारी न्यावी, त्याउपरी भेटीचा प्रसंग करावा. फौज मावारी गेलियाखेरीज आम्ही यावे तरी उचित नाहीं. येथील कितीक प्रकार बोलावयाचा तो श्रीमंताच्या उरुबरू बोलावा अशा प्रकारचा भाव दिसतो. दुसरा प्रकार श्रीमंतानी इमानें इतबारें आमच्या मनोदयानरूप वर्तावें, कदाचित तेही वर्ततील, परंतु श्रीमंत भाऊसाहेबाचा भरंवसा पुरत नाहीं असा भाव त्यांचा आहे; आणि मलाहि शोध करितां या प्रकारचा दिसतो. त्यावरून मी मातुश्रीस लेहून पाठविले कीं श्रीमंत राजश्री नानासाहेबाच्या मर्जीवेगळे श्रीमंत राजश्री भाऊसाहेबास दुसरा अर्थ नाहीं. केवळ सातारियास येऊन उरुबरू वर्तमान पुसावे तरी लोक म्हणतील कीं पांचपंचवीस मातबर यांच्या विचाराखेरीज गोष्ट ठराविली तें प्रमाण काय, यास्तव सविस्तर अर्थ मातबर माणसाजवळ बोलोन निश्चय सांगावा तेणेकरून उभयपक्षी उचित, त्यानंतर जें करणें ते करावे. दुसऱ्याचा भरवसा न पुरे तरी राजश्री बाबाजीस पाठवावे. याप्रमाणे मातुश्रीस मी लेहून पाठविलें. त्यानंतर फिरोन मातुश्रीची आज्ञा जाहली की सत्वर हुजूर येणे. परंतु तेथील त्याचा भाव दुसरा कीं श्रीमंताचे फौजेसमागमे जावे तरी दुसऱ्याजवळ च्यार लोक आहेत ते दुलेग[१] होतील. यास्तव केवळ वेगळे यावे हे उचित. यास्तव ये गोष्टीचा धरबंद श्रीमंतांजवळ तुम्ही करून येणें म्हणोन आज्ञा करितात यास्तव सेवेसी लिा आहे. ज्याप्रमाणें आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*News-letter from Satara to the Peshwa at Poona, referring to the latter's negotiations with Tarabai and a personal meeting between them. Tarabai visited the Peshwa at Poona on May 29, 1750.*

---

No. 60] [14-5-1750

श्रीशंकर

सेवेसी आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति प्रार्थना येसी जें. येथील वर्तमान तागाईत वैशाख वद्य ५ पंचमी सोमवार प्रथम

१ दोहोंकडे चित्त असलेले.

प्रहर घटका दोन ( २ दोन ) दिवस पावतों येथास्थित असों विशेष. येथील वर्तमान राजश्री काल तांतडीनें जाऊन आऊसाहेबास बहुत प्रकारें विनंती केली, परंतु नायैके. जैसें राजे येथून निंबास गेले तैसें आऊसाहेबांनीं कूच करून जायास लागले. तेव्हां राजश्रीनी जितके कारखानियाचे लोक व सारवान व खिजमतगार यैसें ठोकले. कांहीं आपल्या हातें काठ्या मारल्या, व कांहीं लोकांकडून मारविल्या, तेव्हां मोठी धूम जाली. तमाम जिकडील तिकडे पलापल जाली. तमाम कारखाना व जितके लोक सांगातें गेले होते तितके लोक मघारें आले. आऊसाहेब येक्या पालखींनसी मात्र निंबात राहिली; व आपणांकडील राजश्री गोविंद * * * (अपूर्ण)

¶*Vyankatrao Moreshwar from Satara to the Peshwa at Poona, informing him of the departure of Tarabai for Nimb and the severe beating which Ramraja inflicted upon her servants.*

---

*No. 61]* *[Date of receipt 6-6-1750 ?*

पौ छ १२ रजब

जाबसूद

श्री

सेवेसीं चिमणाजी बापूजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान मुक्काम सिवापूर दोन घटका रात्र आवसी. राजश्री स्वामीकडून दीनानाथपंत पत्रें घेऊन मातुश्री आऊसाहेबास व श्रीमंत राजश्री नानासाहेबास घेऊन आले आहेत. त्यास त्या कारकुनास जवळ बसऊन भावगर्भ राजश्री दादोपंत व आम्ही उभयतानीं घेऊन कुली त्याचा आशये घेतला आहे. त्यास हें वर्तमान पत्रीं लिहावें तरी आनकूल पडत नाहीं. याकरितां आम्ही सेवेसीं यावें, यैसें दादोपंत याचे विचारें जालें आहे. त्यास ते प्रात:काळीं पुणीयास उद्यां दोन प्रहरां पोंहचतील. पुढें आऊसाहेबाकडे दोघे हुजरे आजी आले आहेत, या प्रमाणें वर्तमान आहे. राजश्रीनी यावें, हा विचार बहुत परंतु दीनानाथपंत माघारे फिरोन जात तों येत नाहींत. दीनानाथपंत यास येकांतीं भेटऊन सविस्तर आर्थ श्रवण करावा लागेल, याकरितां भेटीस यावें यैसें असिलें तरी रातोरात आज्ञा आली तरी येऊं., नाहीं तरी प्रात:कालीं कूच करून सिरवलाआलीकडे किंवा आसपास मुकाम करून. उत्तर सत्वर पाठवावें हे विनंति. त्याणीच दुसरें वर्तमान सांगितलें कीं राजश्री प्रतिनिधीचे मेहुणे व वाकडे उद्यां पुणियास येतील. मागून चव्हाणाचे शामराव आले तेहि येतील. ऐकिलें वर्तमान सेवेसीं लिहिलें असे. हे विज्ञापना.

¶*Chimnaji Bapuji reports some intrigue.*

No. 62] [16-6-1750?

श्री

विनंती. सेवक चिमणाजी बापूजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. स्वामींची आज्ञा जाली, घांटाखाली राजश्री दादोपंत राहतील, तुम्ही घांट चढोन सतरूपीस राजश्री नानापाशी जाणें. त्यास रविवारी घांटमाथां जातों, सरकारांतून उंट पांच ओझ्यास ठेविले होते त्यांपैकी येक उंट दोन राहुट्या व कनाथांचें ओझें त्याजवरी होतें तो उंट कातरजचा घांट उंट चढला नाहीं. माघारें पुणियास गेला, याकरितां खोळंबा जाहला. कांहीं वोझें डेरेयाचें किकवीस ठेऊन सडे राहुट्या घेऊन मात्र सतऱ्यास प्रात:काळीं स्वार होऊन जातों. हें विज्ञापना.
मंदवार तृतीय प्रहर सरकारचे उंट च्यार सातारियापर्यंत घेऊन गेलों. आमचे उंटाची वाट पाहिल्या खोळंबा होईल या करितां सरकारचे च्यार उंट घेऊन गेलों. हें विज्ञापना.

¶*Chimnaji Bapuji from Kikvi to the Peshwa, reporting that he is proceeding to Satara as instructed.*

---

No. 63] [16-6-1750

श्री

सेवेसी विनंती. सेवक चिमणाजी बापूजी साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ २२ रजब मंदवार त्रितीये प्रहर मुकाम किकवी स्वामींचे दयेंकरून येथास्थित असे. आजी आज्ञापत्र सकाळीं रवाना केलें ते अडीच प्रहरा पावलें. लिहिलें जे, शाहाणा माणूस भावगर्भ सविस्तर सांगे व येकांतीं भेटवी यैसा शाहणा माणूस कारकून पाठऊन राजश्री दादोपंत नीरथडीस येऊन तुम्ही सत्वर सतरुसीस जाणें म्हणून आज्ञा, त्यास आज्ञेप्रमाणें राजश्री दादा राहिले. आम्ही स्वार होऊन प्रात:काळीं जातों. राजश्री दादाकडील कारकून नारोपंत सेवेसीं आले आहेत हे वर्तमानहि विदित करितील, व दीनानाथपंत याचे वोलखी आहेत. यांची भेटीहि सेवेसीं येकांतीं करितील. प्रात:काली दीनानाथपंत पुणियास कारकून दादाकडील बरोबर घेऊन आले आहेत, तेही आगोधर स्वामीस भेटऊन मग आऊसाहेबाकडे जातील. याप्रमाणें त्या कारकुनास दादानी आज्ञा करून बराबर दिल्हा आहे. सतरुसीस जावयाची आज्ञा त्यास आम्हांस तों उजूरच नाहीं. परंतु लोकांचीं घोडीं रोड उठवणकरू, बरोबर नेल्यास नफा नाहीं,

आणि तेही श्रमी बहुत होतात, कदमाची येकजिनस पाच घोडीं पंचविसांत मेली, याचप्रमाणें फार गालण जाली आहे. याकरितां जे फार गळाले असेल त्यास निरोप द्यावा लागतो. परंतु येक दुसरे घरास गेले म्हणून या समयांत रोजमरा वजा कारितां येत नाही. तथापि च्यार रुपये दिल्हे तरी त्याचे आद्यांत पडले. परंतु गळाटा निघोन नफा नाहीं. आबरू जतन होत नाहीं, याकरितां जी फार गळाटली त्यास निरोप देऊन सडे जातीं. सेवेसीं विदित होये रोजमरा वजा करता कामास येत नाहीं. हे विज्ञापना.

¶*Chimnaji Bapuji agrees to proceed to Satara and to send his private clerk to Poona.*

---

*No. 64*] [*17-6-1750*

**श्री**

**श्रीमंत राजश्री भाऊसाहेब**
**स्वामीचे सेवेसीं**

विनंती सेवक चिमणाजी बापूजी साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान छ २२ रजब रविवार चतुर्थ प्रहर मुकाम खंडाले बावडे स्वामीचे कृपेकरून यथास्थित असे. सेवेसीं विनंति लिहिली होती जे, राजश्री नानाचें पत्र आलें जे आहा तेथें राहाणें आणि खबरदारी करवणें. त्यावरून सिरवला आलीकडे राहातों म्हणून लिहिलें होतें. त्यास विचार पाहातां सातारेयाची मर्जी घडीघडीची आणि राजश्री नानाची आज्ञा तेथें राहणें. मग आम्ही कूच करून घाटाखालीं राहोन सातारेयास लेहून पाठविलें. त्याचें उत्तर रातोरात येईल म्हणजे प्रातःकालीं घाट चढोन जाऊं, निकडीचें पत्र आलें तरी डेरेदांडे येथें टाकून दोन प्रहरांत सातारेयास दाखल होऊं. इकडील कारभार लोक नाना प्रकारचे बोलतात जे राजश्रीनी यमाजीपंत आणविले, फौज भारी जमा जाली, याउपर पुणियाकडे यावें, नाहीं तरी तूर्त नाही, यैशा नानाप्रकारची लिहिली वदंता येतात. याकारितां दोनी शहावर आजीचा दिवस येथें आहे, सातारेयाचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करून. राजश्री दादोपंताचें मानस नीरेचे उत्तर तीरीं राहावयाचें होतें. परंतु इकडील नाकेबंदी दो ती ठिकाणची चांगली जाली पाहिजे, याकारितां वडगांवीं त्यास राहाविलें म्हणजे दोन वाटा वडगावाजवल येतात. वकल कदरा (?) वडगांवीहून दीड दोन कोस पस्छमेस, याकारितां तेथें राहाविलें. आम्ही उद्यां त्याचे आज्ञे

प्रमाणें सातारियास जाऊं. सेवेसीं जालें वर्तमान लिहिलें आहे. रागास न यावें. रोजमरेयाची चिटी सातारियास घेतली नाहीं ते व दरमाहाचा आशाड शुध प्रतिपदेपासून यैशा दोनी यैवजाची चिटी द्यावयास आज्ञा केली पाहिजे. कडबा दर रुपयेस सतारियास पंचवीस पेंढ्या मिलतात. दाणा तों बाजरी चौपाइलीची धारण आहे. सर्वजाण खावंद आहेत. सेवक लोकानीं सेवा मात्र करावी हे विज्ञापना. जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें इतुकियांत सातारियाकडील पत्र आलें तरी आतांच जातों, उजूर नाहीं. हे विनंति.

*¶Chimnaji Bapuji reports that he is yet uncertain whether he should proceed to Satara or stay guarding the ghats.*

---

*No. 65]* *[21-6-1750?*

**श्री**

श्रीमंत माहाराज आईसाहेब साहेबाचे सेवेसी

विनती. सेवेसी ठेवणाईत येसाजी सोडकर हवालदार व कारकून किले महिमानगड विनंती विज्ञापना. ता। छ २७ रजब पावेतो सेवकाचे व किलेमाचे वर्तमान यथास्थित असे.

बा। विनंती विज्ञापना येसीजे. येंदा वोलवा[१] पडला याजमुले किलाच्या लोकास खावयास दाणा नाही. यास्तव किले मजकूरचे लोक गला आणवायासी भिवर-थडीस पाठविले होते ते दाणे भरून येत व्होते. तों राजश्री साबाजी बाजी घाटगे याची बेरडाची स्वारी मलवडी कर्यातीत आली व्होती. त्यानी किलाचे बैल वलून नेले आहेत. खावंदास विदित व्हावे म्हणून विनंतीपत्र पाठविले आहे. किलाचे लोकास पोटास खावयास नाही. याची उस्तवारी करणार धनी समर्थ आहेत. किला खराब घाटगियानी केला. रोज उठोन किल्याचे पाठी लागले आहेत. तर सेवकावरी कृपालु होऊन ताकीदपत्रे देऊन किल्याच्या लोकाचे बैल पावते व्होये ते केले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Yesaji Sodkar, Killedar of Mahimangad, reports to Tarabai how Sabaji Ghatge had devastated the fort and its vicinity and requests measures to be taken against him. The affair appears to be of the post-Shahu period.*

---

१ अवर्षण.

No. 66] [25-6-1750 ?

पो छ १ रमजान

श्री

श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब साहेबाचे
शेवेसी

आज्ञाधारक राणोजी भोसले च्यरणावरी मस्तक ठेऊन दंडवत विनंती विज्ञापना. तागायेत छ १ माहे साहाबान प्रावेतो सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. महाराजाची आज्ञा घेऊन ज्या कार्यानिमित्य वराड प्रांते आलो, त्यास साहेबाचे पुन्यप्रतापेकरून कार्यसिध जाहाली. पुढे माहाराजाचे पायाजवल दर्शनास यावे. त्यास येथील मामलेती कामकाज निर्गतीमधी आले नाही. येदंनिमित्य या प्रांती सा महिने राहाणे जाहाले. पुढे साहेबाचे दर्शनास सत्वरच येतो. चिरंजीव जिजाजी भोसले माहाराजाचे च्यरणासनिध आहेत व मुलेमाणसे पांडवगडी आहेत त्याची बरदाश करणार साहेब धनी आहेत विशे(ष) काये लिहिणे हे विज्ञापना.

¶*Ranoji Bhonsle of the Nagpur family is seen in this letter helping the cause of Tarabai. Jijaji Bhonsle mentioned in the letter has yet to be traced.*

---

No. 67] [26-6-1750

छ ५ शाबान

श्रीशंकर

श्रीमंत राजश्री नानासाहेब व ता राजश्री भाऊसाहेब
स्वामींचे सेवसी

आज्ञाधारक व्यंकटराऊ मोरेश्वर कृतानेक सां नमस्कार विनंती प्रार्थना यैसी जे. येथील वर्तमान ता छ २ माहे साबान जाणून साहेबांचे कृपेकरून येथास्तित असों विशेष. काल रा(त्री)रघोजीबावा भोसले याच्या समजाविसीच्या कारभारात राजश्रीनी राजश्री रामाजीपंत व राजश्री गोविंदराव, रा नागोराव, राजश्री येशवंतराऊ यासी पाठविले आणि राजश्रीहि राजश्री नानाकडे आले होते यासी समजविसीचे वर्तमान यांसी * * त्यावरून हे पंचायेत्न रघोजी (अपूर्ण)

¶*This letter from Vyankatrao Moreshwar claims to give the details of a consultation held among the five persons Raghuji, Ramajipant, Nagorao, Govindrao and Yeshwantrao, but the letter is unfortunately mutilated.*

No. 68] [June 1750

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य
राजश्री बावा स्वामीचे सेवेसी

पोष्य गोविंद खंडेराव साष्टांग दंडवत प्रा। विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशललेखन करीत गेलें पाहिजे विशेष. दरबारी व स्वकीय सविस्तर अर्थ चिरंजीव राजश्री रामणा विदित करितील, त्यांचे पुर्ते मनन करून जाबसाल केले पाहिजेत. सांप्रत आम्हीं प्रवाही पडलो आहो; यांत सर्व प्रकारे आश्रय आपला आहे, हेच अर्थ समक्षहि बहुत वेळ विनंती केलेच आहेत; ध्यानात असतीलच; सूचना मात्र लिहिली असे. तलेगावीहून तीर्थरूप राजश्री बावाहि आपले दर्शनास येतील. कायावाच्यामनेकरून आम्हास आपणाखेरीज कोण्ही नाहीं हे पुर्ते चितात असो द्यावे. विस्तार ल्याहावासा काय आहे ? बहुत काये लिहिणे, कृपा असो दिल्ही पाहिजे, हे विनंती.

¶*Govind Khanderao to Baba Purandare (Mahadaji Ambaji) asking for his support, placed as he is in adverse circumstances.*

---

No. 69] [June 1750

[ पहिले दोन बंद गहाळ. ]

त उडाली आहे की, पेशावियाणी संभाजीराजे यांचा पुत्र नेला म्हणून बहुत हुलड उडाली आहे. हे वर्तमान राजश्री * * * * ले आहे त्याजवरून बहुत * * * * वर्तमान यैकतो तया * * * * हेत म्हणून वदंता आहे. यैकिले वर्तमान ते माहाराजाचे सेवेसी विनंतीपत्र लिहिले आहे. सत्यमिथ्या ईश्वर जाणे. व राजश्री रघोजीबावास आज्ञा देत नाहीत. म्हणतात की, आईसाहेबास आणलियाउपरी मग तुम्हास निरोप देऊ. त्यासी रा। रघोजीबावा चिता * * * * आहे. येथे राहावयासी हैराण आहेत; आणि बाहेर * * * * आहे. चांदे येथील राजा * * * * * * याची जलदी आहे आणि खर्चा * * * * * आहे यैसे वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*This fragmentary letter makes mention of Satara affairs; the rumour prevalent there that the Peshwa had taken away the son of Sambhaji and the continued stay at Satara of Raghuji Bhonsle are two of the items referred to.*

3348

No. 70] [June 1750

छ २९ रजब

श्री

सेवेसी गोविंद खंडेराव कृतानेक विज्ञापना. येथील निरंतर वर्तमान राजश्री नाना लिहीतच आहेत. आजपर्यंत उपेक्षा होऊन यां थरास गोष्ट आली. पुढे उचित विच्यार चितात येऊन जे आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करून. राजेश्री नाना जे क्षणी श्वार होतील ते क्षणी त्याजसमागमें श्वार होऊन येऊ. विदित जाले पाहिजे हे विज्ञापना.

*¶Govind Khanderao expresses his willingness to accompany Nana Purandare as soon as he receives orders from the Peshwa.*

---

No. 71] [June 1750

श्री

पुा सेवेसी विज्ञापना. काल दहिगावचे मुकामी दर्याबाईचे व नारोजीचे कागद आले की, मातुश्री आईसाहेब याचा(हेत) उदईक कूच करून सिंहगडास जाणार आहेत. त्यास राजश्री स्वामी बोलले की, मातुश्री आईसाहेबाबरोबर कोणी जाईल त्यास बरे पाहणार नाहीं. मातुश्री आईसाहेब कोण्या मतलबास जातात हे का [पुढील अर्धी बंद फाटून गहाळ] खे लिहीत होते. त्यास आपण विनती केली की, श्रीमंतास लिहून पाठऊन उतर आणऊ; याची काये ती आज्ञा करावी. पोता यैवज सिलकेस नाही. सिलेदाराचा रोजमरा व स्वारी मजकूरचा रोजमरा व कोठीचा जिनसास यैवज नाही. तरी यैवज पाठवणार स्वामी समर्थ आहेत. सेवसी शृत होये हे विज्ञापना.

*¶The paper refers to the departure of Tarabai for Sinhagad.*

---

No. 72] [1-7-1750

**श्रीशंकर**

**राजश्री पंतप्रधान पंत**

**गोसावी यासी**

ॐ श्रीमंत सकलयैश्वर्यसंपन्न राजमान्ये स्नो दर्याबाई निंबालकर दंडवत विनंती उपरी. येथील क्षेम आपले कृपेस्तव ताा छ ७ माहे साबान पर्यंत येथास्तित असे विशेष. कृपा करून पत्र पाठविले ते प्रविस्ट होऊन

लेखनार्थ अवगत जाला. पत्री आज्ञा निरोपिली की, तुमचे व आमचे इमान उजवल; इतकिया उपरी आम्हावर शेब्द न ठेवणे. त्यास आम्ही तो कायावाचामन तुमचे पक्षीचे म्हणवितो. आणि चिरंजीव राजश्रीस नितशा बुधीवाद सांगतो कीं, तुमचा राज्यभार प्रधानपंतावर आहे. त्यासी केल्या करारात अंतर केल्यान राज्यभारास आपाये होईल. यैस सांगत असतां नाहक आमचे नाव तुफान येथील कारभारी आपणासी लिहितातीं, त्याजवरून आपल्या चितात विक्षेप आम्हांविशई आला आहे. प्रसंगीचा मजकूर तरी बाहयात्कारें तुमचा पक्ष दाखवितातीं आणि अंतरंगीचे पेंच कुपेच जे सांगणे ते राजश्री सांगतातीं, ते आम्हास पत्रीं सविस्तर लिहिता ( एक ओळ फाटली. ) आहे. आम्ही ल्याह्यावे तरी सत्य भासनार नाहीं. परिनामी कळो येईल. राजश्री कूच करोन आपणाकडे येत होते. सिहगड तुमच्या श्वाधीन करावा, आपले विचारें सचिवपंताची समजावीस जैसी सांगाल तैसी करावी आणि वरकड केल्या कारभारात अंतर न करावे, तीर्थरूप मातुश्री साहेबांचें समाधान आपले विचारें करोन घेऊन यावें, यैसा द्रुढतर निस्चये करोन येत होते; परंतु कारभाऱ्याच्या मनास आले नाही. श्वारी महकूप केली. आपली व राजश्रीची भेटी होती म्हणिजे सर्व अर्थ ध्यानास येता. आम्हास तो सर्व प्रकार आधार आपला आहे. आम्हापासून काही बेइमानीची वर्तनूक जाहाली असली तरी श्री साक्षी असे. आचेरणाप्रमाण फलौधीस[1] प्राप्त होईल. पहिलेपासून सरलस्करची व इतर अर्थाची इछा धरली नाही. आपली क्रुपा मात्र अक्षई इछोन आहो. यैस असतां नानाप्रकारचे संकेत आपणास ज्यानी दर्शविले आहेत त्यानी श्रीक्रुष्णेत स्नान करोन सत्य स्मरोन आमचे पदरी अन्याये घालावा म्हणिजे आम्ही सहजच अन्याई; नाही तरी आम्ही तरी त्याचे अंगी नस्टाई लाऊन देतो. आपल्या केल्या कारभारांत अंतर कैस आले, या गोस्टीचा दाखला आपणाकडील ममतेचे ग्रहस्त मातबर येथ कोन्ही आहेत त्यास पुसला असेल, तेहि सेवेसी आल्यावर निवेदन करितील. नाहक ज्यानी आमचे नाव आपल्या चितात विक्षेप घातला आहे, याजउपरी त्याची भीड आम्हास काये आहे. (फाटले) (फाटले) डोन अंतर येथे (फाटले) (फाटले) निदान जाणून सेवसी सुच (फाटले) (फाटले) असे इमान उजवल म्हणून लिहिल (फाटले) मर्थ आहेत. आमच्या इमानास कालत्रई आंतर होणार नाही. आज्ञा होईल तरी सेवेमधे बाबूराऊ व शामराऊ या उभयेयांस पाठऊन देऊ. ते विनंती करतील त्यावरून सकल अर्थ ध्यानास येतील. आमचा कोन्हे गोस्टीविशई दुराग्रह नाही.

---

[1] फलादेश.

आपल्या मनोदयावरून वर्तुनूक केली जाईल. लस्करीहून चिरंजीवाकडील पत्रे आली आहेत; सेवसी पाठविली असती. निरंतरी कृपापत्रीं सांभाळीत असावें. बहुत काये लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती.

*¶Daryabai Nimbalkar to the Peshwa, assuring him of her sincerity and her reliance on him. She promises to advise Ramraja also to have full confidence in the Peshwa.*

---

*No. 73]* *[5-7-1750*

पो छ १२ साबान

**श्री**

सेवेसी चिमणाजी बापूजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागाईत छ ११ साबान स्वामीचे कृपेंकरून येथास्थित असे. स्वामीची आज्ञा आली, राजश्री उदाजी चव्हाण हिंमत बाहादर यांचे साहित्यास जावें त्यास सेवकास तों उजूर नाहीं. प्रजन्य काळ; घोडीं, उंटें उठवणेस सातारियाचे स्वारीमुळें आलीं हें सर्व स्वामीस विदितच आहे. बरें, असों. चाकरीचे समयीं रदबदली केलिया धणी रागास येतील; न करावी तरी कालहरण चालिलें पाहिजे. ऐशास स्वामीनी कृपा करून रवानगीचा ऐवज गुदस्तांपेक्षां कांहीं अधिक येथेंच तूर्त देववावा. सर्व फौजास रवानगी पोहोचन आपलेले घरासही गेले. आम्ही जे आलों ते तैसेंच असोन रवानगीचा ऐवज पावला नाहीं. लोकांस रवानगी दिल्याखेरीज जाणें कैसें होईल? प्रजन्याचे दिवस पालपर्डे[1]थळ पाहिजे. लोकांनीं उंटे तटें घरास रवाना केली होतीं तीं आणविलीं पाहिजेत. दोचौ दिवसांत स्वारी नव्हे, महिना दोन महिन्याची स्वारी, लोक गवगवा करितात. रवानगी न दिल्ही, उगेंच चला म्हणावें येणेंकरून बेदिल चाकर दुस्मन बरोबर! हिंदुस्थानास जावें तों कारभार आलाहिदा. देशीं चाकरी, माहागाई, घोडीं उंटें खराब आणि घरें जवळ, मुलांमाणसांचा पोटाचा बोभाट नित्य ज्याच्या त्याचा घराचा येतो, आणि आम्हासी गवगवा करितात जे, सारें लष्कर गेलें, रवानगी सर्वांस पावली आमचा अन्याय काय? याकरितां विनंती लिहिली असें. आम्ही येक दोन वेल विनंती लिहिली, परंतु त्याची आज्ञा जाली नाहीं; तरी रागास न येतां रवानगीचा यैवज देविला पाहिजे. प्रजन्य काल, उदबा गेले म्हणजे गावांत राहों लागतील. आम्ही कोठें राहावें.? उदबा दिवसांतून

---

१ तंबू वगैरे सामान.

च्यार वेळ जीन ठेऊन पळों लागतो. आम्हीं त्याप्रमाणें वर्तों लागलों, तेव्हां धणियाचे लौकिक राहिले पाहिजेत. खावंदांनीं अभिमान धरून तर्वा पोहचवावा. ऐसें ध्यानांत आलें तेव्हां खावंद सर्व प्रकारें पुस्तवानी करितील. सेवकास चिंता काय आहे? परंतु सेवकाचे रवानगीचा ऐवज लौकर येथें पोहचल्यास सेवकाचें निवर्णे जलदीनें होईल. सेवेसी विदित होये हे विज्ञापना.

*¶Chimnaji Bapuji informs the Peshwa that he is in monentary difficulty regarding the payment of his troops, who are unwilling to stay on owing to the rains.*

---

*No. 74]* *[30-7-1750*

**श्री**

श्रीमंत राजश्री पंतप्रधान

स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक हरि राम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान तागायत छ ११ रमजान प्रो इचलकंजी स्वामीचे दयेकरून येथास्थित असे विशेष. पेसजीं विनंतीपत्र लिहिलें होतें त्यावरून सविस्तर विदित जालेच असेल. त्या अलीकडील वर्तमान तरी वडगावी होते. समागमें जमाव नेल्यानें लौकिक होईल, जमाव तो गेला पाहिजे, याकरितां दोन तीन दिवस मोकाम करून पुढें जमाव लाऊन दिल्हा. कोण्ही खातगोणास पिराच्या दर्शनास म्हणऊन बोलत गेले. कोण्ही राजश्री येमाजी सिवदेव यांजकडे चाकरीस जातों म्हणऊन नदी उतरोन जयेराम स्वामीच्या वडगांवास गेले. मुलतानजी सिंदे यांचे सुनेस आणावयास म्हणऊन रहिमतपुरास मान्याच्या वरास लाऊन दिल्हे. मुल्यांसमागमें म्हणाव-यास सयाजी फाळके व मुरारजी जाधव व सिवाजी जगदाळे आणखी येक दोन यैसे तयार होऊन नद्या कोणत्या विचारें पार जाहाले यैसें स्वामी म्हणतील तरी ज्याचे स्वाधीन उतार त्यास पांच सात हजार रुपये व येक मोत्यांची जोडी सध्या दिली, पुढे पदारूढ जाहल्यावरी सरलस्कर द्यावें यैसा करारमदार होऊन वारणा व कृष्णा पार जाहाले. रहिमतपुरावरून माहुलीनजीक वाडी आहे तेथपावेतों जाऊन रानांत उतरले. सतरुपीहून येणार ते गुप्तरूपें येक दोन ग्रहस्त येऊन भेटले. त्याणी सांगितलें कीं, तुमच्या येण्याचा बोभाट जाहला आहे. दिवसाचें कार्य साधत नाहीं. रात्रौ येऊन जाऊं यैसें बोलोन गेले. दुसऱ्या गृहस्तानें सांगोन पाठविलें, वाच्यता जाहाली, कार्य साधत नाहीं यैसें सांगोन पाठविलें, त्या-वरून यांस धीर पुरला नाहीं, तेथून निघोन माघारे येक दिवस येक रात्र चालोन

उपासी हैरान होऊन ठिकाणास आले. कार्ये कोणत्या विचारे येसें स्वामी म्हणतील तरी गडकरी वगैरे यांचे येकमत, यांचा त्यांचा करार येणेंप्रमाणें. सतरुषीवासी माहाराज यांस वाडियांतून बाहेर कोण्हाचे समजाविसीबद्दल म्हणऊन काढावें, गडावरून गडकरी याणी उतरावे, दगा करून मुख्यांस ठिकाणी लावावें, त्याउपरी यांस पदारूढ करावें, येसा संकेत होता येसें बोलतात. या कर्मास वीस पंचवीस हजार रुपये व कडीं खर्च जाहाले. कार्ये साधलें नाहीं. पुढें कोणत्या विचारावरी गोष्ट जाईल न कले, या विचारांत प्रस्तुत आहेत. सेवेसीं कळावें याकरितां विनंती लिहिली आहे. सतरुषीस चिटकोबा म्हणून प्रभु या राजकारणांत होते येसे वर्तमान ऐकितों. कोण असतील तो शोध करावा. आणखीं वर्तमान येईल तें वरचेवरी लिहितों. श्रुत होय हे विनंती

*¶Hari Ram surnamed Herwadkar in the employ of Ichalkaranji writes to the Peshwa, informing him how under different pretexts men proceeded to Satara for an attack. Does this incident refer to the march of the pretender who posed as Ramraja?*

---

*No. 75]* *[July 1750?*

**श्री**

सेवेसी चिमणाजी बापूजी साष्टांग नमस्कार विनंती. बाबूराव उमाजीसमागमें पत्र पाठविलें तेथें लोक नयेत म्हणून लिहिलें उत्तम आहे. चाकर आणि चाकरी न आइके तेव्हां स्वामीनी मुलाहिजा करावा ऐसें काय आहे? निकडीस जो चाकर खावंदास कामास नये, तेव्हां त्या चाकरासीही धन्य! काम तें काय? लोक बालगावे युद्धाचें काम पडलें तरी कामास येतील म्हणून, आणि युद्धाचे समयीं देतां घेतां मनसबे सांगून चाकरीस हरकत करितात हें अपूर्व आहे! पैका नसला आणि काम पडलें तरी कैसे जमा होतील; जे थोरले नाना व आपण दोन मानितात ते मूर्ख आहेत. बरें आम्हां लोकांस तों जे सांगितली चाकरी त्या समयी तों उजूर करितां नये. माईनीवर[1] अंताजीपंत, गमाजीपंत येथून दाहा कोसांवर आले होते; आजी पुढें येतात की तेथेच राहातात हें पाहावें. आम्ही पुढें येथून येक कोस जात नाहीं. ते होऊन चालोन आले तरी पाहातच आहों. खावंदाचें पुण्य समर्थ आहे. रेतोजी चव्हाणास आम्ही पत्र पाठविलें होतें, त्याचें उत्तर आलें, येतों; परंतु त्याणें उदबास लिहिलें कीं शिवाजी थोरात कारव्यास[2] गेले आहेत ते आल्याउपर येऊं. येणचे लोक हातच्या पायावर घालून धातुपोषण पत्रें लिहितात. येतों येतों म्हणतात, परंतु जमा होणार नाहींत. बोलतात जे प्रजन्य काल, बारा

---

१ मायनी, तालुके खटाव. २ कारवे, कऱ्हाडजवळ.

महिने चाकरी पडली, तयारी करवितों, डेरे बाहीर देतों, येतों. येक येकास च्यार च्यार पत्रें पाठविलीं. परंतु घरें सोडीत नाहींत. नाना आम्ही सातारेयासच विनंती केली होती कीं हे दिवस नव्हेत. परंतु स्वामींनी ऐकिलें नाहीं. आम्ही लेकरें पदरीचें. अनमान करावा तर वडिलाची मर्जी राहात नाहीं, याकरितां आलों. परंतु फौजेचा व उदबाचा परिणाम मुद्या नाहीं. उदबाचा सावनो कोणी दिसत नाहीं. रुपये देतात हे लोक इतुक्या गोष्टी करितात. जेथें रुपयाच नाहीं त्याची सरदारी काये? ज्याप्रमाणें आपले हवेलीस उदबाचा उपद्रव, त्याप्रमाणें उदबा माहागावी[1] आमचे घरीं येऊन बसोन कूच करविलें. आम्ही कूच करून आल्यावर उदबा प्रहर रात्रीं रहिमतपुरास दाखल जालें. याप्रमाणें सरदारी नेथें युद्धांत सोबतीस कोण मरतो? हा सारा अर्थ स्वामीस कलोन स्वाम करितात मग सेवकाचा उपाय काय? प्रजन्य अतिशय अद्यापि जरी विचारावरी ध्याल, उदबास दोन महिने उगमच ठेवाल आणि पुढें साहित्य कराल, तरी परिणाम लागेल. या प्रजन्यांत कार्य होत नाहीं. अबरू राहात नाहीं, अजून तरी नासलें नाहीं, पुर्ता पुर्ता विचार करावा हे विनंती.

¶*Chimnaji Bapuji, who was posted to check the rebellion of Yamaji Shivdev, reports his difficulties about men and money aggravated by rains and the trouble created by Udaji Chavan.*

---

*No. 76]* *[July 1750*

**श्री**

सेवेसी चिमणाजी बापूजी साष्टांग नमस्कार विनंती. स्वामीचें आज्ञापत्र आलें तेथें आज्ञा कीं राजश्री यमाजीपंताचें लस्कर जवळ. तुम्हांजवळ सामान फौज जमा नाहीं तों त्याणी तुम्हांसी मुकाबला घ्यावा, याअर्थे ते आले आहेत. तुम्ही सावध राहाणें. राजश्री उदबा आतुरपणें उतावळी करितील तरी आपला पुर्ता विचार करणें. आपला आब जतन करून रतबा थोरात सारे येक जाल्यावरी कर्तव्य ते करावे. रतबा थोरात सारें जमा करून मग जे कर्तव्य ते करणें. जाणून वडील-पणें बुधिवाद लिहिला उत्तम आहे. परंतु आमचें वर्तमान स्वामीची मर्जी रक्षून स्वामिसेवा करावी. येणेंकरून 'देहं वा पातयेत्—किंवा—अर्थं वा साधयेत्'. स्वामी पुर्ता विचार न करितां पिटून लावितात. मग आम्ही काये करावें? आमचें इमान शाबूत असिलें, तरी यश घेऊन जगों; आणि हरामखोर चाकर असिला तरी

---

[1] माहुलीजवळ.

नमस्कार करून तों आळींच आहों, तोच नमस्कार. लोकांविसीं वारंवार विनंती लिहिली, त्याचें उत्तर न ये किंवा येकहि न येत. स्वामी तों जाच म्हणतात. मग काये करावें? रतोजी चव्हाण व थोरात मिळोन च्यार पांचशें जमा आहेत. त्यास आम्हांस पांचा गावाची तफावत. येमाजीपंता* * ची साडे ती गावची तफावत. रतबाचे आमचे दरम्यान येमाजीपंत यैसी गडसंधी आहे. आजी यमाजीपंताचे लस्करांतून उदबाची बातमी आली. ते झरे पाहून खानापुराकडे येतात, म्हणजे दो फौजाचे दरम्यान आले. ते तिकडे आम्ही इकडे यैसे जालें. फौज तों येकंदर जमा होत नाहीं. प्रजन्य डोले उघडित नाही. स्वामीजवळ श्वरूपजी खुले ते सतरुसीस आहेत, ते इकडे पत्र पावतांच रवाना करावे. सिदोजी खुले येमाजीपंताचे फौजेंत आहेत. उदबाचे जासुदास भेटले होते. सारांश, स्वामीचे विचारे स्वामिकार्य होऊन सेवकाचा आब रक्षावा यैसें मानस असिलें तरी या वळणांत जे लोक असतील ते बोधे बरगे तमाम चांगले चांगले दोन च्यारसें आठा चौ रोजाचे आवकासें पाठवावे. सारा मनसबा चौ दिवसांत आहे. हा उरकल्या उपर मग लोक जमा होऊन काये? हें सारे वर्तमान स्वामीचे चित्तांत येतें. परंतु आमच्या प्रालब्धानुरूप चित्तांत येत नाहीं! स्वामी म्हणतील कीं मराठा सरदार असता तरी इतुकें कांहीं न लिहिता; याच अन्वये स्वामीस न लिहावें यैसें मानस होतें. परंतु स्वामीनी सिक्षापूर्वक बुध्वाद लेहून पाठविला म्हणून लिहिणे लागले. रागास न यावें. तुमचे वाढविले तुमचे पदरीचे बांहीधेरे[1] किं शरम म्हणून लिहिले आहे. हे विज्ञापना. काली यमाजीपंताचें पत्र मुजरद जासूद घेऊन आला त्याची नकल सेवेसीं पा। आहे. उत्तर दिल्हें नाहीं. आपली आज्ञा आल्याउपर उत्तर देऊं. जासूद ठेऊन घेतला आहे. हे विज्ञापना.

¶*Chimnaji Bapuji, who was sent against Yamaji Shivdev, explains the difficulties of his situation and asks for men and money.*

---

*No. 77*] [*July 1750*

[ पहिला बंद गहाळ. ]

त्याचा विचार या प्रकारचा आहें. मग आमचा केवा[2] काये आहे? मग दरबारास गेले नाहींत. च्यार घडी दिवस बाकी राहिला, तेव्हा जानोजी भोसले यांच्या सासरियाच्या घरास गेले होते, त्यांच्या लग्नाचा निश्चये करावा म्हणून. त्यासी ते येक्या महिणियाची मुदत मागतात कीं, सरंजाम जाला पाहिजे. त्यासी

---

१ शरणागताची लाज. २ किमत, पत्रास.

याणी सांगितले की, सत्वर लग्न करणे. खर्च मार्गी आहे. आणि आम्हास पुणियासी लग्नास जावे लागते तर सत्वर साहित्य करणे येसे बोलणे जाले. इतकियावर जे नेमस्त होईल * * * * जाईल व राजश्री प्रतिनिधी-कडील येक* * * नवी आला होता त्याने रा। बाबा * * * * ल्या होत्या कीं, नहोन तुम्ही आला तर राज्याची बंदोबस्ती करून जाणे, आपण इतके दिवस तुमचा मार्ग लक्षीत होतो. त्यासी ईश्वरे योगहि तोच घडून आला आहे आणि श्रीमंतहि येथून गेले. आता जे कराल ते होईल. येथे जे मंडली आहे ते व तुम्ही येक होऊन राज्याचा बंदोबस्त करणे आणि तुम्हास कितेक प्रकारे लिहिले होते, त्यासी हा प्रसंग आज आहे. त्यासी याणी दोन घटकापरियेंत यैकिले आणि सेवटी जाब दिल्हा कीं, येस्या गोष्टी आम्हापासी बोलत न जाणे. ज्याच्या यैसा बंदोबस्त होता तो त्याणी शर्त केली; त्याचे उतराई लवकरच जाला. त्यासी आता पुढे आम्हा उतराई होणार आहा. मग पुन्हा तो ग्रहस्त बोलला नाही व राजेश्रीनी विष्णुपंतासी व देवराव यासी दोनदा च्यारदा उसरमों[1] केला की, आपण गेले ते गेले, या उभयेतांस घेऊन गेले. आमचा हिशोब त्यांजकडे आहे आणि हिसोब न देता गेले हे बरे नाही. येसे वर्तमान यैकिल्यात आले आहे. ते महाराजा * * * * * हिले आहे व लक्ष्मण खंडागला दीड * * * श्वारानसी आज रहमतपुरावर आला आहे. रा। कासी भास्कर यांजकडील आहे. साहेबास कलावे म्हणून लिहिले आसे. बहुत काये लिहिणे ? सेवसी श्रुत होये हे विज्ञाप्ति. साहेबी आज्ञा केली की, आबाजी साठ्या याजकडील च्यार जोड्या जासुदाच्या घेणे. त्यासी आबाजी ना। विना साहबोचे आज्ञापत्र आलियाखेरीज आम्हास जासूद देत नाही येसे आहे. कृपा करून आज्ञापत्र पाठविले पाहिजे हे विज्ञाप्ति.[+]

¶*The letter refers to the marriage of Janoji Bhonsle and to some other matters at Satara. The handwriting appears to be that of Vyankatrao Moreshwar who usually writes about Ramraja's affairs at Satara.*

---

*No. 78]* *[July 1750*

**श्री**

सेवेसी चिमणाजी बापूजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. आपली आज्ञा आली कीं राजश्री दादोपंत घाटाखाली राहतील, तुम्ही सातारियास जाणें. त्यावरून कूच करून चालिलों. तों राजश्री नानाचें पत्र तीन प्रहर रात्रीं आलें कीं पुढें न येणें.

---

१ आठवण करून दिली. + पत्र व्यंकटराव मोरेश्वर याचें असावें.

आहां तेथें राहणें. त्यावरून आजी सिरवलाजवळ पाडे सारोळें येथं मुकाम करून सातारेयाचे बातमीसहि राऊत पाठविले. सिंहगडाकडेहि खबरदारी करून पत्रें सातारेयाचीं व आम्ही आपलीं लेहून पाठविलीं आहेत हे विज्ञापना.

¶*Chimnaji Bapuji reports that he is posting himself near Shirwal and is awaiting events cautiously. This Chimnaji Bapuji died in February 1751.*

---

*No. 79*] [*3-8-1750*

जमाव रु. नं. १७२६.]

सुा इहिदे

## राजमंडळ

### सा+ राजश्री पंतप्रधान

माहे रमजान छ ११ रोज

खाा दस्तकपत्रे राा पुणे

१ राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यासी. राा विष्णु विश्वनाथ कितेक सविस्तर सांगोन पाो आहे. सांगतील. मातुश्री बया तेथे आली आहे. याजविसी अज्ञा करणे ते पूर्वी केली त्याप्रमाणे यांचा बहुमान करणे.

१ राा शामराव नागनाथ यास. तुम्हास जाते समई कितेक विस्तारे सांगितले. सांगितले गोष्टी सिधांत करून लिहून पाठवणे. मातुश्री बयास सांगोन मातुश्री आईसाहेबांचे समाधान करणें.

१ राा विष्णु विश्वनाथ यासी. कितेक विस्तारे सांगितले त्यावरून तेथे जाऊन जे होईल अर्थ सविस्तर ते लिहून पाठवणे.

१ मातुश्री बर्या[१]. लोणंदचे मुकामीचे पत्र पेाा पावले. पुण्यास जाऊन तेथील वर्तमान सविस्तर लिहून पाठवीत जाणे. मातुश्री आईसाहेबांचे समाधान करून त्यांच्या लक्षांत असावें.

१ मातुश्री आईसाहेब सेवेसी. आमच्या सेरीरा सावकास नाही, हे वडिलास कललच असेल. परंतु आद्याप काही निश्यश जाले नाही. अद्याप ज्वर थोडाबहुत येतच आहे. औसेधी उपाय करीतच अहो. वडिलांचे

---

+ सरकार. रामराजा व पंत प्रधान एकत्र असतां लिहिलेलीं हीं पत्रें आहेत. १ दर्याबाई निंबाळकर.

चरण दृष्टीस पडल्याविना समाधान होत नाही. वडिलांचे चरण दृष्टीस पडत तो शुदिन. खा हे विनंती.

---

५

ताा देवीदास चोपदार निाा भवानी मिरधा

५ पत्रे

¶*Ramraja wrote five letters to the Peshwa, Shyamrao Nagnath, Vishnu Vishvanath, his sister Daryabai and grandmother Tarabai. The substance of the letters is noted in this paper.*

---

No. 80] [18-8-1750

रु. नं. १७२६ ( जमाव )

## राजमंडल.

**साा राजश्री पंत प्रधान सु इहिदे.**

माहे रमजान छ २६

रोज वद्य त्रयोदसी मंदवार

मुाा पुणे फेरिस्त खाा[1] दस्तके.

१ राजश्री सिवाजी सांलोखे यासी आज्ञा केली ऐसिजे. तुम्हीं विनंतीपत्र पाठविले ते प्रविस्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला. अंताजी सिवदेव मिरज प्रांती उपद्रव करित आहेत. किल्याचे बेगमीचा अर्थ तरी सर्व विदित केलाच आहे. जागा जतन जाली पाहिजे म्हणून च्यार पाचसे प्यादे व राऊत जमा केले आहेत. अंताजीपंत यांचा व सेवकाचा मुकाबला होतो. तरी स्वामीनी कुम(क) करावी व बेगमी करून पाठवावी म्हणून कितेक विस्तारे लिहिले, व राजश्री नरसी तुबाजी यानी विनंती केली. यैसियासीं तुम्हीं जागियात जमाव केला; उतम गोष्ट केली. अंताजीपंताचे पारपत्यास राजश्री उदाजी चव्हाण हिमतबहादर ममलकतमदार यासीं रवाना केले ते तुमच्या तालुक्यानजीक लोकरीच येतील. ते व तुम्हीं सामील होऊन नतिजा देणें म्हणून आज्ञापत्र सादर केले आहे. बेगमीविसीचा अर्थ राजश्री नरसी तुबाजी यांजला आज्ञापिला आहे. लिहितील त्याजवरून कलल. सांप्रते स्वामीची स्वारी पुणियासी जाली आहे. सातारा आलियांवर बेगमीविसीची आज्ञा केली जाईल, खा बहुत काये लिहिणे ?

---

[1] खास.

१ राजश्री माहादजी सिंदे यांसी कीं तुम्हीं किले मिरज येथ जाऊन पोहचणे. खा बहुत काये लिहिणे ?

१ राजश्री संतोजी सिंदे व सखोजी सिंदे व आगाजी सिंदे यासी की तुम्हीं किले मिरज येथ जाऊन पोहचण. रवा बहुत काये लिहिणे ?

¶*Substance of three letters dispatched by Ramraja to Shivaji Salonke, Mahadji Sinde, and Santoji Sinde, asking them to proceed quickly to Miraj against Antaji Shivdeo.*

---

*No. 81*] [*18-8-1750*

रुमाल नं. १७२६ (जमाव)

**राजमंडल**

**सा राजश्री पंत प्रधान** सुा इहिदे

माहे रमजान छ २६

रोज वद्य त्रयोदसी मंदवार

मुा पुणे खासदस्तके

१ राजश्री खेत्रोजी सिंदे यासी की तुम्ही किले मिरज येथ जाऊन पोहचण म्हणोन. खा बहुत काये लिहिणे ?

१ राजश्री थबाजी भोसले यासी की तुम्हीं किले मिरज येथ जाऊन पोहचण म्हणून. खा बहुत काये लिहिणे ?

१ राजश्री ये(स)वंतराव वोलेकर यासीं कीं तुम्ही किले मिरज येथ जाऊन पोहचण म्हणोन. खा बहुत काये लिहिणे ?

१ राजश्री संभाजी घोरपडे यासी की तुम्हीं किले मिरज येथ जाऊन पोहचण म्हणोन. खा बहुत काये लिहिणे ?

१ राजश्री सिवाजी भोसले यासी की तुम्हीं किले मिरज येथ जाऊन पोहचण म्हणोन. खा बहुत काय लिहिणे ?

१ राजश्री मालजी चव्हाण यासी की तुम्हीं किले मिरज येथ जाऊन पोहचण म्हणोन. खा बहुत काये लिहिणे ?

---

१९

ता रामाजीपंत दिा

सिवाजी डुबल

¶*Six more letters dispatched by Ramraja are entered here, ordering the addressees to proceed against Antaji Shivdeo.*

No. 82] [19-8-1750

जमाव रु. नं. १७२६]

**राजमंडल** मुा इहिदे

सा राजश्री पंत प्रधान माहे रमजान उर्फ श्रावणास

तेरीज छ २७ वद्य चेतुर्दसी रविवार मुा का पुणे. फरिस्त खास दस्तकपत्रे.

१ राजमान्य राजश्री फतेसिंग भोसले यासी. तुम्हास आज्ञापत्र सादर केले की, हुजूर येणे. त्यास, श्वामी लवकरच तेथे येतात. तुम्ही येथे न येणे. श्वामी अलियावरी तेथेच सांगणे ते सांगितले जाईल. श्वामी येत तोंपर्यंत शाहारची वगैरे बंदोबस्ती करून खबरदार राहणे. यावयाचा विचार सर्वथा न करणे. खा सूज्ञ असा. १

ता बुवाजी जगदला दिा बुवाजी सिंदा हुजुरे बारा

¶*The Peshwa asks Fatesingh Bhonsle not to accompany Ramraja to Poona but to station himself at Satara for the protection of the town.*

---

No. 83] [4-8-1750

**श्रीरामचंद्र माहाराज रघुवीर**

चिरंजीव राजश्री सिवराम पंडित यासी आसीर्वाद विनंती उपर. येथील क्षेम ताा श्रावण शुध त्रयोदसीपर्यंत वर्तमान कुशल आसे विशेष. तुम्ही शाहाजी माने याजबाा पत्रे पाा ती द्वादसी शुक्रवारी पावली.

लिहिले वर्तमान कलले. तुम्हास बरे वाटत नाही, आंडास दुख जाले आहे, ज्वर येतो, हे वर्तमान यैकोन परम चिंता प्राप्त जाली आहे. तुम्ही छांदस, हेकाड, सांगितले यैकत नाहीं, यासी येत्न काये करावा ? प्रालब्ध तुमचे तुम्हाबाा आहे. वोशद उपाये करून आरोग्य करून घेणे. आम्ही यावे तर मातुश्री बाा आलो. येथे अडकलो. तूर्त येता न ये. राज्या-तील विचार मनसबा पाहून येऊं.

राा विनाजीपंत व राा राघोपंत याचा मजकूर लिहिला तो कलला. तुम्हास खर्चास रुा देत नाहीत. आम्हास येथे रुा देत नाहीत. दाहा आकरा हजार पावले म्हणत आहेत. राा विसाजीपंत आले त्याची ऊर्मी शांत जाली. जातां येता भागले. राा बाबूराऊ मलार थोर सावकार बखतवार आहेत. विनाजीपंताचा आमचा बनाव बैसत नाही. परिणाम लागत नाहीं. आम्ही येथें सावकार करीत आहो.

वरचेवर राजकी व आपले श्वकीये वर्तमान आरोग्य जालियाचे लिहिणे. १

कोलापूरवासी राजे वालव्यास आणिले. आवघे राज्य घेणार. राजे व आमचा आपाये करणार. परंतु 'मनसा चिंतिते कार्यं देव अन्यत्र चिंतये' यैसा आर्थ आहे. दुष्टानी बहुत आपाये योजिला आहे. देव करील ते होईल. १

तुम्ही येखादा सावकार करणे. कतबा लिहून देऊन आपली दिनचर्या चालवणें. कर्ज वारून देऊ. येत्नास व साहसास आंतर करीत नाही. १

सविस्तर मागाहून लिहून पा॥. तुम्ही सावध राहून सिराले वालवे येथील बातमी राखणे. १

¶*The writer Bhagwantrao Amatya learns with regret of the illness of the addressee his brother and begs him to take care of his health. He also implores the addressee to watch carefully the movements of the Raja of Kolhapur who is at Walve, proceeding to Satara.*

---

*No. 84]* *[21-8-1750 ?*

पौ छ २९ रमजान

**श्री**

**श्रीमंत महाराज मातुश्री**
**आईसाहेबाचे सेवेसी**

सेवक मालोजी पाटील भोसले मौजे सिंगणापूर विज्ञापना ऐसीजे. पुरवी साहेबास अर्ज करून पत्र रा॥ देवराव यासी व देशमुख देशपांडे यासी ताकीद दिल्ही. त्या * * * देवरायानी पत्र टाकिले. देशमुख देशपांडे बोलिले कीं, पेशवे जे सांगितील ते ऐकूं. ऐसा जाब दिल्हा. माहाराजाची ताकीद मानीत नाहीत. त्यासी मौजे निरगुडेविसी रा॥ साबाजी नाईक बोलिले की, आम्हास पत्र श्रीमंत माहाराजाचे आणून देणे; आम्ही विल्हेस लाऊ देऊं. तरी साहेबी आपले पत्र दिल्हे पाहिजे. पत्र दिल्हियाने कामकाज होईल. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*Maloji Patil of Shinganapur complains to Tarabai that the orders issued by her were set at naught by the Deshmukh and those from the Peshwa obeyed instead.*

No. 85] [26-8-1750

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी

सेवक जिवाजी गोविंद नमस्कार विनंती. तागायत छ ४ शेवालपर्यंत सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. भाद्रपद सुध पंचमी मंदवारीं दिवस प्रहर उरला होता. राजश्री अंताजीपंतदादा व उदाजी चव्हाण हिमतबहादुर या उभयतां-मधें युध्यप्रसंग जाहाला. उदाजी चव्हाण युध्यामध्यें भन्न[१] पावला. जूज मोठें घोराचें जाहलें. हती तीन व निशानें तीन व नौबतीचे उंट दोन पाडाव जाहाले. या-खेरीज डेरे दांडे व राहुटिया व पाले देखील लुटून फना केलीं. दाहावीस मनुष बरे नामांकित ठार जाहले; व शेंदीडसें मनुष जखमी उभये दलीचीं जाहालीं. उदाजी चव्हाण पलोन कुंडलेस गेला. यासिवाये लोकांस घोडीं पाडाव सापडलीं. राजश्री सावाजी घाटगे यासी जखम लागली आहे व आणखी नामी नामी लोक यासीहि जखमा लागल्या आहेत. रताजी चव्हाण यासी जखमा लागल्या आहेत. यैसा प्रसंग जाहाला तो सेवेसीं लिहिला आहे. श्रीमंत राजश्री अंताजीपंतदादास येश आलें. कललें पाहिजे. बहुत काये लिहिणें हे विज्ञापना.

¶*Jivaji Govind to the Peshwa, reporting the victory gained by Antajipant over Udaji Chavan.*

---

No. 86] [August 1750

**श्रीरामचंद्र रघुवीर**

विनंती उपर. रा। सुबाराव घोर(पडे) घरास आले होते. वस्त्रें आम्हास दिली. सौरस्याची बोली जाली आणि गेले. मातुश्री आईसाहेबास विदित करणें. मर्जी पाहून आमचे चिठीची अर्ज विनंती करणें. श्रावण मासीची दक्षणा व गणेशचतुर्थी, गौरी व वामनद्वादसी, अनंतचतुर्दसी, पक्ष व श्राधें, दसरा, नवरात्र आले. खर्चास पाहिजे. याजखेरीज पोटखर्च व कापड, आले गेले, हतीघोडी, नित्य खर्च फाटी व शाकभाजी किरकोल भणियाचे नावाप्रों चालिला पाहिजे. अर्ज करणें हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya asks the addressee to communicate to Tarabai the news of the arrival of Subarao Ghorpade and asks him to request her to send money to him to meet his expenses for the various forthcoming religious functions.*

---

१ भन्न ? अथवा फन्ना ?

No. 87] [20-9-1750

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

पोष्य श्रीपतराव बापूजी कृतानेक नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ २९ सवाल पावेतों स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. बालकृष्ण श्रीनिवास कारकून याजबाा राजश्री दादोबा प्रतिनिधि यांजकडे द्यावयास पोशाख वगैरे सनगे व पलंग बिछाने व केशर व कस्तुरी वगैरे किरकोल जिनस स्वामीनी पाठविला तो यादीप्रमाणें काली दों प्रहरा प्रविष्ट जाला. त्याउपरी संध्याकालीं स्वामीचे आज्ञेप्रमाणे पोशाख वगैरे जिनस व पलंग बिछाने नेऊन प्रतिनिधि यांस दिल्हे. आम्ही बिन्हाडास आलो. दोनच्यार घटका रात्र जालियावर रा येशवंतराव लक्ष्मण यास बोलाऊन नेऊन सांगितले की, सनगे घेतली, यांचे तूर्त प्रयोजन नाहीं. बरोबरील सनगे आहेत, त्याजवर च्यार दिवस चालतच आहे. ही सनगे घेऊन जाणें म्हणौन सांगितले. त्याउपरी रात्रौ तो मजकूर तसाच राहिला. दिवस उगवल्यावर आंम्ही गेलो. कितेक प्रकारे गोष्टी सांगितल्या, परंतु यागीपणाचेच जाबसाल केले. त्याउपरी बहुत तऱ्हेने सांगोन त्याच्याच मनुष्याचे स्वाधीन बासने करून ठेविली. त्यानी स्वामीस लेहून पाठवावयाविसी सांगितले, त्यावरून सेवेसी लिहिले असे. येविसीची आज्ञा होईल त्याप्राो वर्तणूक करूं. सेवेसी श्रुत जाले पाहिजे हे विनंती.

¶*Shripatrao Bapuji as instructed by the Peshwa hands over the robes of honour to Dadoba Pratinidhi.*

---

No. 88] [25-9-1750 ?

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान

स्वामीचे सेवेसी

विनंती शेवक हरि राम साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ ४ जिलकाद जाणून स्वामीचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे. यानंतरें श्रीमंत राजश्री भाऊसाहेब याणी आज्ञा करून कोलें येथील ठाणें खालीं करावयास रवाना केलें ते छ मजकुरी कोल्यानजीक मुकाम करून राहिलों. याउपरी होईल वर्तमान तें सेवेसीं लिहिलें जाईल. सिरवलचा गुमट करवीरवासी यांकडील बधलला होता त्यास आमचे विचारें त्याकडील संदर्भ लागला. त्याव-रून करवीरवासीयाचें त्याचे सौरश करून गुमट खालीं करून त्याचे

केला. माहाराजहि आठ रोज होते. प्रस्तुत नवरात्राकारणें करवीरास गेले. राजश्री राणोजी घोरपडे सेनापति श्री पंढरीस गेले. जातां राजश्री येमाजी सिवदेव याची भेट जाली. तेथून पंढरपुरास जाऊन श्रीचें दर्शन घेऊन माघारे उलटले. फिरोन राजश्री येमाजीपंताची भेट होऊन कितेक मनसुब्यावर होते. त्यास स्वामीचें पत्र आम्हांस आलें त्यावरून सेनापतीकडे पत्रें पाठविलीं व शाहाणा माणूसहि पाठविला. कितेक पर्याय सांगावयाचे ते सांगितले. त्यावरून सेनापति निघोन कापसीस आले. बहुमानास येक गज व दोघां मुलांस दोन कडीं व घोडीं वस्त्रे देऊन बहुमान केला. सेनापति स्वामिवितरिक्त आहेत येसें नाहीं. त्याकडीलहि मातबर माणूस स्वामीकडे येणार त्याचा कांहीं दुसरा विचार किमपि नाहीं. करवीरचे बातमीविसीं आज्ञा; त्यास त्याचे बातमीत वरचेवर आहों. अधिकोत्तर होईल तें सेवेसीं लेहून पाठऊं. सेवेसीं वर्तमान कळावें यास्तव लिहिलें असे. श्रुत होय हे विनंती.

¶*Hari Ram reports to the Peshwa his arrival at Kole and the amicable settlement about the post of Shirol with the Raja of Kolhapur through him. He adds that Ranoji Ghorpade had gone to Pandharpur and on his way met Yemaji Shivdev.*

---

*No. 89]* *[26-9-1750 ?*

## श्रीभवानीप्रसन

### श्रीमंत राजश्री रघुनाथपंत स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक येमाजी सिवदेऊ कृतानेक नमस्कार विज्ञापना. ता। छ ९ जिलकाद मुकाम सांगोले स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित आसे विशेष. राजश्री गंगाधरपंतीं विनंती करावयाची ते केलीच आहे. प्रस्तुत आमच्या प्राणावरी विचार आला आहे. राजश्री सदासिवपंत यासी विनंतीपत्र लिहिले आहे. परंतु तेहि सदय होत नाहींत. श्वमुखे येऊन श्रीमंतास विनंती करावी हा हेत साहा महिने होता परंतु घडोन न ये. प्रस्तुत राजश्री श्रीमंत प्रतिनिधि याचे निमित्य जाले आहे, येविसी श्रीमंतास विनंतीपत्र लिहिले आहे. पत्रार्थ स्वामीनी अवलोकन करून आमचे निमित्य वारे आणि श्रीमंतांचे कार्य होऊन निर्वेध प्रसंग होये, श्रीमंत राजश्री प्रतिनिधि याचे दुर्निमित्य दूर होऊन त्याची स्थापना होय, ते जालियास पुण्यपुरुषार्थ आहे. सेवेसी श्रुत होये. आज्ञा

जालियास कारकून मातबर पाठऊन कराराप्रमाणे वर्तणूक करूं. येविसी श्रीमंत राजश्री सदासिवपंडित यासीही जे लिहिणे ते लिहिले पाहिजे. हे विज्ञापना+

¶*Yamaji Shivdev finds that his intercession for the Pratinidhi made to Sadashivrao Bhau had failed and therefore writes to Raghunathrao requesting him to set the matter right.*

---

*No. 90*] [*30-9-1750 ?*

## रामचंद्र श्री रघुवीर

विनंती उपर. मातुश्री आईसाहेबी कृपालु होऊन दसरियाची सनगे दुस्त[1] माहादजी जामदार याजबा। पो। ते पावले. मस्तकी वंदिले. बाहेर सदरेची शोभा जाली. पोटास आन्नवस्त्र पाहिजे. रांडापोरे उपवासी. कारकुनास वस्त्रे पाहि(जे)त. करुणा करावी. यैसा आर्ज करणे हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya acknowledges with thanks the robes of honour sent by Tarabai and expatiates in his usual strain upon his dire needs.*

---

*No. 91*] [*30-9-1750*
जमाव, रु. नं. १७२६.]

## राजमंडल

सुा इहिदे.

साा राजश्री पंतप्रधान माहे जिलकाद अस्विन मास. तेरीख ९ रोज शुध येकादशी भानुवासर मुा सांगोले. फेरिस्त खासदस्तकें.

राजश्री सिवाजी सलोंखी यास कीं, स्वामीचा मुकाम सांगोलियावर होऊन गावांस मोर्चेबंदी केली आहे. तर मिरजेच्या किल्यातील दारू खंडी १ येक व सिसे ·॥· दाहा मण बदरका[2] देऊन जलदीने रवाना करणे व मिरजेच्या ठाणियास ताकीद करून सेंभर दुकाने दाणागला भरून पाठऊन देणे. खाा बहुत काये लिहिणे ? १

ताा माहादाजी येसाजी

दारूवाला यास कीं, दारू घेऊन जलदीने येऊन पोंहचणे, दिरंग न लावणे म्हणून

ताा रामाजी माणकेस्वर १

¶*Ramraja orders ammunition for the bombardment of Sangola from Miraj.*

---

+ यमाजी शिवदेवाचें खोंचदार पत्र. १ ? २ बदरका – सशस्त्र संरक्षक.

No. 92] [1-10-1750

श्री

नकल.

राजश्रियांविराजित राजमान्य राजश्री
श्रीपतराऊ बापूजी स्वामी गोसांवी यांसी.

पो। सदासिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करणें विशेष. राजश्री जगजीवन पंडित यांस आणावयाचा करार जाहाला. येमाजीपंत येऊन भेटले. मारनिलेची व दादोबाची भेट जाहाली पाहिजे. यास्तव आणावयाविसीं तुम्हास लिहिलें आहे; तरी जे क्षणी पत्र पावेल तेच क्षणी दादोबास व त्याच्या उभयेता स्त्रिया व कारकून माणसें जी असेल ती किल्याखालती उतरोन साहित्य घोडी माणसें व उंटे व बो। खर्चास देवून आम्हाकडे रवानगी सत्वर करणे. येविसी विलंब घटकेचा न करणे. तीर्थरूप राजश्री नानास तुम्ही लेहून पाठवणें. येथूनहि तीर्थरूपांस लिहिणे तें लिहिलेंच आहे. तुम्ही पत्रदर्शनी मारनिलेची रवानगी लिहिल्याप्रमाणें सत्वर करणे. विलंब न लावणें. येथे बोलणें ते बोली सर्व जाली. लस्करांत येवून येमाजीपंत उभयतासुधा राहिले. याउपरी प्रतिनिधीस यांची भेट करून मोकळे केलें पाहिजे. याप्रो। सर्व पर्याय त्यास समजावून पत्र पावतेक्षणी साहित्यसहवर्तमान लौकर पाठवून देणें. येमाजीपंतानी आपलेतर्फेचे ग्रहस्त पाठवले आहेत हेहि सांगतील. त्यांस लौकर पाठवणें. जितका विलंब लागेल तितका गुंता पडेल. यास्तव लौकर रवाना इकडे येवून पावत ते करणे. जाणिजे छ १० जिल्काद हरि गोपाळ यांस बराबर राऊत देऊन रवाना केले असेल. बहुत काय लिहिणें हे विनंती.

¶*Sadashiv Chimnaji to Shripat Bapuji from Sangola asking him to release from confinement Dadoba Pratinidhi and to bring him with his family and retinue to Sangola in order that he might see Yemajipant.*

---

No. 93] [4-10-1750

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी

पोष्य शामराव अंबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागायत छ १३ जिलकाद दोन घटका रात्र पावेतों स्वामीचे कृपेकरून

यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचें पत्र छ १० जिलकादचें आलें तें छ १३ मिनहूस आस्तमानी प्रविष्ट जालें. तेथें आज्ञा कीं, राजश्री येमाजीपंत उभयेता सुधा येऊन भेटले, प्रतिनिधीची त्याची भेट करून मोकलें केलें पाहिजे, तरी पत्रदर्शनी उभयतां स्त्रियांसहवर्तमान रवानगी करणें म्हणून आज्ञा केली. त्यावरून राजश्री दादोबा प्रतिनिधि याची रवानगी आज्ञे-प्रमाणे उदईक प्राथःकालीं करावी लागते. याकरितां दाहा पंधरा घोडीं व पांच उंटें व पंचवीस कामाठी याप्रमाणें पाहिजेत. तरी उदईक त्रितीय प्रहरीं सदरहू येऊन पावे ऐसी रवानगी करावयाची आज्ञा केली पाहिजे. श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीचे पत्राची नकल पाठविली आहे त्यावरून विदित होईल. राजश्री नारो आपाजीहि साघटिका रात्रीं दाखल जाले. सेवेसीं श्रुत जालें पाहिजे हे विनंती.

¶*Shamrao Ambaji requests the Peshwa to send the escort required to accompany the Pratinidhi from Purandhar to Sangola where he was asked to be sent by Bhausaheb.*

---

*No. 94]* *[5-10-1750*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान**

**स्वामीचे सेवेसी**

पोष्य श्रीपतराव बापूजी कृतानेक नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा छ १४ जिलकादपर्यंत स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीची पत्रे राा हरि गोपाल व नागोजी सिंदा याजबरोबर आलीं येथें आज्ञा कीं, राजश्री येमाजीपंत येऊन भेटले. त्याची व राजश्री दादोबा प्रतिनिधि यांची भेट करून मोकले केले पाहिजे तरी त्यांजला वस्तभावसुधा उभयेता स्त्रियांसहवर्तमान खर्चविचाची बेगमी करून पत्रदर्शनी रवानगी करणे म्हणौन आज्ञा केली. त्यावरून काली आस्तमानी प्रतिनि(धि) स्त्रिया-समवेत देखील वस्तभाव खाली उतरोन माचीस आमचे घरी मुकाम जाला. त्याजउपरी राजश्री नारो आपाजी आले. त्याबाा स्वामीनी त्यांचे रवानगीची आज्ञा केली. त्याप्राा रवानगी आज भोजनोतर केली. मौजे म्हांडर[१] येथील मुकामास गेले. कारकुनास वगैरेयास बसावयासी घोडी व वोझ्यास कामाठी बिगारे व राा येशवंतराव, लक्ष्मण शंकर लोकसुधा आज्ञेप्रमाणे दिल्हे असेत.

---

१ पुरंदर किल्ल्याच्या दक्षिणेस तीनचार मैलावर.

प्रतिनिधीसमागमे येक हजार रुा खर्चास दिल्हे. राजश्री हरि गोपाळ व म्हालोजी मुठे यांचे पथक बरोबर आहे. उदईक पाडळी येथील मुा आहे. तेथून किन्हईस जातील. पुढे तिही मजलीनी लस्करात जावे यासी करार केला आसे. सेवेसी श्रुत जाले पाहिजे हे विनंती.

*¶Shripatrao Bapuji gives effect to the Peshwa's order regarding the release of the Pratinidhi and his meeting with Yemajipant. Shripatrao writes about the arrangements he had made for sending men and money with the Pratinidhi for his safe journey.*

---

*No. 95]* *[5-10-1750*

पौ छ १७ जिलकाद

**श्री**

राजश्री त्रिंबक हरि मजमदार
गोसावी यासी

ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री फतेसिंग भोसले रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. राजश्री सदासिवपंत भाऊ याची आमची भेटी होऊन सांगोल्यास आलो, हे पूर्वी तुम्हास लिहिलेच आहे. ऐशास बोलीचाली प्रसंग तेथील कराराप्रमाणें निर्गमांत आला. आमचे निसबतीचा कारभार तुमचे हाते घ्यावा ऐसा राजश्री भाऊचा व आमचा करार जाला आहे; तरी तुम्ही राजश्री पंतप्रधान याचा निरोप घेऊन बहुत सत्वर येणे. जाणिजे. छ १४ जिलकाद हे विनंती.

*¶Fatesing Bhonsle agrees with Bhausaheb at Sangola to appoint Trimbak Hari as his personal secretary and asks him to take charge soon.*

---

*No. 96]* *[8-10-1750*

जमाव, रु. नं. १७२६. ]

मुा इहिदे

**राजमंडल**

सा राजश्री पंतप्रधान माहे जिलकाद आस्विन मास. तेरीख १७ रोज वद्य पंचेमी इंदुवासरे मुा सांगोले. फेरिस्त खास दस्तकी चिटणिसी पत्रें.

सुज्यायेत दस्तगाहा सेखमिरा यांस की रा लक्षुमण बलाल निा राजश्री पंतप्रधान यानी माहादजी खोडके

मातुश्री आईसाहेब यांसी कीं, सांप्रत आसीर्वादपत्रीं सांभाळ न जाला. यैसे नसावे. पुण्याहून वडि-

याचे घरी हिसेबाकरितां माणसे वसविली होतीं म्हणोन विदित जाहाले. माहादजी खोडका हुजूर आहे. हिसेब देणे तरी येथे देईल. घरी माणसे वसवावी यैसे नाही. राजश्री सदासिव चिमणाजी याचे पत्र त्यास पाठविले आहे. तुम्ही त्यास सांगोन कोण्हाचे घरी दंगा करू न देणे म्हणून. खा। बहुत काये लिहिणे ? १

ता। माहादजी खोडके

राजश्री सावाजी नाईक निंबालकर यांसी कीं, तुमचा निष्ठेचा भाव कितेक राजश्री पंतप्रधान यानी नेवेदन केला, त्याजवरून हे पत्र सादर केले असे. तर तुम्ही दर्शनास येणे. वरकड कितेकविषीं आज्ञा करणे ते रा। मल्हार जिवाजी यांस केली आहे. हे सांगतील त्याजवरून कलेल. खा। बहुत काये लिहिणे ? १

लांचे कूच होऊन श्रीमाहादेवाकडे आगमन जाले हे परस्परे श्रवण जाले. संतोष जाला. परंतु वडिलीं न लिहिले. श्रीमाहादेवाचे उद्येषे आगमन जाले; उतम गोष्टी जाली. आमचा हेत कीं, श्रीपंढरपूर समीप आहे; आपण यावें, आम्हासहित श्रीदर्शन करावें. तदोतर माहादेवास जाऊं. तर अगत्य आले पाहिजे म्हणून पत्र. खा। हे विनंती. १

ता। गोदजी पवार जासूद दि। आपाजी रघुनाथ

राजश्री आबाजी सर्ज्याराव घाटगे यांसी कीं, तुम्ही विनंतीपत्र पाठविलें, पावले. लिहिले विदित जाले. पुरातन स्वामीचे पदरचे, आज्ञा जालियां दर्शनास येऊ म्हणून लिहिलें; तर उतम. सर्व प्रकारें तुमचे स्वामीस अगत्य आहे. चालवावयास अंतर करणार नाहीं. तुम्ही दर्शनास येणे. खा। बहुत काये लिहिणे ? १

¶*The substance of four letters written by Ramraja is entered in this paper.*

---

*No. 97*] [*26-10-1749*

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक बनाजी माधवराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ २९ जिलकाद पावेतों मुकाम जवले परगणें ढोकी तेरणातीरीं कृपाकटाक्षें जाणून स्वानंदातिशय लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. येथील बातमीचें वर्तमान राजश्री रघुनाथ गणेशानीं सविस्तर सेवेसीं लिहिलें आहे त्यावरून चितारूढ होईल. शहानवाजखान व सैदलस्करखान यांजकडील पत्रें

नवाबास आली कीं मुजफरजंग त्रिचनापल्ली चंदाबराकडे जाणार. फौज त्याची आवघी बेइस्तेक्लाल[1] जाली आहे. यांची सलाबत ग्वादली म्हणून. त्याजवरून यांची निशा जाली आहे कीं ग्वानासमागमींची फौज व पठाणही त्यांस शामील होणार. ते ते उभयतां मिळूनच त्यांस तेवीं करूं सकतील. आपण याच प्रांतीं राहून सातारियास राज्यविराजीचा[2] प्रसंग जाला आहे त्या गोष्टीचा प्रसंग जसजसा होईल तसतसा जबरदस्ती पोहचाऊन उपमर्द होये तो अर्थ करावा. यांचे मूळ तर, राणीकडील व पंत प्रतिनिधीकडील राजकारणें यांजकडे यैसीं लागलीं आहेत कीं संभाजी राजे यांस थोरल्या नवाबानी हातीं धरलें होतें. तेव्हां श्रीमंताचे वैमनस्याकरितां आतांही यांचेच प्रबळ फार जालें आहे. आम्ही सर्वभावें तुमचे आज्ञेंत आहों, दाभाडेही आपले विचारांत आहेत. सर्व प्रकारें आमचें साह्य करावें, यैसीं राजकारणें लागली आहेत. त्याजवरून यांसही दुर्बुधी जाली आहे कीं याच प्रांतीं राहावें. अथवा करकमभोसे[3] या प्रांतीं दवाव पाडावा. दबावानें ठाणीं सुटतील ते सोडवावीं. सैदशरीफखानाबरोबर रेकारपूर्वक[4] येणार, त्याचे बातमीस जासूदजोड्या पाठविल्या. ते निघाले किंवा निघणार, कधीं येणार यैसें वर्तमान वरच्यावर कळलें पाहिजे म्हणून. दुसरें काल छ २४ मिनहूस मोरोपंत व नवाब यानीं खलबत बहुत वाडहोळ केलें. दरबार मना जाला. सर्व खलबतांखालें दिवस गेला. संध्याकालीं नवाब दरगाह पाहावी म्हणून मोहळ म्हणून गांव आहे तेथें गेले. सांप्रत सर्व अधिकार खलबताचा देखील विप्राचा जाला आहे. दुर्बुधि विशेष होत जाते. स्वामीचा उत्कर्ष बहुत यांस आसह्य जाला आहे. यैकिलें वर्तमान सेवेसीं लिहितों. सत्यमिथ्य ईश्वर जाणें. पुढेंही या गोष्टीचा दाखला आढळेलच. प्रतिनिधीकडील तो राजकारण यांजकडे पूर्वीपासून आहेच. तें तें राणीकडीलच यैसें समजलें पाहिजे. राणीनें त्या द्वारें पत्रें पाठवावीं. परस्परें उत्तर प्रतिउत्तरेंही जात असतात. राजकारण तों खरेंच आहे. परंतु यांस फावेल तसें करतील. दाभाडीकडे सा रोजाचे वाइदियानें कासीदजोडी गेली आहे. त्या गोष्टीचा मजकूर हाच असावासा आहे. सातारियाचे चालणेंत बहुत आहेत. आबदुल हुसेनखान स्वामीकडे आले आहेत, त्यांचीं उत्तरें कसींकसीं येतात, हेही प्रतीक्षा आहे, केवल स्वामीकडे आले आहेत यैसें नाहीं. चाळणा फार करतील. कळावें म्हणून लिहिलें आहे तदनुसार करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा निरंतर असूं दिधली पाहिजे हे विज्ञापना.

¶*News-letter from Nasarjang's camp describing his efforts to undermine the Peshwa's influence.*

---

१ कमजोर, इस्तक्लाल=जोर. २ राज्यक्रांति. ३ रघूजी भोसले ? ४ विठ्ठल सुंदरचा भाऊ.

3370

No. 98] [25-10-1750?

पौ छ १० जिल्हेज

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब
साहेबाचे शेवेसी

विनंती. शेवक येसवंतराव गायकवाड कृतानेक शेवेसी विज्ञापना. शेवकाचे वर्तमान ताा छ ९ जिल्हेजपर्यंत येथास्थित असे. साहेबी गतवरषी आज्ञापत्र पाठऊन शेवकास नेऊन बहुता भांतीने[1] सांगितलें आणि शेवकास आज्ञा दिली. येथे येऊन ज्याप्रमाणें साहेबी आज्ञा केली त्याप्रमाणें महाराजास विनंती केली. त्यास लटके पडिलो. प्रस्तुतही साहेबी आज्ञा करून शेवकास नेऊन आज्ञा केली की, महिना दीड महिनियाने हे ग्रहस्त बाहेर निवाले. हे कोणीकडे जातात हे पाहोन वडोन येईल. त्यास दोन महिने जाहाले. त्याचे काहीच नाही. शेवकाच्या पदरी लटिकवाद पडतो. तेव्हां साहेबाच्या आज्ञेप्रमाणें येथे शेवकाने विनंती केली असता दिवसगतीवर पडल्याने शेवकाकडे आली गोष्ट तर साहेबाच्या आज्ञेवरून बोलिलो असतो. याचा विचार साहेबास विदितच आहे. या उपरी दिवसगतीवर न पडावे. तेहि ग्रहस्त लाबले आहेत, इतकियात त्वरा केलिया उतम आहे. आपले येश दुसरियास द्यावे असे नाही. साहेबाचे साहेबीच येश घ्यावे यांत सर्वजाण साहेब आहेत. शेवकाची विनंती साहेबी आज्ञा केली त्याचवरून शेवेसी समर्पण विनंती केली आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Yashwantrao Gaikwad writes to Tarabai about a certain obscure matter. Can this Gaikwad be Damaji's elder brother or one of Kolhapur? (see No. 125)*

---

No. 99] [October 1750

श्रीरामचंद्र श्रीमाहाराज रघुवीर

चिरंजीव राजश्री सिवरामपंत यांसी आसीर्वाद विनंती उपरी. तुम्ही राा विठोजी सूर्यवंसी याजबरावर पत्र पाठविलें तें पावलें. लिहिले वर्तमान कळों आले. तुम्ही राहिला, उतम केलें. राजश्री आपाजीपंत पाठविले त्याणी अवघे वर्तमान सांगितले असेल. माहाराज राजे कारभारी यांच्या व राजश्री सदासिव पंडित यांच्या विचारें मौजे धामणेर येथे आले. पुढे काय मनसबा होईल तो पाहावा. आम्ही

---

१ भात = प्रकार.

आज पंधरा महिने या माहाराजांकरितां कष्टमेहनत करून श्रमसाहास केले. कर्जदार जालों. श्रीपंढरीची यात्रा करून राजे आपले खरेखुरे ऐसें दाहा जणाचे चितास आणून पुण्यास गेलों. राजश्री प्रधानाची भेट घेतली. अवघा जाला मनसवा विचार तुम्हांस ठावका आहे. राजा शाहू कैलासवासी जाले. या राज्यांस महदयत्नें आणिले. मातुश्रींचे आज्ञप्रमाणें चाकरी केली. आपल्या पदी बैसले. नऊदाहा महिने होत आले, अद्याप थांग लागत नाहीं. चौंघे चहूकडे वढीत आहेत. फितुरास उणें नाहीं. राज्यांत फितूर जाला आहे. आम्हांस कोण्ही पुसत नाहीं. या उपरी माहाराजास व राजश्री प्रधानास पुसोन हरकोठें जावें, कर्ज वारावें आणि आसत्या आयुष्यें देव देव करीत तीर्थयात्रा करावी. तुमच्या व चिरंजीवाच्या प्रारब्धी असेल तें घडोन येईल, या मतलबावर आहों. सीमा जाली. रा। आपाजीपंत यासी सत्वर पाठवणें. आम्ही वृध जालों. तुम्ही चिरंजीव आपला विचार करणे. हे विनंती.

*¶Bhagwantrao Amatya describes how he exerted in bringing Ramraja to Satara and installing him on the throne. He also complains about the treachery rampant in the kingdom.*

---

*No. 100]* *[October 1750*

### श्रीरामचंद्र श्रीमाहाराज रघुवीर

पुरवणी चिरंजीव राजश्री सिवराम पंडित यासी आर्सीर्वाद विनंती उपरी. राजश्री सिवाजी कृष्ण यासी बावडियास रवाना केले आहेत तरी याजबराबर हवी माणूस देऊन कागदपत्र सुरक्षित बावडियास पावेत तों अर्थ करणें. मार्गी धामधूम आहे. आकलबुधीनें मौजे सांगावास जावें. तेथें शोध करून पाऊसाचा उतार पाहून नदीचा उतार पाहून कुवारखेडींनें सालवणास भोगाव बारगाववरून जावें किंवा मलकापुराकडून जावें. आपले जीव कागदपत्र सांभाळून गेले पाहिजे हे विनंती. राजा शंभू उतावली करून वडगाव कराडपर्यंत आले होते. निकड जाली यैसे पाहून मागती माघारे गेले. ढोपरकोपर फोडीत गेले यैसे वर्तमान आहे.

*¶Shivram Pandit is asked by Bhagwantrao Amatya to send the papers with great caution to Bavda as the whole province is much disturbed. He also communicates the return of King Sambhaji from Karad in disappointment.*

No. 101] [28-11-1749

श्री

राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी

श्रीसकलगुणअलंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये श्नो सिदोजी थोरात कृतानेक दंडवत विनंती उपरी. येथील वर्तमान तागायत छ २८ जिल्हेजपावेतों येथास्थित असे विशेष. स्वामीनी अस्टेविशीं राजश्री नारायणराव ताल्या यासी पत्र दिल्हें त्यावरून आम्हीं त्याजकडील राजश्री हरिपंत यासी जितकें बोलणें तें बोललों. निदानी इतकेंहि पुसिलें जे, तुमचे हातून हें काम होये यैसें असेल तरी करणे, नाही तरी या कामांत पडावें यैसें नाहीं. यैसे बोललेवरी मशारनिलेनी हमी भरली जे, आपण खामखा आस्टें घेऊन तुम्हांस देतों, म्हणोन शफतपूर्वक बेलभंडार केला. त्याचे भरंवसियावरी आम्ही जाऊन इरेस पडलों. मशारनिले राजश्री उदाजी चव्हाण यासी घेऊन येतों म्हणोन निघोन गेले. आपणांकडील जमाव व आपले भाऊ रामचंद्रपंत ठेविले. पलीकडे विसोबासहि पत्रें लिहिलीं जे, पलीकडील चिकूडीकर देखील घेऊन येणे. यैसी कितेक प्रकारें बोलून आम्हांस खर्चाखालीं आणिलें. सेवट सर्वस्वें आमचा घात केला तो पत्रीं काय ल्याहावा? हा सविस्तर मजकूर परस्परें स्वामीस सर्व विदित जालाच असेल. केवल हलाख होऊन मुलकांत राहावयासी जागा नाहीं यैसें ज्ञालें तेव्हां स्वामीकडे मुले माणसें देखील घेऊन यावें हा विचार चित्तांत आणिला, तव श्रीमंत राजश्री पंत प्रतिनिधि यानी आपणांकडील कारकून पाठऊन आम्हांस बोलाऊन आपणांसनिध ठेऊन घेतलें. आपणांकडील राजश्री गणेशपंतहि येथें होते. त्यानीहि पत्र पाठविलें जे, तुम्ही प्रतिनिधीचे भेटीस येणे. त्यावरून येथें येऊन याजपासीं राहिलों असों. परंतु लक्ष अवघा स्वामीचे पायांपासीं आहे, दुसरा अर्थ जाणत नाहीं. गतवरसीं राजश्री गोविंदराव यासी आपण पाठविले त्यामुळें सर्वस्वें खराब जालों. सांप्रत आस्टेचे साहिल्यास आपण पत्रें लिहिलीं, त्यास राजश्री हरिपंतीं सर्वस्वें विस्वासघात करून गला कापिला. याउपरी कांहीं बाकी राहिली नाहीं. परंतु स्वामीचे पायाचा पूर्ण भरवसा आहे. सर्व प्रकारें ऊर्जित आपणच करितील हा भरंवसा मानून आहे. उभयेतां चिरंजीव यावयासी दिरंग लागला या कसालेमुळें दिवसगत लागली. सांप्रत रवाना केले आहेत. सत्वरींच सेवेसी येऊन पोहचतील. राजकी वर्तमान तरी करवीरवासी याचें व सतरुसीहून मातुश्रीचें अनुसंधान लागले. खामखा त्यानी सतरुषीस यावें, हा सिधांत जाला असे. हें वर्तमान राजश्री

प्रतिनिधीसहि विदित केला आणि स्वामीचे सेवेसीहि वर्तमान लिहिले असे. याची तरतुद करणार आपण समर्थ आहेत. सेवेसी विदित होये.

*¶Sidoji Thorat complains to the Peshwa against one Haripant for not fulfilling his promise of capturing Ashta for the writer. The secret negotiations between Sambhaji and Tarabai and Sambhaji's desire to proceed to Satara are reported to the Peshwa.*

---

*No. 102]* *[November 1750?*

श्री

तीर्थस्वरूप राजश्री आपाजी मामा वडिलांचे
सेवेसी

विज्ञापना. येथील मजकूर तीर्थरूप राजश्री दादाजीमामाच्या पत्रावरून विदित होईल. धोंडजी भोसले रंगोजी काकडे मन(स)बदार होऊन आले आहेत. जरीकरितां यास मनसब्यांत घातलें तरी परवरास आणितील हा निशा असो द्यावी, आणि यास फारसे मनसब्यांत न घालावे. जे करणे ते परभारेच करून आईसाहेबाकडील लोक येत आसिले तरी जलदीने पाठवावे. लोक पाठवाल ते या उभतास कलो न देता रवाना करावे, म्हणजे येथील खूल येकीकडे ठेऊन लोकास विचारे सांगोन उतरोन येतों. दादाजीस तो खामखा हरप्रयत्नें काढून लाऊन देतों. चिंता न करावी. परंतु लोक हवालदारानी फोडिले आहेत यामुलें दादाजी निवतांच आमच्या जिवासी गांठ पडते. बरे, ईस्वर समर्थ आहे. मी आपले जिवाची आस्था धरितों यैसे नाहीं. परंतु खामखा दादाजीस काढून लाऊन देतो. आपण धोंडजी भोसल्यास व रंगोजीस प्रतिनिधीकडे न पा(ठ)वावे. दुसरे हरकोणी माध्येस्तीस घाढून दरम्याने मातबर हरकोणास तरी घेऊन आम्हास उतरोन न्यावयाचे केले पो. आम्ही हा मजकूर लिहिला आहे तो या उभयेतास तों कलो न द्यावा. आंतरयामी ठेऊन यासच थोर माणूस भलेपण आणि गौरव दाखऊन आपला हात उगवे यैसे कीजे. यास च्यार दिवस तेथें गोऊन पाडावे. तूर्त येथे येऊ न द्यावें. प्रतिनिधीकडील आईसाहेबाकडील कोणताहि मजकूर करणे तों लौकर करावा आणि दरम्याने मातबर घ्यावा. सिबंदीमुले लोकानी दंगा आरंभिला आहे. बरे, तुम्ही पुणियास श्रीमंत राजश्री बाबूरावबावास व बंधूजीस लेहून तूर्त दोन हजार रुपये येत तो विचार करावा म्हणजे सर्व खुले येकीकडे ठेऊन आम्ही सुखरूप उतरोन येतो. लोकास फोडावें तेव्हा काही द्यावयास पाहिजे. से दोशाने निभाव

पडतो यैसें नाही. यास्तव कर्जवाम काढून तरी तूर्त दोन हजार सातारियास आणवावे म्हणजे काही देऊन घेऊन लोकास फोडून आम्ही निघोन येतो. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ केला पाहिजे, हे विनंती.

¶*The writer asks for some funds to be at once remitted to him secretly for bribing the sentries and effecting the writer's escape.*

---

*No. 103]* *[November 1750*

**श्रीरामचंद्र * * * रघुवीर**

चिरंजीव रा सिवराम पंडित यासी आसीर्वाद विनंती उपर. तुम्ही रा येसाजी अनंत व भुजंग याज बा पत्रे पा ती पावली. लिहिले वर्तमान कलो आले. माहाराज व रा सदोबा फौजसहवर्तमान मौजे त्रिपुटीवर आले. येक दोन रोज मुकाम आहे. मग सातारियास येणार. दर्शनांती सकल आर्थ कलल. रा सोईराबावा परमहंस यासी पावावयासी घोडी दिली आहेत ते दोनी तटू व रघू व रामजी व गणेश तुकदेऊ यासी आधी पो. सिलेदार आले म्हणऊन लिहिले तर (त्या)चे गुा हक देणे आहे. गुा कजिया वारला नाहीं. कैसे जातील? पोटास दिले पाहिजे. चवल पावला सोडणार नाहींत. सविस्तर रा बालाजीपंत सांगता कलेल. प्रधान व राजे करितील ते होईल. दौलभ[1] वेलावर (?) आहेत. दुष्टपणास आंतर करीत नाही. येमाजी- पंताची * ज खाली गेली. आमचा विचार देवावर आहे. डाव मोडत नाही. हे विनंती.

¶*Shivram Pandit is informed by Amatya of the arrival of King and Sadoba at Triputi whence they would proceed to Satara shortly.*

---

*No. 104]* *[12-12-1750*

**श्री**

**तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी**

आपत्ये त्रिंबक सदासिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ताा मार्गसीर्ष वद्य दशमीपरियेंत स्वामीच्या आसीर्वादेकरून येथास्तित असे विशेष. स्वामींनी कृपा करून आज्ञापत्र पाठविले ते पावोन बहुत अल्हाद जाहाला. याजप्रकारे कृपालु होऊन सांभाल करणार स्वाम समर्थ आहेत.

---

१ प्रभु.

दाभाड्याकडील मजकूर पंचवीस याचे येक अथवा आताच समागमे चढून निमे मुल्क द्यावा. त्यास सो कबूल केले, परंतु रोख दाहा यावे याची निशा त्याचे हाती नाही. दमाजी गायेकवाडचा लेक अथवा देवजी ताकपीर माहालकरी निशा करतील तेव्हां होईल. सेनापति झुंजायाचा आव दाखवितात. होणे जाणे कलतच आहे. सांप्रत जानबा, सटवोजी जाधव मध्यस्तीस गेले आहेत. देवजी ताकपीर आले. उमाबाई, आंबिकाबाई येणार. येका दो दिवसात श्रीकृपेने घडेल ते लेहून पाठऊं. वरादारांत कुचर्यांचे फार, यामुले नेट लागून कार्यसिधी लौकर होत नाही म्हणौन सविस्तर कृपा करून लिहिले ते कलले. यैश्यास स्वामीनीं लिहिला अर्थ प्रमाणच आहे. परंतु प्राप्त जाहाल्यास जो मनसबा जसा पडेल तो नेटाने सिधीस नेलाच पाहिजे. न्यावा. स्वामीचे पुण्यप्रतापे सर्व यथास्तित होईल, चिंता नाहीं. होईल वर्तमान वरच्यावर ल्याहावयांसी आज्ञा करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Trimbak Sadashiv advises Nanasaheb to conduct operations against Dabhade if he does not accept the compromise.*

---

*No. 105]* *[26-12-1750*

**श्री**

श्रीमंत माहाराज राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी. आज्ञाधारक त्रिंबकराव गिरमाजी कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ ७ सफरपावेतो स्वामीचे कृपाकटाक्ष्यावलोकनेकडून सावनुरी सुखरूप आसो विशेष. पूर्वी सरकारचे कासीदजोडीसमवेत विनंतीपत्रें पाठविली तीं प्रविष्ट होऊन सकलार्थ विदित जाहला आसल. दों महिन्याखाली स्वामीचीं पत्रें त्यांस आली होतीं की कर्नाटकाकडे स्वारी होणार आहे त्याजवरून काही बाकीचा निकाल करून रा। सिवराव यास व आम्हास सर्व * * पाठऊन द्यावे यैसे बोलत होते, इताकियांत नासरजंगास पठाणानी जिवें मारिले हें वर्तमान ऐकताच रवानगी मोकुफ जाहली. सांप्रत कोणाचेहि भये नाहीं. जाणून कालोचितावरी द्रिष्टी दिल्ही आहे. विनाफौज बाकीचा निकाल होत नाही. बहिरंगे स्वामीच्या श्नेहाविना दुसरी गोष्टी काये आहे, म्हणून बहुत उपच्यार बोलत असताहेत. छ १९ मोहरमी सारे पठाण मिळून नासरजंगास जिवे मारिले तेच समयी हिदायेत मोहीदीनखान यास मसनदनिषीन केले. सारी दौलत नासरजंगाची प्राप्त जाहली. राजश्री रामचंद्रराव जाधव व वेंकटराव निंबालकर व जानोजी निंबालकर यांजकडे नासरजंगाचा कबिला व दोघे बंधु होते. पठाणानी

दबकवितांच दोघे बंधु व कबिला स्वाधीन हिदायेत मोहीदीनखानाचे केला. तिघे जणानी पठाणाचे मारफतीने मुलाजमत केली. येक येक घोडा व सीरपाव मुजफरजंगानी दिल्हा. त्या दोघा मुलास कैद केलें. व मोरोपंत आदिकरून सर्व रुजू जाहले. खजाना हस्तगत जाहला. चंदाखान अद्याप फुलचेरीस आहे मणून छ ३ सफरी यांची कासीदजोडी आली व सातारागड मातुश्री ताराबाईसाहेब व महाराज यानी बलकाविला आहे. दाभाडियास व रघोजी भोसले व फतेसिंग व आणखी मऱ्हाटे यांस ताकीद केली की सर्व फौजनिसी तयार होऊन येणे. भारी सरंजाम करून श्रीमंतावरी लडाईचा प्रसंग करणार मणून बहुत कांही बोलत आहेत. राज्यास गडाखाली उतरावयास परवानगी नाहीं. पुढेंहि कलह माजवावा म्हणून उर्मी फार आहे येसे वर्तमान येथे आले आहे. त्याजवरून हे लोक कालोचितावरी द्रिष्टी देऊन काबूपणा करिताहेत. सरकारचें काम खललें होतें. ताराबाईकडील हुजुऱ्यास रवाना करणार आहेत. पत्रेंहि यानी लिहीली आहेत, कीं तुमचे मर्जीसिवाये आम्ही नाहीं. तुमची कृपा असालियावरी इतराचा विचार काये आहे मणून ताराबाईस लिहिले आहे. राजश्री मुरारराव घोरपडे कर्नोलप्रांती आहेत. त्याचे वकील आमच्या राजकारणांत कुचोद्य करिताहेत. महिमाजीराम याजकडील ऐवज नऊ हजार रुपयेपावेतो वसूल होताहेत. पुढे मार्ग दिसत नाही. आज्ञा होईल तरी ऐवज पाठऊन देऊ. त्याचे नावे येक पत्र कीं नौ हजार सोडी दिलली, कां(ही) चिंता न करणे मणून आलिया वाट होते. नाही तरी हुजूर येतील. कितेक वर्तमान श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीस लिहिले आहे. राजकारणांत फितवा असलिया सरकारचे कामांत दिकत होते. क्षमा केली पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*Trimbak Girmaji sends from Savanur the news of the death of Nasarjang and also the reports received there about the activities of Tarabai at Satara.*

---

*No. 106*] [ *Recd. 29-12-1750*

पा। छ १० सफर

श्री

राजाराम रघुवीर

विनंती उपरी. तुम्ही राजश्री आबाजीपंत याजबो चिठी पाठविली ती पावली. दरबारची बोली लिहिली, तरी आजीतागा दरबरी तुम्हीच बोलीचाली

करीत आहों. परंतु येकहि परिणाम लागला नाहीं. आम्ही काहीं उतोन माजोन लबाडी करून मातुश्री आईसाहेबांपासून जात नाहीं हें सर्वांस दखल आहे. खांद्यावर धोत्र घालून येकटे पोटासाठीं आईसाहेबाजवळ चाकरीस आलों नाहीं. आईसाहेब राजेलोक समर्थ. त्यास आमचें स्मरण कोठून असेल? पहिली जुनी आईसाहेब ती आमची न्हवत. हाली राजलक्ष्मीचे चाकर उदंड मिळाले आहेत. आम्हास कोण पुसतो? मातुश्रीनींच वचन दिल्हे होते जे इमान बुडऊ नयेत. त्याप्रमाणे भरवसा धरून बाह (?) इमाने चाकरी केली त्याचें फळ येसें जाहले. आम्हास काही मनसबा राज्यकारभार कळत नाहीं. मुजुमदार दरबारी म्हणत आहेत याजस्तव खरडनिर्सी करून आहों. मातुश्री आईसाहेबी डोलेझाक करून बौधावतार धरिला आहे. पराधीन जाली आहेत. अकलबुध काहीं सुचत नाहीं. आम्ही पहिलेच विनंती केली, परंतु मातुश्रीनी व तुम्ही येकिले नाहीत. प्रधान, प्रतिनिधि, सचिव हे कोणी दरबारी नाहीत. आम्ही निशाण रोजगार करीत नाहीत. धणियासी आमचे आगत्य असले तरी पोटास देऊन रक्तखानी रिणाईत म्हणून बाळगावें. मुजुमदार येसें म्हणवीत नाहीं. मुसलकंद मातुश्रीचे फकीर येसे जाणोन कैलासवासी राजश्री रामचंद्रपंत याच्या मुलाचे चालवावें. नाही तरी निरोप द्यावा. कर्ज वारावे. आम्ही दुसरियाचा आधार आश्रा करितो तरी आमची गती येसी काये निमित्य होती? बरें! संचित क्रियमाण प्रारब्ध पुढें धावतें त्यास मातुश्रीचा इलाज काय आहे? राजश्री बाबाजी जाधवराव थोर श्रीमंत. त्यांस आमची वळख नाहीं. वरकढ कारभारी आहेत ते मातुश्रीजवळ व राजश्री. बावाजीजवळ सांगतील ते प्रमाण खरे आहे. आमचे सांगितले कोण येकतो? राजश्री बाबाजी जाधवराव आम्हावरी दयामाया करीत होते. इमान शफ–

[ पुढील बंद गहाळ ]

¶*Bhagwantrao unfolds his unhappy condition to one of his supporters and asks him to explain his position to the queen mother.*

---

*No. 107*] [*30-12-1750*

## श्रीरामचंद्र

**श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब**
**साहेबाचे सेवेसी**

विनंती. सेवक चिमणाजी नारायेण सचिव कृतानेक विज्ञापना विशेष. साहेबाच्या कृपावलोकनेकरून ता। पौष शुध चतुर्दसीपावेतों सेवकाचें वर्तमान येथास्थित असे. यानंतर साहेबी कृपा करून सेवकास संक्रमणाचे तिल शेर्करायुक्त पाठविले

---

+ जाडजूड ओबरगोबर माणूस.

ते पाऊन अज्ञेप्रमाणें स्वीकार केला. सेवेसी कळावें म्हणून लिहिलें असे. साहेबी यैसेंच सदैव पत्र पाठऊन सेवकाचा परामर्ष करीत असावें. सेवक पदरीचें असों. साहेबावेगला दुसरा अर्थ आहे यैसे नाही. शेवेसी शृत होये हे विज्ञाप्ति.

¶*Chimnajipant Sachiv sends the customary sweets to Tarabai and assures her of his loyalty. Chimnaji Narayan was Sachiv from 1737–57. The letter seems to refer to the early years of Ramraja's regime when Tarabai was working against the Peshwa. The Peshwa captured Sinhagad, the Sachiv's principal stronghold near Poona, on July 6th, 1750, an event which at once drove the Sachiv to espouse the cause of Tarabai.*

---

*No. 108*] [*1750?*

**श्री**

**पुा तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामीचे**

**सेवेसी**

विनंती. राजश्री फतेसिंगबावाचा माार तर ज्ञातीनें पहिल्यापासून साधेच आहेत, स्वामीसी दुसरा विचार धरीत नाहीत. स्वामीचीहि ममता त्याजकडे बरीच आहे. सांप्रत बावास कोठे जागा नाही. राजश्रीच्या बोलण्याचालण्यावर येखादा मातबर मनसबा करावा तर राजश्री इमानाचे पुरे पुर्ते आहेत हे जाणतात. व मातबर मनसब्याच्या खोल्या पाण्यांत पडावयाचा दंडक पाहिल्यापासून बावास नाही व करू लागले तर सिधीसहि जात नाहीत आहेत. परंतु स्वामीसी बहुत येकनिष्ठेनें आहेत. आम्हासी काल बोलाऊन नेले होते. बहुत बहुत बोलले. शेवटी डोळ्यास पाणी यावयाजोगे जाहलें. आम्हास दोन चिठ्या बावानी आपल्या खास दस्तके लेहून पाठविल्या त्या स्वामीकडे पाठविल्या आहेत; पाहाव्या. याप्राा राजश्री गोविंदरावजीसहि पाठवितात. सारांष भले माणूस आहेत. यांस स्वामीनी अंतर द्यावेसे नाहीं. स्वाम सांगतील ते ऐकतील. परंतु आपल्या ममते घेऊन ठेवावे, समाधान राखावे, उतम आहे. वरकडापेक्षा बरा वाईट फत्तेसिंगबावा बरा. स्वामीच्या आज्ञेत चालतील यांत संदेह नाही. स्वामी जसी आज्ञा करतील त्याप्राो बावासी बोलत जाऊं. कळले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Purandare to Sadashivrao Bhau, says that Fatesing Bhonsle is a plain blunt man, not fond of intrigue. He would be always disposed to side with the Peshwa and accept his policy. The writer recommends that he should be kept in an amiable frame of mind and not driven into opposition.*

3379

No. 109] [1750 ?

नकल पत्रप्रमाणे

श्री

विनंती उपरी, तुम्ही पत्र पाठविले ते पावलें. कितेक तपसील लिहिला जे राजश्री येमाजी सिवदेव याचा व आपला कलह न व्हावा येविसी राजश्री प्रधान पंत यांची आज्ञा आहे म्हणोन लिहिलें. यैशास हे दौलत सर्व येमाजी सिवदेव यास बाहाल, आणि आम्हास भक्षावयासही नाही आणि उपासी किनईत मरावे याप्रमाणे ताकीद तुम्हास आली असेल ते पाठऊन देणे म्हणजे त्याचा विचार करावयास येईल. आणि ताकीद नसली आणि उपासच मनोदये अथचे साहित्य हरयेकाविसी करावे यैसे असिले तरी आम्ही नका म्हणलियाने यैकाल यैसे नाही. जे तुम्हास उतम दिसत असेल तेंच करणे. आमचा दुराग्रह आहे यैसे नाही. पत्राचे उत्तर अति सत्वर पाठवणे म्हणोन लिहिलें त्यावरून त्वरेनेच पाठविले आहे. कळले पाहिजे, बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*An officer sends in to his superior his protest against the Peshwa's order to maintain friendly relations with Yemaji Shivdeo, the agent of the Pratinidhi. The protest may be from Pratinidhi himself.*

---

No. 110] [1750 ?

श्री

श्रीमंत माहराज मातुश्री आईसाहिबाचे

सेवेसी

आज्ञाधारक दारकोजी नाईक निंबालकर अर्ज विनंती. येथील वर्तमान तर माहाराजाचे कृपेद्रिस्टीकडून येथास्थित असे विशेश. साहेब आमची खबरबखेर[1] घेत नाही. आम्ही नेणती साहेबाची लेकरे बहुता प्रकारें कृपा असावी. प्रस्तुत हेत आहेजे माहाराजाची सेवाखिजमतीस[2] हजूर असावे ऐसे जाणून रा। महिपतराऊ सेवेसी पाठविले आहेत. हे विनंती करतील ते ध्यानास आणून अभयेपत्र पाठविले पाहिजे. सामानसुधा येऊन खिजमतीस हजीर होऊं. सेवेसी श्रुत होये हे विनती.

¶*Darkoji Naik Nimbalkar offers himself for service to Tarabai.*

---

१ खबरबखर = समाचार. २ सेवा, चाकरी.

No. 111] [1750 ?

श्री

माहाराज मातुश्री आईसाहेबाच्या सेवेसी

अज्ञाधारक तुकोजी येगले दंडवत विनंती उपर. माहाराजाच्या कृपेकरून सेव(काचे वर्तमान यथा)स्थित असे विशेश. राजश्री * * * * (रघूजी) बाबा भोसले याजकडे जमावसुधा आजे वरशे च्यार बंगाल्यात गेलो होतो, याजकारिता सेवसी येण न जाले. प्रस्तुत मौजे को * * ले येथे अलो आहे. भिटीस यावयाचा हेत आहे. आज्ञापत्र आलिया भेटीस येऊन. हे विज्ञापण

¶*The writer Tukoji Yegle informs Tarabai that he had accompanied Raghuji Bhonsle's army into Bengal for four years and now requests permission to visit her.*

---

No. 112] [1750 ?

* * रोज गु(रुवा)सर

**रामचंद्र श्रीरघुवीर**

चिरंजिवास विनंती उपर. मातुश्री आईसाहेब वडील. त्यांस व तुम्हास पत्रें पाठवितां भागलो. रा आपाजी नारायेण व रा सिवाजीपंत मुतसदी गेले. तुम्ही खावंद विदेही अकल बुधी नाही उभयेता मुतसदी पशुप्राणी, धन लोभास तयार आहेत, परंतु तुम्ही गडास जाऊन मनसबा काये केले नाही, धणियासि अर्जविले नाही * * (पुढे फाटलें आहे. पाठीवरील मजकूर)

मातुश्री स * * * *

श्री विदित केली किंवा नाही हे कलत नाही. उतर प्रतिउतर काये जाले पुढे दरबारचा विचार शोध काये आहे, प्रधानाचा विवेक कसा होत आहे, हे कळले पाहिजे. राजकुमार याचा विचार काये आहे त्या प्रो विचार मनसबा केला जाईल. रा सिवाजीपंत यासी पो वरकडास रोजमरा दरमाहेस पनास पचवीस * * (फाटलें) सरदारास मातुश्री * * (दुसऱ्या बंदावरील मजकूर) हेत हशम लोकास दरमाहा पोटास देत आहेत आणि आम्ही निराश्रित आधार * धणियावाचून कोणाचा नाही. मजमूचा हुदा कृपालु होऊन दिला, त्याची कैद कानू नाही. सरंजाम नाही. अन्नवस्त्र नाही. याची वाट काये ? हे धणियासी पुसावे. पेशजी कैलासवासी राजश्री पंत * * * मातुश्री * (बा)रा पंधरा वर्षे रिकामेच होते तथापि दरमहा रोजमरा देत होती. वराता सरदारावर व सोधवे बिदनुरावर देत होती, दरबारी पालणपोशण करून किले रांगणेयाचे मुा ठेविले होते. रा परशरामपंत व गिरजोजीबावा कारभार

राज्याचा करीत होते. मागती कालसमयेपरत्वे धणियाची कृपा जाली * ते समई राजश्री पंतास जिले सरंजाम दिला. मातुश्रीनी उभारणी करून पाठबल देऊन सर्व साहित्यानिसी चाकरी सेवा घेतली हे मातुश्रीस व सर्वास ठावके आहे. आमचे हातून सेवा घेतली आहे, आम्ही पाहिले आहे. हाली सेवाचाकरी करून पोटास न मिळे हे अपूर्व मानावे * * * * * * वल. आले. वर्तमान कळल. चाकरी धणी घेणार तर सदये चित्ते दया केली. पडवल आमचे निसबतीने आहेत. राज्यांतील चाकर इजतल्याख[1] रोजगार धणियानी सांगावा. आमचे उर्जित करावे सध्या सरंजाम होय तो दरमहा पोटास द्यावे, सेवा चाकरी घ्यावी, यैसा आर्जविनंति करणे. यादी प्रो राजपत्रे व मातुश्रीची पत्रें * * घेऊन पो हे विनंति.

¶*Bhagwantrao Amatya writes to his brother (?) to inform Tarabai of his present pitiful condition. He reminds her of the services his family had rendered to the Raj.*

---

*No. 113*] *[1750 ?*

श्री

विनंती उपरी. आपण जासूद पाठविले ते चंद्रोदये येथे आले. याणी जबानी सांगितलें की उमाबाई येथे चिंचवडास आली तरी हे संभूति[2] काही नाही. ती तलेगावीच आहेत. कलले पाहिजे हे विनंती.

¶*Umabai is reported to be at Talegaon.*

---

*No. 114*] *[14-8-1750 ?*

श्रीनिवास

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

विनंती. पोष्य केशवराव रघुनाथ कृतानेक सा। नमस्कार विनंती. येथील क्षेम श्रावण वदि नवमी जाणून स्वकीय कुशललेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. येथील वृत सरकारचे जासुदांसमागमें राजश्री उभयतांचे पत्रांसह विनंतीपत्रीं रकार-नामकांकडील अभिप्रायाचा अर्थ लिहिला आहे ती पत्रे प्रविष्ट होऊन विदित जालेच असेल. त्याआलीकडील अभिप्राय तर वाघोजी सिरके तो पंचत्व पावलेच होते. त्याचे दाहा दिवसांतच नवे रोजी अष्टमीचे दिवसीं त्यांच्या स्त्रीनी अग्निप्रवेश केला. तो समारंभ संपूर्ण प्रात:काळापासून आस्तमानपर्यंत उभयता धणिणी येजमानासह

---

१ इचतल्याख = अब्रूमाणें, प्रतिष्ठप्रमाणें; इज्ञतलायक=इभ्रतीस. २ संभूति = यत्किंचित् वार्ता, संभव.

वर्तमान माहुलीस सर्वत्रांचे जाणे होऊन, येथाविध त्या सिरकेबाईचे सार्थक होऊन रात्रौ घरास सर्वहि दाखल जाले, इत्यादि व आणखी दरबारी किरकूळ जाले जाबसाल सर्व उभयतांस अवगत आहेत. त्यांणी लिहिले असतीलच. राजश्री राव वजारतमाब याकडील जासूद मुजरद स्वामीकडे पत्रें घेऊन आले आहेत. आम्हांसहि तोच अभिप्राय लिहिला आहे कीं, आपण तोरगलेस आलो. तेथं श्रीमंत सौ बाईसाहेबांचे दर्शन होऊन त्यांणी बहुतसी कृपा करून, चिरंजीव तुम्ही, चाकर तुम्ही, इत्यादि येख्तियारीहि असी वचन बोलून त्यांस करवीरास राजश्री स्वामीपासीं घेऊन आलीं आहेत. या उपरी काय विचार म्हणतात हा ऐकावा. जर पायाशुध येख्तियार देतील तर करावा, नांही तर यांत पडों नये. भेटी जाली इतकेंच जालें. माघारे जावे तिकडे नासरजंग याणी ममता लाविली आहे. तो प्रसंग राखून हें नांते तो ती पिढीयांचे आहे ते आहेच. कर्नाटकचे जिलेबदार आसें नांव आहे तसें आहेच. हेंच हरकसे जगऊन असावे. हे दोन भाव त्यांचे या दो प्रसंगासहि आधार सर्व प्रकारें स्वामीचा मानून आले आहेत. कदाचित येख्तियार जरी घेतला तरी स्वामीच्याच आश्रयेकरून त्याचा बंदोबस्त करावा. अगर ते न घडलें तरींहि स्वामीचेच आवलंबे व आपल्या मरदुमीनें काळहरण करावे. श्रीमंत राजश्री भाऊस्वामी यास भेटल्यादिवसापासून आपला हाच निश्चय आहे. म्हणून आम्हांसहि बहुतांप्रकारें लिहिलें आहे. स्वामीचे पत्रीं तोच भाव असेल. करविरास आलियावर बोलीचाली जालियाचा अभिप्राय मागून वर्तमान येईल ते लिहिहून पाठऊं. परंतु पुढें आपण काय विचार करावा व आम्हाकडीलहि विश्वासु श्रीमंतानीं आणविला होता त्यांसहि पाठऊन देतो. परंतु तुम्ही श्रीमंतांस हा अभिप्राय लिहून आम्हांस काय आज्ञा निरोपितात? जसी त्यांची मरजी तसाच विचार करूं. लक्ष त्याठायीं आहे म्हणून त्यांणी लिहिलें आहे. या पत्रापूर्वी आम्हीहि त्यांस पत्रें पाठविलीं आहेत त्यांत त्यांस लिहिणें तें त्यांच्या हिताचे व स्वामीचेहि मरजीस येसेंहि योजोन लिहिलें आहे. त्यांचीं उतरे येतील तेंहि सेवेसी लिहून पाठऊं. सध्या त्यांस काय आज्ञा ते यथोचित त्यांचे बरें व स्वामीचें प्रयोजन असी करावी. तेहि मान्य आहेत. राव वजारमाब यांस समागमे सांप्रत राजश्री श्रीनिवासराव आमचे बंधु आले आहेत त्यांसच पाठवणें. म्हणून स्वामीचे पत्र त्यांस गेलियावर तेहि सेवेत येतील. यावर जसी स्वामीची मरजी असेल तसें करावें. विदित होये हे विनंती.

¶*Keshavrao Raghunath to the Peshwa reporting the death of Vaghoji Shirke and of his wife offering herself as Sati. The writer then refers to the purport of Murarrao Ghorpade's letter wherein the latter expresses friendly sentiments towards the Peshwa.*

3383

No. 115] [1750 ?

**श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब साहेबाचे**
**सेवेसी**

सेवेसी आज्ञाधारक कृष्णाजीराव पालांडे नौकर सरकार किले रायगड चेरणावरी मस्तक ठेऊ(न)सीरसाष्टांग विज्ञापना. किले मजकुरी जाहाला करिणा साहेबाचे सेवेसी लिहिला आहे. निवेदन जाहाले पाहिजे. किले मजकुरचे हकीम व समस्त सरदार मिलोन आपणास पुसो लागले की, राजेश्री येसवंतराव पोतनीस याजकडे आम्ही जातो, तुम्ही चला म्हणो लागले. तेव्हा आपण त्यास बोललो की, तुम्ही आम्ही क्रिया केली की, श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेबाच्या पायाखेरीज दुसरेकडे जाऊ नये यैसी क्रिया केली असतां दुसरेकडे तुम्ही जाऊ म्हणता तरी तुम्ही सुखी जा. तुम्ही क्रिया सोडलीत परंतु आम्ही काही क्रिया केली आहे ते सोडोन येत नाही. [ अपूर्ण ]

¶*Krishnajirao Palande assures Tarabai of his unflinching loyalty to her.*

---

No. 116] [1750 ?

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवसी**

विनंती. सेवक बहिरजी थोरात कृतानेक दंडवत विज्ञापना यैसीजे. स्वामींनी कृपा करोन पत्र पाठविले तेथ आज्ञा जे श्रीमंत राजश्री पंत प्रतिनिधि याजकडे सेवेसी न जाणे. त्यास पूर्वीपासून त्याचे पदरी बहुत दिवस आहो हे स्वामीस विदित आहे, तेथ विस्तारे काये ल्याहावे ? हाली राजश्री येमाजीपंत अणा याचा व श्रीमंत पंत प्रतिनिधि याचा हार्षामुर्श वाडला म्हणोन अजीच आलो यैसा अर्थ नाही. बहुत दिवस त्यांचे पदरीं आहो. शेवेसी स्रुत होये हे विज्ञापना.

¶*Bahirji Thorat to the Peshwa, expressing his unwillingness to leave the Pratinidhi as he has been long in his service.*

---

No. 117] [1750

**श्रीरामचंद्र रघुवीर**

**चिरंजीव राा सिवराम पंडित यासी**

आसीर्वाद विनंती उपर

राा सोनो मेघशाम विदेही होऊन बाइलेचा त्याग करून ठकी बायकोचे अगत्य धरून वारणे आलीकडे आले तुम्ही आम्हास बुद्धिवाद अकल पत्री लिहिता. चिरंजीव बाबाहि पत्री लिहीत आहेत. वृधापकाली समाधान

होते. या प्रांते रांडेचा बोभाट जाला. पाणी कोणी ब्राह्मण न घेत यैसे जाले. या प्रांताहून चिकोडीकडे गेले तेथे नणदीस रांडेस घेऊन राहिले असतां ठिकाणी रांडे ठकीमुळें सोनोपंताचा गला कापिला. जीवे बेरडानी मारिले. ठकी दुसरा धगड करून गेली यैसे वर्तमान जाले. चार पांच महिने जाले. वर्तमान जाले ते तुम्हास लिहिले आहे. रा॥ माधवराव काकास व उमाबाई काकीस सांगणे. रांडेमुले यैसी गत जाली. १

रा॥ राघोपंत व्याही यासी पत्र पा॥ आहे, देणे. सौ रमाबाई यासी सत्वर आणवणे १

पावतो. परंतु प्रालब्ध सोडीत नाही यासी काय करावे? कर्जदार जालो. फजीतीस उणे नाही. राज्यात ताल नाही. दादमनसुबी नाही. मलारजी होलकर याजकडे दोनसे राउताची बोली केली आहे. कारकु(न)माहादाजीपंत व सरदार आणाजीपंत त्याजकडे पा॥ आहेत. आणखी प्रधानाकडे व वरकडाकडे येत्न करीत आहे. तुम्ही तेथें दरबारी आहा. रा॥ उदाजी चा॥ व रा॥ बाबूनाईक याजकडे बोली केली असेल १

पदरीं घोडी सिंगरें गुरें आहेत. कदीम खेडीं वडिलार्जित माहाराजाजवली मागोन घ्यावी. कुरणें व बागा सेतें मागोन घेणे. १

हे विनंती

¶*Bhagwantrao Amatya to his brother Shivaram, describing the straits to which he had been reduced.*

---

*No. 118*] [*1750*

**श्री**

**रामचंद्र रघुवीर**

विनंती उपर. आह्मी तुम्हास पत्रे पाठवितो. अकलबुद्धी मनसबे लिहितो. राज्याचे कल्याण तुमचे श्वहित देवाने करावे हे मानस, त्यास तुम्हास व मुत्सदीयासी राग येतो. दुसरे विश्वासू पाठवावे म्हणऊन लिहिले तर उत्तम. आमचे यात काही जात नाही. होईल तमासा तो पाहावा हेच येथार्थ आहे; परंतु आम्हास पोटास नाही. उपवासी मरतो. तुम्ही जाऊन गडावर बैसला. आमची फजीती होती. राजे लोक धणी. यासी परदुख कलत नाही. आपले आनंदात आहेत. कर्जदारी जालो. धणीयाचे चाकरीमुले आमचे घर बुडाले. सरंजाम नाही. माणसे घोडी व हती मरतात. वरकड आपले घरी सुखरूप

आहेत. तुम्हास रोजगार लागला. उतम जाले कर्ज वारणे. आम्हास निरोप देणे. वाईट बरे बोलणें नाही, अथवा लिहिणें राहिले. कजिया वारेल, दया करणे हे विनती.

¶*The writer describes his own distressful plight to which, he says, he was reduced in the service of his master. The writer is Bhagwantrao Amatya of Kolhapur.*

---

*No. 119*] [*1750 ?*

## श्रीराजाराम माहाराज रघुवीर

विज्ञापना उपर. माहाराजानी दया केली. दरमाहा देऊ केला. रा बाबाजी जाधवराऊ यानी रा विठलपंत दिवाण पो, आम्हास घेऊन आले. आडीच महिने जाले. आद्याप बोलीचा करार नाही. च्यार हजार रुाची वरात दिली त्यापैकी निमे पावले. बाकी येणे आहेत. हाली चालता महिना राहिला. सनदपत्र, गावखेडी, हातभर जमीन, बाग आथवा सेत नाही. कर्जाखाली बुडालो. रोज उठोन तगादा लागला आहे. हती घोडी यासी चारा नाही, फाटी नाही, शाकभाजी किरकोल खर्च कैसा चालतो? कर्ज करून चिरंजिवाची मुंजी केली. खर्चास नाही. दया करावी. रा बाबाजीस सांगावे. संकट वारावे (हे विज्ञापना.)

¶*Bhagwantrao recounts his tale of woe but is grateful to the King for the kindness shown in sanctioning his monthly allowance.*

---

*No. 120*] [*1750 ?*

## श्रीरामचद्र माहाराज रघुवीर

प्रतिनिधीस पत्र. विशेष. आपण थोर प्रतिनिधि आहेत. आमचे आगत्य धरावे. चिरजीव मुले नेणती आहेत याचा साभाल करावा. सरंजाम करून द्यावा. ऊर्जित करावे यैसे महत्व आपले आहे. वडिलाची क्रियाइमान जतन करावी. आपण इमानशफत दिली आहे ती जतन केली पाहिजे. या राज्यात येऊन कर्जदार जालो. सर्वश्वे

रा येमाजीपंत यास विनती उपर विशेष. आपण सर्वज्ञ जाणते वडील वृध आहेत. सकल आर्थ आपणास श्रुतच आहे. ब्राह्मण लाकाचे आभिमानी आहेत. * * स शासनकर्ते, शास्त्रश्रवण, राजनीति जाणते, श्वधर्म रक्षणार, कृतकर्मे, धुरंधर आपण हे कीर्ति राज्यात (आ)हे. त्याप्रो आपण वर्ततच आहेत (प्रति)निधीचे

आपाये जाला. हे आपणास ठावके आहे. सरदारी बुडाली हे आपणास दखल आहे. घोड ऊंट बाकीस राहिले नाही. दया करून सरदारी थाटावी, मागती उभी करावी या आर्थे रा नारोपंत व चिरंजीव लक्ष्मण जाधव पो आहेत. आपले पदरी घेऊन सांभाल केला पाहिजे. येक दोन ठाणी द्यावी सरंजाम द्यावा. पोटास देऊन सेवा घेतली पाहिजे. हती घोडी व उंटे डेरा द्यावा. येश कीर्ति करावी. वारणेपलीकडे आमचा सरंजाम खेडी वतने आहेत त्याचा चौका बैसे ते करावे. सर्वश्व सारथ्य केले पाहिजे. १

पार्वतीबाई यासी विनंती उपर विशेष. तुम्ही आम्हास इमान क्रिया दिली आहे. आपलें वचन खरे करणें. रा नारोपंत व चिरंजीव लक्ष्मण जाधव पो आहेत. याचे साहित्य करणें. सरंजाम, खेडी सरदारी आपल्या वचनाप्रा देऊन सारथ्य करणें. कर्जदार जालो आहो. संकट तुम्हास पडेल. सांभाळ करणें. समई तुमचे आहो यैसे समजणे.

येख्तयारी आवघे मुख आपण आहे. राजश्री प्रधान याचाहि विश्वास आपले ठाई आहे. त्याप्रमाणे साहित्य होऊन येतच आहे. आम्ही तुमचे आहो. आम्हावर आपली कृपा आहे. का सिरालेमध्ये इमानशफत दिली आहे. त्याचे स्मरण धरून, या घरचा आभिमान इरे धरून चिरंजीव मुलाचे ऊर्जित साभाल केला पाहिजे. रा प्रतिनिधीस पत्रे पा आहेत आक्षरशा मनन करून चिती धरून सारथ्य करावे. सरंजाम, खेडी, ठाणी साहित्य करून द्यावे. गेली बाजी सेर करावी. येश कीर्ति संपादावी. रा नारोपंत व चिरंजीव लक्ष्मण जाधव पो आहेत. याची उभारणी करून पोटास देऊन लोकोतर कीर्ति करावी. आम्ही आपले पुरातन आहो. दया करावी. राजकी प्रसंग आपण जाणतच आहेत. कर्जदार जालो. संकट आपणासच आहे. पूर्व न विसरावे. दया करावी. हा समय पुढे न ये.

¶*Bhagwantrao Amatya to the Pratinidhi and Yemajipant reminding them of their former promises and requesting them to help him in his forlorn condition.*

---

*No. 121*] [*1750?*

[पहिला बंद गहाळ]

र्जदारानी मांडला आहे. निराश्रित. पाठबल कोणाचे नाही. कोणास दुख सांगावे? मातुश्री आईसाहेबाजवली दाद नाही. धणी राजे बालराजा मूर्ख.

तुम्ही गडावर जाऊन बैसला. आम्ही वृधापकाली फजीत पावतो. चिरंजीव मुलाचे हाल आपदा होती. समयासी आन्नवस्त्र नाही. उंटास किडे (उ)वा पडल्या. प्रधान समर्थ. धणियानी मजमूचा हुदा दिला. हर्ता दिला. वाडा थोर दिला. पोटास आन्न नाही. प्राण जातो. सिलेदारांमुले व कर्जदारी यांचे तगाद्यामुले वीश घेऊन मरावे यैसी गती जाली. मातुश्रीस व प्रतिनिधीस व सामादिक कारभारियासी विदित करणे. अर्ज करणे. मातुश्री आईसाहेबास आमचा इतबार विश्वास नाही. यैसे थोर माणसानी केले, त्याचा झाडा ईश्वर घेईल. आमचे पदरी आन्याये खरा करावा. आणि मातुश्रीनी बेमुलाहिजा पारपत्य करावे. जिवानसी * * * * * * यैसा अर्ज करणे. धणियाविना दुसरा आधार नाही. प्रधान समर्थ. बहुतास त्याचा आधार आहे. सर्वास सरंजाम आहे त्यांचे चालते. आम्ही काये करावे? रा॥ दादा प्रतिनिधि थोर बख्तवार, त्यास आमचे स्मरण नाही. सत्य वचन राजनीति कदीम पाया मर्यादा कोणी शोधीत नाही. कदीम पाया शास्त्रे पुराणे खरी आहेत यैसे सांगणे * * * *

¶*After lamenting his miserable condition, Bhagwantrao Amatya casts sarcastic reflections on Tarabai, Ramraja, the Peshwa, and the Pratinidhi and complains of the scanty attention they gave him.*

---

*No. 122]* *[1750?*

## राजाराम श्रीरघुवीर

विनंती उपर. रा॥ गोविंद गोसावी करवीरकर पुरातन राजाश्रित. त्यानी मातुश्रीस पूर्वे वलखीने पत्र पा॥ आहे. नरसिंहआच्यार्य आले आहेत. मातुश्रीचे दर्शन करवणे. उतर देवणे. जातील. आम्ही मातुश्रीजवली सर्व कारभार करितो. या वलखीस्तव माणूस धावोन येते. मातुश्रीजवली दाद मनसुबी नाही. यादी पा॥ आहे, याप्रों पत्रे करून घेणे. यादी जतन ठेवणे. दफ्तरदार व आवघे निरक्षर न होणे. आम्हास दुसरियाचे बगले न करणे. हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya forwards to Tarabai the letter addressed to her by Govind Gosavi of Kolhapur.*

No. 123] [1750?

**श्रीरामचंद्र श्रीमाहाराज रघुवीर**

चिरंजिवास आसीर्वाद विनंती उपरी. तुम्ही मालोजी सालोखे याबराबर व निंबाजी चव्हाण याजबाा यैसी दोन पत्रे पाठविली तीं पावलीं. लिाा वर्तमान कळो आले. तुम्ही लिहिल्यावरून दर्याबाई याकडे जाऊन प्रतिनिधीविसीं यत्न करणे तो केला. राा गोपाळराव महादेव येथें यत्न करणें तो करीत आहेत. परंतु दुष्ट दुर्जन यानी आपला वेळ साधिला. कर्म आपण करून प्रतिनिधीवर बदलामी घातली. प्रतिनिधीनी आवसान धरिले नाही. लस्करांत आणिले. याउपरी होईल ते पाहावे. तुम्ही येणार तरी अवशमेव येणे. आंगात शक्त कुवत असली पाहिजे. राजद्वारची चाकरी आहे. लोकाची तोडणी सांभालावी लागते. सावधता आणि चतुराई असली पाहिजे. दर्शनांती सविस्तर कलेल. * बहुत नाईकी विचार जाला आहे. माहाराजाची बुधी शाश्वत नाही. श्वार्थ सर्वास लागला आहे. राज्याचें आगत्य कोणास नाही. आम्ही काये करावे? आमचें सांगितले कोणी यैकत नाही. दया करणे हे विनंती. राा भास्करपंत यासी नमस्कार. पंतास विचार सांगणे.

*¶Bhagwantrao Amatya to his brother Shivram Pandit saying that he has interceded for the Pratinidhi with Daryabai and is very sorry that he lost heart at the critical moment.*

---

No. 124] [1750?

**रामचंद्र श्रीरघुवीर**

विनंती उपरी. राजश्री भालचंद्र पाध्ये आले. याजपासीं जे सांगणे ते सांगितलें आहे. तुम्हास दोनतीन पत्रे पाठविली तीं पावलीच असतील. तुमचा जन्म भये धरिताच गेला. तुम्ही अवघे भलेच आहां. आम्ही मात्र मातुश्री आईसाहेब यांचे व राजश्री बाबाजी जाधवराऊ याचे वाईट जालो. पोटास मागतो हा अन्याय आमचे पदरी थोर आहे. अंतकालापेक्षा माध्यानकाल कठीण आहे. "घरचे भेणे घेतले रान, वाटेस भेटला मुसलमान" ती गत आमची जाली. सिरेलियामध्यें[१] पार्वतीबाई भोसली इणे इमानक्रिया देऊन घर बुडविले. तेथून येमाजीपंत यांणी इमानक्रिया देऊन राजश्री दादोबा प्रतिनिधि याणी इमान क्रिया देऊन घर बुडविलें. राजश्री प्रधान तों समर्थच. मातुश्री आईसाहेबीं अभयवचन देऊन येथें आणून कर्जदार करून या गतीस लाविले. वाईट, बरे,

---

१ सिराळें?

कोणासी म्हणावे ? कर्जदार जालो. घर बुडाले, आणि सर्वांचे वाईट होऊन सेवटी राज्यात बसावयासी जागा नाही यैसी गत मातुश्री आईसाहेबांच्या मायेकरितां जाली. आई आई म्हणून पायास लागलो; सेवटी आई पराधीन जाली. राज्यास थार नाही. अवघे मवास जाले. आम्ही येकनिष्टा धरिली त्याचें फल यैसे जाहालें. आम्ही लोखंड होतों, मातुश्री आईसाहेब परीस आहेत. लोखंड परिसास लागलियाने सोनें होते यैसी नीत मर्यादा आहे, त्यास ही तफावत जाहाली. राजनीत मर्यादा मोडली. मुख्य, येव्हा आम्ही कर्ज वारा यैसे म्हणत नाही, सरंजाम मागत नाहीं, पोटास मागत आहो, ते दरमाहा चालवावें. मातुश्रीनी आपले बिरुद धणीपण रक्षावे. नाहीतरी आमचे दैन्य जालियाने आपकीर्ति घेऊन जाऊ. दुसरा कोणी इतबार धरणार नाही. यैसा अर्ज करणे. हे विनंती. सावध होणे. टकलेकर बेगारी यासीं रुपये २ दोन देणे. आसामी च्यार आहेत. गवत काडीत आहेत.

*¶Bhagwantrao Amatya complains against Parvatibai Bhonsle of Shirala, Pratinidhi, Tarabai, Babaji Jadhav and others who were responsible in reducing him to his present pitiable condition.*

---

*No. 125*] [*1750 ?*

पुरवणी चिरंजीव राजश्री बाबाजी यासी प्रति मातुश्री आईसाहेब आसीर्वाद उपरी. राजश्री भगवंतराव पंडित आमात्य याचा बोभाट तुम्ही कोणाच्या सांगितल्यावरून हुजूर लिहिला ? यैसियासी राजश्री राव मारनिले आम्हांपासी हुजूर येथे आहेत. कैलासवासी राजश्री माहाराज याणी मौजे रासीवडे ता। आरलें हा गाव सौ। जानकीबाई यांसी साडीचोलीस इनाम करून दिल्हा. मौजे हातकलगडे ता। आ (ल) ते व मौजे सावगाव खुर्द प्रांत हुकेरी हे गाव व वरकड बाबतीचा सरंजाम कैलासवासी राजश्री रामचंद्रपंत यासी आम्ही दिल्हा. यैसे असता राव मारनिले याणी आपले चिरंजीव रा। कृष्णराव किले गगनगड बावडा येथे ठेविले. तुमची चाकरी करावी. त्याणी काही आमर्यादा न करिता त्याचे गाव ठाणी तुम्ही घेतली. वतने व सरंजाम दूर केला ही राजनीत (नाही). तुम्हासी मर्यादेने वर्तत आसता सरकारातून ब्राह्मण लोक याची घरे मोडावी यैसे नाही. थोरले राजे यापासून आम्ही चालवीत आलो आहो. आंतर पडले तथापि तुम्ही राजे लोकी क्षमा करावी हें उतम आहे. याउपरी याची खेडी ठाणी वतनें व बाबतीचा सरंजाम पूर्वापार चालत आला आहे त्याप्रमाणे राजश्री कृष्णराऊ आमात्य याजकडे चालऊन त्याचे हातून सेवा घेणे. समाधान करणे.

येविसी राजश्री येसवत (राव) गाो यासी आज्ञा केली आहे; सांगता कलेल. ये गोष्टीस तफावत जालि. * * * राव मारानिले मुलकात धामधूम करितील तेव्हा तुम्ही हुजूर बोभाट ल्याहाल. रयत नागवेल. मुलकास उपद्रव होईल. ये गोष्टीचा विवेक विचार करणे.

¶*Tarabai issues orders to Babaji (Jadhav) to release the lands and villages belonging to Bhagwantrao Amatya, confiscated by him.*

---

*No. 126*] [*1750 ?*

[ बंदाच्या वरचा भाग गहाळ. ]

विठोजी सूर्यवंसी माणूस बरा मेला. आमचा भाऊ मानिला होता. सिव सावत सुभेदार यासी गोली लागली. मोहरा नामोहरम होउन प र खे[१] द ले लो वे वर घातला. याउपर निदान आहे. फौज मदतीस व खर्चास माहाराजानी पाो शरम राखावी. नाही तर सेवक मरतो. धावा करावा. आमचे श्वाधीन ठाणे येक आथवा च्यार खेडी आसती तर सेवक धावोन जातो. साहेबास संकट न पडते. परभारेच काम होते. आम्ही सेवेक वरकडाप्राो बेइमान नव्हो. आधार येक धणियाचा आहे. हुकूम (अपूर्ण)

¶*The writer mentions some casualties suffered in a petty action. The letter is mutilated.*

---

*No. 127*] [*1750 ?*

**श्रीराजाराम रघुवीर**

विनंती उपर. धणियाचे आज्ञेप्रमाणें चाकरीस हाजीर जालो. परंतु सकाल उठोन पोटाची रड किती सांगावी ? धणियासी कंटाला आला. आम्ही उपवासी मरतो. मधस्त जाले त्याणी काले केले. रा। बाबाजी जाधवराऊ याजपासी दाद होत नाही. करुणा येत नाही. आम्हावर कोपच त्या(चा) आहे. वाणी उच्यापत देत नाही. गोसावी येऊन बैसले आहेत. दरमाहा दोन हजार देऊ केले त्यास ठाव नाही. पुढे विचार कैसा करावा ? आर्ज करणे. गोपालजी हवालदार गोडबोले, जवली हुजरे तमासगीर मिलाले आहेत. सत्यधर्म, राजनीति बोलणार नाहीत. आम्ही आपराधी. मागतो हा आन्याये आहे. गडावर ठेवावे. पोटास मिलेल येसा आर्ज करणे. हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya presents himself for service according to the King's instructions but complains as usual about his want of funds and his straitened condition in general.*

---

१ अक्षरें लागत नाहींत.

No. 128] [1750 ?

## श्रीरामचंद्र रघुवीर

विनंती उपर. रा शामजी येलदेऊ व बाबूराव आपाजी याजकडे पत्रे लिहून लक्षुमण देसाई मौजे येलगावास[1] पो होता. त्यास सुलतानजी जाधव याची हवपालत राखून श्वारी पाठऊन सुलतानजी जाधव यासी दस्त करून आणिला. आमचा चाकर बेइमानी करून गेला त्यास आणिले त्याचे पारपत्य केले जाईल यैसे मातुश्रीस विदित करणें. नारो सिवदेऊ याचा कतबा उगवणे. पार्वतीबाई व राणोजी भो याणी लेकारी[2] करून सिरालेयाहून राणोजी भो आला आहे. दरबारी लबाडी करील तर तुम्ही सांगणें, लाच खादला आहे. आमचे लोकास राहावयासी जागा नाही, ठाणे नाही. विनाआश्रय काये करावे ? अर्ज करणे, जागा मागणें. चाकरी होईल हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya asks the addressee to communicate to Tarabai the arrest of Sultanji Jadhav, an employee who had proved treacherous and run away.*

---

No. 129] [1750 ?

## २ पुा

भावी ऊत (?) केलियानें परिणाम उतम नाहीं यैसा अर्ज धणियांसी करणे. पेसजी कैलासवासी माहाराज याणीं राज्य जोडिलें, वृक्ष लाविले ; मातुश्री आईसाहेबानीं पालण केलें, लेकानी बुडविलें यैसें न करावें. पूर्वीची आईसाहेब तींच आमचीं स्वधर्म रक्षितीं यैसें असेल तरी राजनीतीनें जुना पाया पाहून सत्यधर्मे राज्य करावें. आम्ही मातुश्रीचे नवाजीस[3] पालक आहों यैसें सांगणें. आम्हांस काहीं कलत नाहीं. परंतु कल्पवृक्षाचे छायेस बसोन राजनीत पाहिली आहे, विद्या सिकविली आहे. जमेखर्च कलतो. चोरचाहाड, लबाड अथवा सजन भला माणूस याची परीक्षा कलत आहे. मातुश्रीचे धर्मे सर्व अनुभव आम्हास आले आहेत. बिसनी[4], बेढंगी जालो नाही. सरा शमला गांज्या तुबा (?) रंडा याची सहवास सोबत केली नाही. सत्गुरु भले सजन याचा सहवास धरिला आहे. दरबारी परीक्षा नाही. हे विनंती.

¶*This is a political sermon from Bhagwantrao Amatya. The kingdom founded by the late Raja had been worthily piloted by Tarabai ; and it is incumbent on her son to keep the ship of the State upon the course thus set by his ancestors, says he.*

---

१ ता. कऱ्हाड, जि. सातारा. २ लबाडी. ३ गौरविलेला. ४ व्यसनी

No. 130] [1750?

## रामचंद्र श्रीरघुवीर

विनंती उपर. तुम्ही चिठी पाा ती पावली. भावार्थ कलला. हुजरेयांसी दोन हजार रुाा मनाचिठी आमचे नावची पाा ते पावली. दिवाणचा रोखा हुजरे आम्हाकडे घेऊन आले नाहीत. वरात आणिते तरी विचार कलता. आम्ही चोर चाड लबाड नव्हो. मातुश्रीचे आज्ञेप्रो सटवोजी भो व सिनाजी खाडेकर व आणखी हुजरे आले. आज्ञेप्रो गिरजी वाणीन व गोदसेट यासी व संताजी सिर्का व माहारीण यासी हुजरे व लोक पाा. अटकेत ठेऊन दिवाणचे हुजरे याचे मते चाकरी केली आहे. राा प्रधान याणी आम्हावर कोणाचे बोले श्वारी केली, हला केली, ती मान्य केली. जिवावर उदार जालो. तुम्हास व सर्वास ठावकें आहे. संताजी सिर्का चोर लबाड होता त्यानें दालम्येयाची (?) पाठ करून सोडऊन गेला. राण नाईक व सत नाईक बेरड बेरडे[1] पलोन आम्हाकडे आले. बेरडास आम्ही धणी होऊन सोडविले. मातुश्रीस विदित केले आहे. संताजी सिर्का आम्हास जीवे मारावयासी तयार जाला होता. मातुश्रीचे दयेने संकट वारले. गोदसेट व गिरजी सेटीण [अपूर्ण]

¶*Bhagwantrao Amatya acknowledges the receipt of a letter from Tarabai, and complains against one Santaji Shirke who led an attack against him.*

---

No. 131] [1750?

## श्रीराजाराम रघुवीर

विनंती उपर. आजी धणियांची मर्जी कैसी आहे हे लिहिणे. किले दातेगड[2] प्रतिनिधीनी घेतला. तीन हजार रुपये दिले. हाली मोरगिरीचा तगादा राा कानोजी सिर्के यासी केला आहे. यामुळे सिर्के रुसवा करून गेले. किल्यास लोक व कारकून माचीस पाा आहेत. आमची बातमी आली. येकांती मातुश्रीस विदित करणे. आम्हास मनसबा विचार काही कलत नाही. परंतु कदीम पधती, गड किले धणियाचे हुकुमी आसावे. विश्वासु इतबारी कारकून मायेचा आसेल त्यास पाा. किल्याचा बंदोबस्त करावा. तनखा यैवज नेमून द्यावा. यैसा जुना पाया वलवटा[3] आहे. आर्ज करणे. धणी पुसतील तर येकांती आर्ज कर(णे). हे विनंती.

¶*Bhagwantrao sends news to some one of his agents with Tarabai that the fort of Dategad had been taken by the Pratinidhi.*

---

१ फाजील शब्द. २ ऊर्फ सुंदरगड डों. सातारा, पाटणचे वा. ३. ३ वहिवाट.

No. 132] [1750 ?

## राजाराम श्रीरघुवीर

विज्ञापना उपर. साहेब वडील मायेबाप यैसे चिती धरून आशेने सेवाचाकरी केली. परंतु सार्थक काही न जाले. राजकुमार धणी जालेत, वेडे जवली चाकरीस ठेविले, त्यानी राजमार्गास अ(क)ल बुधीस लाविले नाहीत. ज्यास वडील माता कलेना राज्य(प)द हातास कोणामुले आले, श्वता बुधी नाही, सांगितले यैकत नाही, तेव्हा मूर्ख यैसे चितात आणावे. दर्शनांती येविसीचा आर्ज करीन. हाली साहेब समुद्र मायेपोट आहेत. * ल डोल पाहून डोलावर घेऊन समजाविसी करावी. सर्वास हाती धरावें. रा। प्रधानाचे समाधान करावे. मानमार्ग पाहून आपले आज्ञेत राज्यभार चालवावा. आमी नेणते आहो, साहेब वडील आहेत; च्यार राज्ये पाहिली आहेत[१] आणि श्वता आंगेजणी करून कठिण प्रसगीत राज्य केले आहे. घडामोड केली आहे. नाकर्ते चाकर होते त्यासी पाठबल देऊन सर्व साहित्य बेगमी करून कर्ते नावारूपास चाकर साहेबी आणिले हे वर्तमान बालकास ठावके आहे. चिरंजिवास व वरकडास हे वृत ठावके नाही. आणि दरबारी मोहरा शाहाणे चतुर अकलवंत बुधीचे कोणी नाहीत. शास्त्रे पुराणे, राजनीति, वडील परंपरा, मर्यादा शाहाणे चतुर असतील तेच जाणतील. आलिकडे नवे लक्ष्मीवंत बख्तेवार[२] जाले. आम्हासारखे मूर्ख वेडे आहेत त्यास काही कलत नाही. श्वार्थामुले परमार्थ हातास येत नाही. 'सत्यं जये' या वचने निष्ठेने सेवा केलिया सर्वांचे व राज्याचे कल्याण आहे. दुरंदेसीने विचार करावा. हे विज्ञापना.

¶*A letter addressed by Bhagwantrao to Tarabai describing the incompetency of Ramraja and requesting her to take matters into her own hands and preserve the traditional dignity of the Maratha Raj.*

---

No. 133] [1750 ?

## श्रीराजाराम रघुवीर

विज्ञापना उपर. माहाराजाचे आज्ञेप्रो वाईट बरी आजी ता। सेवा केली. कर्ज मिलाले तावत्काल दरबारास येऊन मागण्याचा तगादा केला नाही. धणी व आवघे बरे म्हणत होते. सरदारी मोडली. घर बुडाले. आतां धणियासी कंटाला आला. आवघे वेडे मूर्ख आहेत यैसे दरबारी सर्वत्र बोलत आहेत.

---

१ आपण म्हणजे ताराबाईंनीं चार रांजे पाहिले असा अर्थ. २ नशीबवान, सुदैवी.

ज्याचे आंगी दैसा[1] तो बरा म्हणतील. आमचे आंगी आवदशा लागली यास्तव मूर्ख जालो. धणियाचे इतबारी विश्वासू नव्हो. मजमदार म्हणत आहेत. प्रात:कालापासून प्रहर रात्रपर्यंत खरडनिसी करीत आहेत. सरकारकून व सर्वास वहमा जे, आवघे राज्य मजमदाराचे हातास आले, येक रुपयाची प्राप्त नाही. चाकरी धणियाची, दावे घरचे घ्यावे, यात फायेदा काये आहे? आर्ज केला, दाद नव्हे. कोणाचा आधार आश्रा नाही. येक धणी देव यैसे चिती धरून इमाने-इतबारे चाकरी केली, त्याचे फल जाले. आन्न नाही, वस्त्र नाही, भोई चाकर गेले, इजत गेली, सीमा जाली. याउपर दया करून आम्हास निरोप द्यावा. हुदा व वाडा व हती धणियानी घ्यावा. हाजीर आहे. आम्ही धणियाचे नाव घेत देशांतरे जाऊ. वडिलाचे नाव पदरी आहे. बेत पाहून पोट भरू. कीर्ति आपकीर्ति साहेबाची आहे. पहिली आमची आईसाहेब नव्हे यैसे जाले. हे विज्ञापना.

¶*An emphatic protest addressed by Bhagwantrao to Tarabai against the treatment that he was receiving.*

---

*No. 134]* *[1750?*

## श्रीरामचंद्र माहाराज रघुवीर

चिरंजीव राजश्री सिवराम पंडित यासी रा। आपाजी नारायेण यासी विनंती उपर. तुम्ही रा। कानोबा व सिवाजी कृष्ण व सिदोजी सूर्यवंसी याजबा। तीन मर्तबे पत्रे पा। ती पावली. लिहिले वर्तमान कलो आले. खासा माहाराजाची पत्रे श्वदस्तुरची पा। ती पावली. मातुश्रीचे पत्र विदित केले, बहुत प्रकारे अर्ज विनंती केली. तथापि माहाराजाचे वचनाचा इतबार मातुश्रीस येत नाही. आमचा येत्न काये आहे? तुम्ही पत्री आम्हास आकलबुधी लिहितां, आम्ही तुम्हास आकलबुधी लिहितो. माहाराजास दोन तीन पत्रे आम्ही पाठविली, तुम्हास पत्रे पा। ती येकीकडे राहून आम्हावर बोल माहाराज ठेवीत आहेत. तर राजे थोर समर्थ आहेत. श्वता बुधी नाही, सांगितले यैकणे नाही, तर आम्ही काये करावे? मामा, वडील, कैशास म्हणत आहेत? उभे राहून मुतावे मग उपाध्ये यासी काये पुसणें? पालथे घागरीवर पाणी हा न्याय जाला. जवली कारभारी थोर माणूस मिलाले आहेत. लबाडी सांगतील, दोहीकडे कलह कजिया माजावितील, ते भले. खासा राज्याचा आपाये आणि राज्यात फितूर, ढोहणा, धामधूम कजिया वारत नाही. सर्वत्र लबाडी होत आहे. आम्हावर बोल न ठेवणे. आम्ही कोणाचे वाईट बरेमध्ये

---

[1] वैभव.

नाही, येसे परिछिन माहाराजास व सर्वास सांगणे. आर्ज विनंती करणे. प्रधान सबल, आपले घरी सुखरूप पादशाही भोगून आहेत. कोणाची तमा नाही, वारणेपलीकडे राजा शंभू आपले जागा सबलपणे आहेत. आवघा कजिया धामधूम सातारा, वाई, वारूण, कराड, मिरज सुभेयात कजिया माजला आहे. दुरून आवघे तमासा पाहातील. मातापुत्र, गुरूचेला, धणीचाकर ही बाकी उरली नाही. मर्यादा बुडाली, राजनीति, श्वधर्म मोडले. कैदकानू हुदे मामले सरकारकून व सरदार यांचा रंगरूप, वास, येश, कीर्ति बुडाली. बरे; माहाराजाचे चितात आणून देणे. येकांती पत्र वाचून दाखवणे. आमची सीमा जाली. आजी ता। कर्जदार जालो. घोडी गमाविली. लोक सिलेदार घरी दारी सिबंदी-करिता बैसले. माहाराजाची आपकीर्ति जाली, ही देवास न माने. चालीस हजार रु॥ चा सरजाम देत आहेत, आम्ही घेत नाही, येसे परिछिन्न सागणे. कर्ज वारून द्यावे आणि निरोप द्यावा, यैसा अर्ज करणे. देशांतरे जाऊ. चाकरी केली ती निर्फल जाली. देव समर्थ आहे. आम्ही ब्राह्मण आहो. राजे परजे यानी इमान शफत देऊन बेइमानी केली त्याचा झाडा देव घेईल. हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya writes to his brother Shivram Pandit inveighing against the policy of the whole Satara Court.*

---

*No. 135*] [*1750 ?*

## श्रीराजाराम रघुवीर

विनंती उपर. बावडियाहून काल पत्रे आली. मातुश्रीस पत्र चिरंजिवाचे आहे. अक्षरशा वाचून विदित करणे. उतरे पहिली व हाली पत्राची देवणे. बावाजी गायेकवाड यासी निरोप देवणे. राजे लोक समर्थ यासी स्मरण राहात नाही. आम्ही भिकारी दारिद्राने गांजलो. आमचे स्मरण मातुश्रीस कोठून होणार ? बेइतबारी हाली जालो. इतबारी आहेत त्याचा विश्वास आहे. निदानी कळेल. दुतोंडी खेळे आहेत. त्याचा निवाडा राजहौस आसतील तेच करितील आम्ही ब्राम्हण गरीब अनाथ, परंतु मातुश्रीचे पायेपोस धरणार. जुनी झाडे आहो. कदीम वाकलौस[१] येसमई कोण पुसतो ? राजनीति बुडाली. धामधूम लागली आहे. दाद नाही. हे विनंती.

¶*The helpless situation to which the writer was reduced, the treachery of the ministers, and his thorough reliance on Tarabai's support are described in this letter by Bhagwantrao Amatya.*

---

१ गोधडी.

No. 136] [1750?

## श्रीराजाराम रघुवीर

विनंती उपर. आम्ही येकदोन राजकारणे धणियाचे नावावर परपादशाहीतील आणिली, त्याचा कजिया नाही. वारियावरील मंथन. समुद्रात तारू घातले, सावकारी बंदरास लागोन व्यापार माहाल विकला, सावकारी तडीस गेली, तर बरे म्हणतील. हुजूरचे म्यानमुलकी काही कजिया नाही. मोगलाई दरबार आहे. वचन खरे जाले पाहिजे. लाख दोन लाख रुा दिवाणचे खर्च होत नाही. विजापूरची सनद येक आणि च्यार ताकीदपत्रे दिवाणची द्यावी. कलह मोगल आम्ही समजोन घेऊ. माहाराजास अर्ज करणे. विजापूरचा भला माणूस वस्त्रे पत्रे देऊन रवाना करणें. तैसेच राा वेंकटराऊ दीक्षित याणी राजकारण आणिले आहे. भले माणूस आणिले आहे. त्याचे राजकारण, बोलीचाली मनास आणून पत्रे करून द्यावी आणि रवानगी करावी. मोगलाई दरबार आहे. डाव खेल माडावा, आकळबुधीने डाव जिंकावा यैसी राजनीति आहे. आर्ज करणे. राा बाबाजी जाधवराऊ यासी विनंती करणे. आमचे सारथ्य केलियाने बहुत कार्य आहे. चाकरी करून दाखऊ. इमान जबा खरी असावी * * * * *

¶*The writer, Bhagwantrao Amatya, refers to some affairs of diplomacy that he has arranged with the Nizam.*

---

No. 137] [1750?

## श्रीराजाराम रघुवीर

विज्ञापना उपर. माहाराज वडील मायेबाप आहेत. आर्ज येऊन येक दोन वेला, करणे तो केला परंतु दाद होत नाही. आम्हाकडे मनसबा कारभार काही नाही. आन्नवस्त्र न मिळे. रांडापोरे उपवासी मेली. येथे दुख कोणाजवली सांगावे? आज्ञेप्रो चाकरी करणार ते बारा तास करीत आहे. घरी उंदीर, पिसवा, ढेकूण उपवासी मेले. येंदाचे साली साडे सात हजार रुा दोनसे माणसे यासी पावले आहेत. मुंजी चिरंजीवाची केली. कर्जदार जालो. आई पोटास न घाली, बापाचे नावे शाहारात भीक मागता न ये. वाणियाचे च्यार हजार रुा जाले, उदमियाचे दोन हजार जाले. दोनसे माणूस उपवासी निर्वाण बैसले आहे. कारभारी मनावर घेत नाही. यैकत नाही. आम्ही गरीब ब्राह्मण आहो. वाईट बरे न कळे. वलखी येक धणियाचे पायासी आहे. वगवसिला

कोणी नाही. निरोप न घेता जावे तर लबाड म्हणतील. आजीचा दिवस क्षेत्र उपवास करितो. उदैक दरबारास येऊन निरोप घेऊन जाऊ. हे विज्ञापना.

¶*Bhagwantrao laments that no heed is paid to all his entreaties for help out of his miseries.*

---

*No. 138*] *[1750?*

## श्रीराजाराम रघुवीर भवानीशंकर

विज्ञापना उपर. माहाराज वडील मायेबाप धणी याजस्तव आशा धरून येऊन सेवा चाकरी केली. साहेबी दयामाया केली. कर्जदार जालो. फकिरी घेऊन. रांडापोराचे चालवितील, वृधापकाली आम्हास आन्नवस्त्र मिलेल, ही वासना धरिली. सर्वश्वे ख्वार[१] जालो. पडिल्या प्रसंगी सेवा निदानी केली. लाविली झाडे साहेबाची यैसे आसोन लटिका विकल्प धणियाचे चिती आमचेविसी घातला, त्याचा झाडा ईश्वर घेईल. आम्ही ब्राह्मण आहो. समयोचित धणियासीहि कलेल. बेइमान, लबाड, फितवेखोर आहेत ते कलतील. सत्य इमान आहे ते बुडत नाही. बरा निशा आसावा. आम्ही आनाथ गरीब ब्राह्मण साहेबाजवली उतलो माजलो नाही. धन संपदा लक्ष्मी नाही, पोटास नाही, याजस्तव आर्ज विनंती केली. याचा विकल्प दुष्टानी घातला तर राजनीति सत्यधर्मे करावा. मजमूचा हुदा, कैदकानू, मर्यादा साहेबाची आहे. कदीम पाया मर्यादा धणियानी चालवावी तेव्हा राज्याचा बंदोबस्त होईल. चोर, चाड, लबाड, लुछ सांगतील त्यांचे खरे मानावे यैसे नाही. जो राजा राज्य करील तो आम्हा लोकास वलखून चालवील. कर्ज वारील. सध्या साहेबी आन्नवस्त्र द्यावे. रांडा पोरे आणिली आहेत. दसरा जाला. तीर्थरूपाचे श्राध आहे. खर्चास नाही. वाणी, उदमी व गोसावी यानी आडविले आहे. न्याये करावा. आवकृपा असेल तरी निरोप द्यावा. देशांतरे जाऊ. हे विज्ञापना.

¶*Bhagwantrao Amatya once more continues his doleful tale.*

---

*No. 139*] *[1750?*

## श्रीरामचंद्र माहाराज

विनंती उपर. चिरंजिवास आलंकार घालावे म्हणऊन ब्राह्मण सांगत आहेत. आम्हाजवली आहे नाही हे तुम्हास ठावके आहे. मातुश्रीस विनंती आर्ज लिहिला

---

१ ख्वार = हलाखी.

आहे. तुमचे विचारास आले तर समये मर्जी पाहून आर्जी वाचून दाखवणे. कृपाळु जाली तर मातुश्री देतील, नाही तर उगीच राहातील. आईसाहेबी न दिले आणि वरकडानी दिले समान आहे. पादशाहास संकटी धावा करील हा भरवसा आहे. समये पाहून आर्ज करणे हे विनती.

¶*Bhagwantrao wants to have some ornaments made for his son.*

---

*No. 140*] [*1750 ?*

[बंदाच्या वरचा भाग गहाळ.]

उपवासी मेलो. फजीती जाली. हा तमासा पाहात बैसला. येक महिना गडास जाऊन जाला. दरबारी आवघा दगाच वाडला आहे. खाली शाहारात प्रधानाची सता. रा दिनकरपंत व रा रामाजीपंत व लक्ष्मणपंत आहेत. राजे विदेहि, आकलबुधी नाही, कृपण अदत्त आहेत. सांगितले येकत नाही, यामुले फजीत पावत आहेत. आपले मातेस अर्जऊन राज्यपद भोगावयासी ज्यास न कले तो राज्यकारभार काये चालवील हे कलोन गेलेच आहे. राजे धनलोभी आहेत हे सर्वास ठावके जाले. प्रतिनिधि थोरच आहेत. श्वता ज्ञान नाही. मातुश्रीजवली सतबुधी कारभारी मातबर कोणी नाही. बहुनायकी विचार जाला आहि, यामुले राज्यास आपाये होत आहे (अपूर्ण)

¶*Bhagwantrao Amatya makes some reflections on the incompetency of Ramraja.*

---

*No. 141*] [*1750 ?*

श्री

पेसजी राजपत्रे सादर आहेत, यैसे आसतां दादोबा नाईक सराफ याणे व राधाई इणे लबाडी करून मार याचा लेक, दरम्याने गोत्रजास व वरकड कोणास न कलतां, चोरून घेतला आणि परस्थली जाऊन मुंज बांधली आणि वतनासी कजिया राधाईने व सराफ माराने लाविला आहे म्हणून हुजूर विदित जाले. तरी पेसजी कजिया काही उदभवला नसता लबाडी करावयास गरज [पुढील अर्धा बंद गहाळ. पाठीवर पुढील मजकूर] दिराचे पुत्रास कन्या देऊ केली म्हणून लिा तरी अति उतम. अनकूल पडिल्याप्रमाणें कार्य करावे. या प्रांते नवरे पाहिले तरी उदंड मिलतील, परंतु तुमच्या चितास आले पाहिजेत. येख्तयार असेल त्याप्रमाणे घडोन येईल. राजकी प्रसंग तरी काही लिहिजेसा नाही. उभयेता

राज्यांत ताळ नाहीं. अववा आविचार जाला आहे. मातापुत्र, गुरूचेला, धणीचाकर, ही मर्यादा दोनीस राहिली नाही. आवघे आपले स्वार्थाकरिता जागे ठिकाणे धरून लक्ष्मी संपदा भोगून सुखरूप आहेत ज्याची (अपूर्ण).

¶*The writer, presumably Bhagwantrao, refers to a certain legal case of a Vatan and towards the end of the letter says that there is chaos in the administrations of both Satara and Kolhapur.*

---

*No. 142*] [*1750 ?*

## श्रीरामचंद्र रघुवीर

विनंती उपर. रा॥ उमाजी गोसावी नादगिरीहून येथे आले आहेत. आमचे दर्शन जाले. तुम्हास आसीर्वाद सांगितला आहे. सोइरोबास दुखणे लागले आहे. दप्तरचे रुमाल दोन पा॥ आहेत. नारोपंताचे श्वाधीन करणे. कागदपत्र जतन करणे. आजी वाणी उचापत देत नाही. याची समजाविसी जाली पाहिजे. गोसावी कर्जदारी २ येऊन बैसले आहेत. खर्चास नाही. रांडा पोरास वीस दिवस आन्न नाही. याचा आर्ज धणियाजवली करणे. बकसीस चिठी पा॥ आहे. सावध होणे हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya sends some daftars to Satara. He also communicates the arrival of Umaji Gosawi of Nandgiri to exact his debts.*

---

*No. 143*] [*1750 ?*

## श्रीरामचंद्र रघुवीर

विनंती उपर. मातुश्रीस व रा॥ बाबाजी जाधवराऊ यासी विनंती पत्रे पा॥ आहेत. समये पाहून तुम्ही वाचून दाखवणे आणि उतर घेणे. आम्ही शनवार आदि(त)वारी निरोपास येतो. मातुश्रीस आमचा कंटाला आला आहे, हे कलले. येकनिष्टेचे फल यैसेच आहे. इमान शफत क्रिया बुडाली. सीमा जाली. तुम्ही दरबारास जाता ते खासा खुदच आहा. संपदेचे सोइरे. दरबारी दाद नाही. हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya says that Tarabai is tired of him and that loyalty, honesty and promises have no place in the Darbar.*

No. 144] [1750?

## श्रीराजाराम रघुवीर

विनंती उपर. रा। बाबाजी जाधवराऊ यांची इतराजी आवकृपा आम्हावर आहे. याजस्तव त्यास पत्र लिहून पो। आहे. तुमचे चितास आले तर धणियासी वाचून दाखवणे. मर्जी पाहाणे. खुशालीचे वख्ती श्रवण करणे. मग रा। बाबाजी जाधवराऊ यासी वाचून दाखणे. विनंती करणे. क्षमा करून दया केली तर उतम. न करीत तर राजे लोक थोर आहेत. रा। बाबूराऊ भो। यासी श्रुत करणे. रा। विठलराऊ बकसी व्याही आहेत यासी सांगणे. रा। गोपालजी हवालदार यासी सांगणे. भलेपणे सर्वांनी सांगोन आम्हावर दया करावी. न करीत तर थोरच आहेत. गाव खेडी याच्या सनदा व ताकीदपत्रे पाहिजेत त्याची विले करून घेणे. रा। नारो सिवदेऊ व लक्ष्मण जाधव तटले आहेत. विजापूरची पत्रे आली ती हेजीब खोलंबिला आहे. वाऱ्यावरील मंथन, कारभार दिवाणाचा आम्ही बारगीर आहो. माझे माझे म्हणऊन आभिमान बालगीत नाहीं. जाले कार्य तर चाकरी धणियाची करूं, नाही तर नाही म्हणऊन सांगो. येत्न करावा, फलदाता ईश्वर आहे. मातुश्रीस व बाबाजीस विनंती करणे आणि पत्रे करून घेणे. आम्हावर सर्वांनी दया करावी. गरीब लोक आहो. हे विनंती.

*¶Bhagwantrao sends a petition to Babaji Jadhavrao with a request to have it placed before the queen.*

---

No. 145] [1750?

## श्रीराजाराम माहाराज

विनंती उपर. जानोजी सेवाले याचे कारकीर्दीस बाजाराचा व घरजागियाचा बोभाट हुजूर जात नहुता; हली आम्ही गरीब ब्राह्मण देखोन राणोजी भो। याणी रयेतेस तगादा करून घर मोडीत आहेत; बलाऊ पा। [ पाठविता ] येत नाहीं. वाडियामागें रयतेची घरे परसू येऊन लागले आहे. हा वाडा घरजागा राणोजी भो। याचे स्वाधीन करावा. येथे पाणी नाहीं, आम्ही जाऊन माहुलीवर राहूं. रोज उठोन कजिया नलगे. माहाराजास अर्ज करणे. आम्हा गरीब लोकास बाजार घरवाडा कैशास पाहिजे? निरोप घेणे. चाकर लोक रयेतेसी कजिया पुर्वत नाहीं. कोण राहणार ते राहूत. आम्ही जातों हे विनंती.

*¶Amatya Bhagwantrao's letter to the king, asking permission to depart, as he cannot put up with the ill-treatment practised by Ranoji Bhonsle.*

No. 146] [1750 ?

## श्रीराजाराम रघुवीर

विज्ञापना उपर. आम्ही माहाराजांचे दयेस्तव येऊन राहिलो. दूधतुपाने मायेने गुंतलो. वाईटवरी आज्ञेप्रमाणे सेवा केली. चाकरी बरबादे[1] गुन्हा लाजीमे[2] ऐसी गत जाली. माहाराज वडील धणी समर्थ आहेत. अर्ज केला तर चालतां नाहीं. दाद मनसुबी नाहीं. दरमाह बोली केली त्यास ठाव नाहीं. कारभारी-याची आमची वलख नाहीं. साहेब त्याजवर हवाला देत आहेत. त्यांचे डोळे उघडत नाहीत. गुदस्ताचे वर्षी साडेआठ हजार रुो सरसाल पावले. चिरं-जिवाचे मुंजीस व रामनवमीस कांही दिले नाहीं. नवे साल निवाले; दोनसे माणूस हती घोडी पोटास काय दरमाहा पाहिजे, साहेबी न्याय करावा. चिरंजीव व कारकून बारा तास लिहिणे खरडानिसी करीत आहेत. पोटास न मिळे. चाकरी कैसी होईल, हा विचार करावा. आम्ही आलो, दरबारी बैसलो, तर मागतेकरी आले ऐसे दिसते, राग येतो. पोटास अन्न द्यावे, वस्त्र द्यावे. सीमा जाली. मनसबा कारभार आम्हाकडे कांही नाहीं. जमे खर्च नाहीं. सीमा जाली. निरोप द्यावा हे विज्ञप्ति.

¶*Bhagwantrao Amatya communicates to Tarabai the extremely distressful condition to which he had been reduced. He asks for permission to depart.*

---

No. 147] [1750 ?

## श्रीरामचंद्र[3] रघुवीर

विनंती उपर. तुम्ही चिठी पाा ती राा सोईरोबाकडे पाा. उतर आणून पो आहे त्याजवरून कलेल. सातारा व वरकड गड किले याची समजाविसी बास्कल, पुस्कल बोलोन होती यैसे नाही. तीन पधती राज्यातील आहेत. त्यामध्ये येक कदीम पाया धरल्याविना गडची व हश(मी) लोकाची व सर्वाची समजाविसी होत नाही यैसा अर्ज करणे. प्रतिनिधि दोन वेळा आले गेले. राज्याचा बंदोबस्त आथवा मनसबा काये केला ? श्राधभट दूर राहून खेल करीत आहेत. राजकारण बोली होत आहे. मधेस्त थोरच पडले आहेत. येके गोष्टीचा ताल नाही. राजनीतीस कधी शाश्वत असावी. आमीन[4] असावे. धणियाचे श्वहित, राज्याचे कल्याण, रयेत मुलकात नांदे यैसे करावे, तेव्हा

---

१ बरबाद = नष्ट; रद्द. २ लाजीम = योग्य.

३ सबंध पत्र भगवंतराव रामचंद्र अमात्याच्या हातचें आहे. ४ आमीन = विश्वासु.

परिणाम उतम आहे. आम्ही निकामी, कार्याचे नव्हे, हे धणियासी कळले आहे. श्री यात्रेस जावयासी निरोप द्यावा. चिरंजीव मु(ले) नेणती आहेत. आगत्य आसेल तरी चालवावे. हुदा धणियाचा आहे. आमचा आभिमान दुराग्रह नाहीं. कर्ज वारावे हा आर्ज करणें. रांडा पोरे उपवासी मरत आहेत. आन्नवस्त्र नाही. कर्जदारी येऊन दारी बैसत आहेत. याचा आर्ज करणे नाही तर आम्ही येऊन निराप मागतो. हे विनंती.

¶*Bhagwantrao Amatya complains of the mismanagement of Satara and other forts and finds fault with the present officials for not doing justice to the people. He mentions his own abject condition : he has contracted debts and his family is starving, says he.*

---

*No. 148]* *[1750?*

## श्रीराजाराम रघुवीर

विज्ञापना उपर. माहाराजाजवळी अर्ज करणे तो केला आहे. राजश्री बाबाजी जाधवराऊ याजपासीं विनंती करणे ती केली आहे. करुणा येऊन सदयचिते दया करावी. इतबारी विश्वासू आसिलो तर ठेवावे. अन्न वस्त्र द्यावे. चिरंजीव बारा तास आज्ञेप्रमाणे चाकरी करीत आहेत. घरी पिसवा ढेकूण उंदीर फार जाले. पाणी न मिळे तेव्हा अन्न वस्त्र रांडापोरास नाहीं. चाकर भोई चालिले. हती घोडी यासी चारा नाहीं. कर्जदारी यांची रोज तोडणी[1] सोशीत आहो. शहरात वरकड जेऊन खाऊन सुखी आहेत. आनंद करीत आहेत. व्यापार चालतो. कोणास आश्रा आहे. आम्ही साहेबाचे सेवक निर्वर्णी आहोत. तारापूर आमचे वतन. दुसरा आधार नाहीं. दीनबंधु हे आपले बिरूद सत्य करावें. हुदा मामला हती घोडे दौलत साहेबाची, आम्ही बारगीर, ऐसी परंपरा तीन पिढ्या चालत आली आहे. गड किले राज्य धणीयाचे श्वाधीन करून वडील निराळे जाले, हे माहाराजास व सर्वास दाखल आहे. चिरंजिवाची मुंजी केली, कर्जदार जालो. अभये वचन दिले आहे, त्याप्रमाणें दरमाहाचा येवज देविला पाहिजे. श्रीचा उछाह आला आहे, बेगमी करणार धणी समर्थ आहेत. अर्ज चालवावा. हे विज्ञापना.

¶*Bhagwantrao Amatya, in this letter, states the abject condition to which he had been reduced. This and the previous letter of the Amatya appear to be addressed from Satara where he had put up.*

---

१ तोडणारे शब्द, जाचणुक.

No. 149] [7-1-1751 ?

श्री

श्रीमंत राजश्री भाऊसाहेब

स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक हरि राम साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान तागाईत छ १९ सफर मोकाम भरतगड स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. करवीरचें वृत्त सेवेसीं लिहिलें होतें त्यावरून विदित जाहालेंच असेल. त्या आलीकडील वर्तमान तरी लस्कर दरकूच घाटाखालीं आलें, याकरितां दुसरे रोजीं करविराहून कुडालास येऊन दाखल दोन तास रात्रीं जाहालों. त्या पूर्वीच सडे स्वारीनें त्रिवर्ग येऊन मसुरेस[1] दाखल होऊन गनिमासी गाठ घालून येकास येक न मिळतां होणे तें होऊन गेलें. माघारे लस्करास आले. शत्रूस वक्र होतो ते कमी जाहाला. सावताकडील प्यादियानी अवसान अगदींच टाकिलें. स्वामींचे फौजेंत व सावताचे फौजेंत दम बराच होता, परंतु झाडीचे व वारी बहुत अडचण, राउतांचा उपाये नाहीं, याकरितां बहुतां प्रकारें दिलासा करून तयार करविले आणि निवालों तो तीन हजार प्यादे होते त्यापैकीं मुकामास आलों तों दीड हजार राहिले. तोंडास गेल्यावरी येकाचें दर्शन न होय यैसा विचार दिसोन आला. दिवसगत लागलिया जागा जातो याकरितां दोन कोस च्यार कोस मोकाम करीत नजिक आलों. इतकियांत आंगरे यांचे पत्र आम्हांस आलें व राजश्री मानापासहि आलें. त्या उपरी विचारे करून दाब दवाव दाखऊन गडचे मोर्चे उठवावे तरीच उत्तम आहे, नाहीं तर मोर्चें उठवणे आम्हांस जरूर आहे यैसें सांगोन पाठविल्या उपरी छ १७ सफरीं मोर्चें उठऊन भगवंतगडास गेले. आम्ही फौजसुधां गडानजीक येऊन मुकाम केला आहे. याउपरी बोलीचालीचा विचार जाहाला तरी उतम; नाहीं तरी पुढें आज्ञा काये ते करावी, तेणेप्रमाणें वर्तणूक करून. स्वामीनी बेगमी विसावे सफरपर्यंत केली ते उरकली. याउपरी कर्जावरी इमारत आली. कर्जहि येथें येक रुपया मिळत नाहीं. करविराहून येतेसमईं पांच हजार रुपयांचा यैवज समागमें घेऊन आलों. या उपरी त्याजवरी इमारत आहे. वडतां वडेल तें प्रमाण. येथें हरभरे दोन पायली व बाजरी आडीच तीन पायली, करड साडेतीन पाइली व उडीद तीन साडेतीन पाइली या प्रमाणें धारण आहे. करविराकडील बातमी जे लिहिणे ते राजश्री विसाजीपंत तेथें आहेत ते सेवेसीं लिहीत असतील. आम्हांस आज्ञा करणार समर्थ स्वामी आहेत. विदित होये हे विनंती.

¶*Hari Ram informs Bhausaheb about his affray with the Angrias and deplores the reverses met by the forces of the Peshwa and the Savant in that quarter.*

१ मालवणजवळ; कोंकण.

No. 150] [12-1-1751

श्री

आज्ञाधारक आनंदराव गिरिधर कृतानेक सास्टांग नमस्कार विज्ञापना. छ २४ सफर तागायेत खावंदाचे पुण्यप्रतापें करविरी सेवक क्षेमरूप असे विशेष. इकडील वर्तमान रा येसाजीपंत हरिपंताचे बंधु यानी जाऊन वलभगडचे[1] ठाणें हस्तगत केलें. पंचवीस माणूस गडावर येऊन कलानिधि व पारगड भीमगडास ठाणें बसवायाकारणें जमाव घेऊन गेले आहेत. वलभगडावर ठाणें पडले म्हणोन चिकोडीकराचें अवसान गेले. येमाजीपंत परम श्रमी आहे. देसगतीची नांदणूक कसी होईल म्हणोन चिंताग्रस्त आहेत. लिंगोपंतनामे वकील मुख्याकडे पाठविला होता. वकील मुख्यांसीं विनंती करूं लागला जे, श्रीमंतास तुम्ही गड किले दिल्यानें तुमची सता राहील, अगदी व्याप करोन तुम्हासी फिरोन गोष्टी सांगतील, इकडे आमचीहि खराबी होईल. यैसा फितूर बोळ आरंभिल्यावर मुख्यानी आज्ञा केली की सांप्रत काली श्रीमंताची मनोधारणा केल्याखेरीज आमची उस्तवारी होत नाही. करार केल्यास अंतर होऊं नये. तुम्ही आपल्या निभावासारखें श्रीमंतास मागतील ते रुपये देऊन आपला निभाव होये तो विचार करणें. यैसे सांगून येमणास कागद लिहून वकिलास निरोप देऊन पाठविलें. येथील कारकून सौा बाईस अद्याप कार्याविसी नेश(?) उपदेशीत आहेत. कुचालेच्या गोष्टी सागायास चुकत नाहीत. मुख्यांस सांप्रतकाली हे राजकारण केल्याखेरीज निभाव नाही. होतसा निश्चये कलला आहे. रा केशवरायासी संभाषण करतात कीं सतरसीचें तख्त आपणास प्राप्त होणेचा भाव दर्षवितात. तात्पर्य सतरसीचें चितामधें फारसें आहे. श्रीमंताकडोन वडोन यावेसें अपेक्षा धरून गडकिले दिल्हेसें केशवरायासी दर्शऊन संभाषण करितात. अंतरंगे मुराररायासहि शफतपूर्वक लिहून बोलावितात. सिवाजी तिर्मल कागद लिहितो की थोडक्या दिवसांत मुरारराव स्वामीच्या दर्शना येणार आहे. सीघ्र बोलाऊन घेऊन येणेस वरच्यावर हेहि कागद लिहून जासूद रवाना करिताहेत. अंगऱ्या मसुरेस वेढा देऊन बसला आहे. लढाई होऊन च्यार दिवस जालें. आदित्यवारी लढाई जाली. आंगऱ्याचा मोड जाला. मानाजी पायेगोडाने पंचवीस घोडी पडाव घेऊन आले. अंगऱ्याचें पानास साठ माणूस लढाईत मारलें गेलें. जखमीहि जालें. त्यावर अंगऱ्याने यासी सलुक करोन मसुरेमधें श्रीमंताचे निशान चढविले म्हणोन येथ खबर आहे. राणोजी घारपडा सेनापति कापसी वगैर आपल्याच प्रांतामधें आहे. मुख्यांचा क्रोध सेवकावर बहुत आहे. आम्हापासी बातनी कस्यास पाहिजे ? आम्ही पालेगर की

---

१ चिकोडीपासून नै. १५ मैल, जि. बेळगांव.

काये? दोन च्यारदा जाणेस आज्ञा केली. जात नाही. श्रीमंतानी बातनी आम्हा-पासी किंनिमित्य ठेविली, यैसें केशवरायाजवल उश्रामा[1] फारसा करतात. मुल्याचा राग सेवकावरला अद्याप शांत जाला नाही. गांवांत देवदर्शनास जावे तर परवानगी आणऊन जावे लागते. येथे माहागाई रोजमरा पुरतहि नाही. कर्जा-खाले सेवक येऊन हैरानगत आहे. शादीचीं सनगें तमाम कारकून व पायची माणसें देखील पाऊन चुकली. सेवक मात्र बाकीच राहिला. घरचीं मुलें माणसेंस उपोषणें होतात. खावंदास ईश्वर जाणून येकनिष्ठेने चाकरी करतों. दरबारीं मुरबी कोणी मजविसीं विज्ञाप्त करणेंस नाहीं याकरितां विनंती केली आहे. यैकिलें वर्तमान सेवेस श्रुत केले आहे हे विज्ञाप्त.

¶*Anandrao Giridhar writes news to the Peshwa from Kolhapur complaining of the attitude of the Chhatrapati and his plans for putting down the Peshwas.*

---

*No. 151*] [*14-1-1751*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान**
**स्वामीचे सेवेसी**

विनंती. सेवक हरि दामोदर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील सेवकाचें वर्तमान छ २६ सफर स्वामीच्या कृपाअवलोकनेंकरून मुकाम कसबे जलोद येथास्थित असे विशेष. तळेगाव पाा संगमनेर, येथें गायेकवाड याचे धामधुमीचें वर्तमान आलें, त्याजवरून आमचे व राजश्री सदाशिव दामोदर याचें बुणगें व त्याचे हस्ती यैसें सें सवासें स्वार सदासिवपंताजवळ गंगेवर ठेऊन आम्ही सडे व त्याची फौज सडी घेऊन नांदगांवी आलों. तेथें राजश्री महिपतराव कवडे आले. त्याचीहि सडी फौजेनसी चिखलवाहालेस येऊन बातमी गाये-कवाडाची सेवेसीं लिहिली आहे. ज्या रोजीं आम्ही चिखलवाहालेस आलों त्याच रोजीं त्यांचाही मुकाम चिखलवाहालेसच येणार होता. आमचे स्वार पुढें बातमीस आले होते, त्याजसी व त्याचे रोख्याचे स्वार गावगना आले होते त्यासी गांठ पडली. आमचे स्वारांहीं त्याचे दोघे जखमी करून दोन घोडीं पाडाव करून घेतली. आम्हीहि चिखलवाहालेस येतों हे बातमी त्यास कललियावर कोसभर मुकाम राहिला. तेथून ढाला फिरऊन माघारे धुल्या कसबियावर मुकाम करून जिराइत बागाईत लुटून मोगलाई जतीचे ऐवजाचा तगादा जमीदारास

---

[1] टोमणा मारतात.

केला, तो आम्ही लागोलाग प्रात:कालीं कूच मौजे धाडन्यास आलों, तों त्याणें रात्रीमध्यें घासदाणियाचा व मोगलाईचा यैवज करार करून कूच करून कवटल पाा सोनगीर येथें मुकाम केला. त्या तलावर राजश्री विश्वासराव याजबराबर पत्रें देऊन रवाना केले ते जाऊन पोहोंचले. पत्रें देऊन जाबसाल समयोचित उत्तम केला. परंतु त्याणी पोट भरावयावर नजर देऊन गोड गोष्टी सांगोन पत्रें लिहिलीं. आम्हीहि त्याचे पाठीमागें गेलों, तों ते अटलेहून कसबे डांगरीस गेले. आमचा मुकाम फागण्यास जाहाला. तेथें मार्गी तीनेक तटें आम्हाकडील सिलेदारास त्यांची सांपडली. प्रात:कालीं कूच करून जाता सिरसालेजवल राजश्री रामचंद्र माहादेव दोनसें स्वार व राजश्री शंकराजी माहादेव शंभर स्वार व राचश्री मानाजी निकम पाऊणसें स्वार व राजश्री महिपतरायाकडे सरकारपागा आहे ते ये प्रांती होती तेहि तयारीनसी येऊन सारे सामील जाहाले. तसेच डांगरीस आलो, तो च्यार घटिका आगोधर कूच करून तापी पिलोदेचा पाणवथा उतरून थालनेर परगणियाचे घोडसगांव व चौपडी परगणियाचे मोहिद्यास मुकाम केला. आम्ही याचे तलावर तल करून डांगरीस राहिलो. ती कोसाचा अंतरामध्यें तापी दक्षण-तीरीं आम्हाकडील बातमी, उत्तरे तीरी त्याचे लोकाची बातमी, त्याजवरून बिभीषा जाली कीं, हे पाठलाग करून तलावर येऊन राहिले, रात्री दगा करतील म्हणून दारू गोली वाटून बहुत सावधता करून तापीचे घाटावर पांचसें राऊत ठेविले आणि विचार केला कीं, तापी तीरेच बराणपूरपर्यंत जावें, हा हेत धरून चोपडे परगणियाचे बुदगांव नजीक जलोद तापीचे उत्तर तीरी मुकाम त्याणी नेमिला. आम्ही त्याचेच घाटे तापी उतरावी, तरी ते पुढें आम्ही मागें यामुले सारा मुल्क खराब होईल जाणोन निवडेतील निवड करून दिढेक हजारा-नसी च्यार घटिका रात्रीं कूच करून बुदगांवी तळ नेमिला होता त्या स्थलास आणी च्यार घटिका दिवसास तापी उतरोन दो कोसाचे अंतरे उभे राहिलों, तो राजश्री सदाशिवपंतासमागमे राऊत होते ते त्याणी पारोलाहून रवाना केले व पदमाकर कृष्ण याचेहि सामान यैसे समयास येऊन पोहोचलें. गाइकवाडाहि नेमिल्या मुकामी कूच करून बुणगें रवाना केलें तों आम्ही पुढें आहों हें वर्तमान कललियावर बुनगें माघारें फिरऊन साहा साडेसाहा हजार फौज निवड करून चिलखतें सामाने बांधून आम्हाकडे बातमीस राऊत पाठविले. आम्हीहि सामान बांधोन बातमीस पुढें शंकराजी माहादेव ठेविले होते त्यांसी परस्परें उत्तर प्रतिउत्तर जाहालें. निश्चयेंकरून उभें आहों यैसी जाऊन बातमी त्यास सांगितली. उपरांतिकहि च्यार घटिका सडे फौजेनसी उभे राहून बुनगे माघारे थालनेर पर-गणियात लाविले. मागाहून आपण बोलोन चालिले कीं, उत्तर तीरीं खल्या

आहेत, दक्षणतीरीं मैदान आहे, तिकडे जाऊ. हें वर्तमान आम्हास कललियावर आम्ही दक्षणतीरीं उभे राहिलों. सर्वांस पुसिलें या, उपरी विचार काये? त्यास अवघियांचा हेत कीं, गांवखडियासीं झुंझे तों होतात, परंतु फौजेसीं झुंझ बहुतां दिवसीं प्राप्त जाहालें आहे. ये समई स्वामिसेवा येकनिष्टतेनें करावी. ते फार आपण थोडे, तरी खावंदाचा प्रताप समर्थ आहे, खामखा श्री येश देईल, हा समये फिरोन येईल येसें नाहीं, येसें म्हणून तीन टोळ्या करून उभे राहिलों. राजश्री महिपतराव कवडे अल्पवये होऊन चांगले हिमतीनें आपले टोळींत उभे राहिले. त्याच प्रकारें रामचंद्र माहादेव व शंकराजी माहादेव व मानाजी निकम हे आपले सामानानसी स्वतंत्र येके बाजूस उभे राहिले. त्याचप्रमाणें आमचे व राजश्री सदाशिवपंताचे लोक येके जागां उभे होते. सर्वांचा तंम होता कीं, काम पडलियास येका पुढें येक वाढोन आपआपला लौकिक करावा. त्यासी गायेकवाडाही पिलोद्याचा घाट न उतरता उत्तर तीरें थालनेरापासी जाऊन तापी उतरून राहिले. ते बातमी आम्हास ये तों सा कोसांचें अंतर पडलें, आण ते च्यार कौस पुढें गेले. येकूण त्याचे आमचे दाहा कोसांचें अंतर जाहालें. मग त्याजवर जावें तर चौ घटिका रात्रीपासून तिसरा प्रहरपर्यंत घोडीं ताटकल्ली व दरमजलीने हलक जालींच होतीं. त्याणी टाला दिल्हा असतां बहुतावर आपण जावें हें समत न्हवे जाणोन येथेंच मुकाम केला. त्याचें सामान विशेष. चौघे भाऊ मराठे सरदार इतके असोन इकडे अवघी मामलेदारांचीच पडली. परंतु स्वामीच्या प्रतापतेजेकडून त्याचे सैन्याचा भ्रम केला. समसेर बाहादरावर इकडील सवाई जाहाली. इतकियाउपरी त्याणी दरमजल आपले प्रांतास गमन केलें तर उत्तम. कदाचित सोनगिरीकडे फिरोन जाहाले तर मागती त्याजकडे जातच आहों. आम्ही ये प्रांते न येतां आधीं त्याणी बागलाण, नेर, धुले, चिखलवाहाल, झोडगें, टोखवडे, सोनगीर, जलोद, डांगरी, चोपडे, येथील घासदाणे व मोगलाईचे यैवजपैकीं करार केला त्यास कोठील वसूलहि घेतला, कोठील ओलाहि आहेत. कितेक जागांचे रोखेपत्र जमीदाराचे व कमावीसदारांचे व ततपक्षी केसो हरि व लखमोजी गोडसे व गोतुरकर लाडखान याणी दरमियान येऊन निशा केली आहे त्याचा तगादा परगणियास आहे. यास्तव राजश्री सेनापति व सयाजी गायेकवाड याची पत्रें पाठवावीं कीं, खानदेश प्रांतें तुम्ही यैवज घेतला व रोखेपत्र व आलो असतील त्या राजश्री महिपतराव कवडे याचे विद्यमाने सोडून देणे. याच प्रकारें सरकारचे पत्र मुजरद जासूदजोडीबराबर पाठवावे. येणे करून ओला व खतें पत्रें आलियास रयेतीचा बच्याव होईल. सेवेसीं श्रृत होये हे विज्ञाप्ति

¶*Hari Damodar tells the Peshwa graphically how he overawed the Gaikwad's forces in Khandesh.*

3408

No. 152] [18-1-1751

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक हरि दामोदर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ १ रबिलोवल मुकाम नजीक कसबे येरंडोलपर्यंत स्वामीचे कृपावलोकनेकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे. विनंती. या प्रांतीचे सविस्तर अर्थ कसबे जलोदचे मुकामीहून सेवेसीं लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. राजश्री दमाजी गायकवाड फिरोन गेलियानंतर जतीचे कार्यभागाचा बंदोबस्त कांहीं केला व राहिला करीत असों. येरंडोलचा मोगल ठाणियांत आहे त्यास शह देऊन काढावा, याजकरितां फौजसुधां कसब्यावरी जात असों. खावंदाचे पुण्येकरून शासन केलें जाईल. गायकवाडानी या प्रांतीचे घांसदाणेयाचा यैवज खंडण्या केल्या; त्यास आम्ही या प्रांतीं आलियानंतर लोकांस, यैवज वसूल न देणे, म्हणोन ताकीद केली. त्यावरून अगोधर कोणी थोडाबहुत दिल्हा तो दिल्हा. ओला व रोखेपत्र घेतले आहेत ते मात्र गुंतले आहेत, ते निवाले पाहिजेत. यास्तव राजश्री शेनाखासकेल व सयाजी गायकवाड स्वामिसंनिध आहेत त्यांस सांगोन त्याचा कारकून व पत्रें व सरकारचीं पत्रें मशारनिलेस माकूल करून लेहून पाठविले पाहिजेत की, खानदेश प्रांतीच्या ओला व रोखे मावारे पाठऊन देणे, म्हणिजे पाठऊन देतील. या प्रांतीच्या खंडण्याचा यैवज वसुलांत न आला याजकरितां राजश्री दमाजी गायकवाड फिरोन सोनगीर प्रांतीं वगैरे फिरोन येणार म्हणोन आजी वर्तमान आले आहे. आलेच तरी आम्हीहि फिरोन त्याचे तोंडावर जातों. जें वर्तमान होईल तें वरचेवरी लेहून पाठऊन. सेवेसी श्रुत जालें पाहिजे हे विज्ञापना.

¶*Hari Damodar tries to settle the province of Khandesh after the depredations of Damaji Gaikwad. He reports to the Peshwa that in addition to the ghasdana cess, the Gaikwad had also taken some deeds from the people regarding the payment of dues which the writer requests the Peshwa to take back from the Gaikwad and return to the owners.*

---

No. 153] [19-1-1751

श्री

सेवेसी शंकराजी राम विज्ञापना. तागायत छ २ रबिलावल जाणून स्वामीच्या कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री फतेसिंगबावा तुळजापुरास

आले. च्यार रोज तुळजापुरीं मुकाम होतो. तेथून कूच करून मौजे दारफळ परगणे ढोकी प्रांत बालाघांट येथें मुकाम आहे; आणि च्यार रोज जाहाले. पुढांहि दोनच्यार मुकामे येथे आहेत. दोन हजार फौज आहे. आठाच्यार रोजीं आणखी फौज जमा होईल. दर्याबाई निंबालकर व आपाजी भावजी प्रभु यांची भेटी नीरानरसीपुरीं जाली. बोली जाली कीं, आपाजी प्रभु व दर्याबाई यानी येक-विचारें राहून परभारें मुलुकगिरीस जावें. कूचमुकाम दर्याबाईनी करावे, मिळेल तें फौजेवर वाटून द्यावें, यैसा करार जाला. दर्याबाई निवोन बारसीस आली. आपाजी प्रभुहि त्यांच्या मुलकांतून बालाघाटी येत होते. दोन आडीच हजार फौज प्रभूसमागमे आहे. यैसें असतां दर्याबाईनी आपाजी भावजी याकडे कारकून पाठविला कीं तुमचा आमचा करार जाला असतां तुम्हीं आमचा मुलूक लुटितां हा विचार काये? ते आपाजी प्रभु जिवानिशी सडे पळोन तेरें परगणेत मौजे सिनफळ आले आहेत. हजारबारासें जमा जाले आहेत. फतेसिंगबावाच्या लस्करापासून आठादाहा कोसांवर आहेत. त्याकडे बावानी आर्जी कारकून व समाधानाचीं पत्रें देऊन प्रभूकडे पाठविले आहेत. येक दोन रोजानी प्रभु लस्करांत येतील. दर्याबाई खडकीवरोन उठोन बाबुळगावावर आपाजी प्रभूचा मुकाम होतो त्या तळावरच राहिली आहेत. आपाजीच्या लस्करचा मोठा गलाटा जाला तो लिहितां न ये. कोणाजवळ भांडे राहिले नाही. तमाम गेले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Shankraji Ram communicates the movements of Fatesing, Daryabai and Appaji Bhavji Prabhu, and further describes the woeful plight of the latter when he broke the contract entered into with Daryabai not to molest her territory.*

---

*No. 154]* *[19-1-1751*

**श्री**

सेवेसी शंकराजी राम साष्टांग नमस्कार विज्ञापना यैसीजे. तागायत छ २ रबिलावल जाणून वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीनी आज्ञापत्रें सांडणी-स्वारासमागमे छ २३ सफरचीं पाठविलीं तीं छ २८ रोजीं साईकाली पावलीं. तेथें आज्ञा कीं, राजश्री फतेसिंगबावा यासी पत्रे पाठविलीं तीं येकांतीं देणें, दुसरे न दाखवणे. त्याप्रमाणें येकांतीं पत्रें दिलीं. वाचून पाहून सेवकापासीं दिलीं. त्याचीं उतरें बावासाहेबीं स्वदस्तुरें लिहून पाठविलीं आहेत त्यावरून विदित होईल. राजश्री विठलराव फौजसहवर्तमान त्या प्रांतीं पाठविले म्हणून आज्ञा. त्यास ते यावयाचे अगोदर आपाजी प्रभूचे सिष्टक्रत दर्याबाईनी केले. आपाजी

प्रभू पळोन धरासिवासमीप आले. आपाजीचें वर्तमान, युध्य झालें तें तपासिलवार सेवेसीं लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. जासूदजोडी रवाना केली होती ती सांड आली. मग येक रोज सांडणीस्वार येथें राहिला. आपाजी प्रभु आजी लस्करास येणार. आणावयासी गोरखोजी भापकर व विराफ गेले आहेत. इमानप्रमाण देऊन आले आहेत. प्रस्तुत मुकाम बावाचा तुळजापुरापासून उत्तरेस आठा कोसावर आहे. फौज याची दोनआडीच हजार व आपाजी दोन हजार येकूण लाहानथोर पांच हजार जाहेत. दर्याबाईकडे राजकारण लाविलें आहे. हती नगारे द्यावे म्हणतात. दर्याबाईकडून येमाजीपंत व भले माणूस आले आहेत. काय बोली होईल ती सेवेसी लिहून पाठवितों. स्वामीचे आगमन गंगातीरास जालें म्हणजे आज्ञापत्र आलियावर बाबासाहेबासी फौजसुधां घेऊन येतों. हे तयार आहेत. हिजायेत मोहिदीखानाकडे आजी कारकून रवाना केला आहे, त्याचें काय वर्तमान येईल तें लिहून पाठवितों. सेवेसी श्रुत होय. राजश्री हैबतराव जाधव यानीं सेवेसी विनंती लिहिली आहे ती चित्तांत आणून त्याप्रमाणें उत्तरे पाठवावी व हैबतरायाविसीं बावास लिहावें, हें स्वामीचे पदरचे आहेत, दुसरा अर्थ नाही. बावासी पत्र पाठवावें. स्वामीचें पत्र आलें म्हणजे त्याचें बावा चालवायासी अंतर करणार नाहीं. बावासाहेबाचा विचार स्वामीखेरीज किमपि नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Shankraji Ram hands over the Peshwa's confidential despatches to Fatesing Bhonsle and supplies news about the movements of Apaji Prabhu.*

---

*No. 155*] *[22-1-1751*

पौ छ ७ माहे रबिलोवल

**श्री**

**श्रीमंत माहाराज आईसाहेब साहेबाचे**

**सेवेसी**

आज्ञाधारक येसवतराव वोलेकर विनंती. येथील क्षेम ता छ ५ रबिलावलपावतो सेवकाचे वर्तमान येथास्थित आसे. किले मिरजेत साहेबाचे आज्ञेवरून चाकरी करीत होतो. त्यास रा सिवजी डुबलान आमचा गाव ठेवला. चाकरी कैसी करावी? बेकइदी वर्तणूक करू लागला. आमचा विलाज काये आहे? आम्हास कोणाचा आधार नाही. आम्हास बाहीर पोट भरावयास काही कमी नाही, परतु हुजरचे चाकर म्हणून चाकरीस किलेस जावे. रा सिवाजी दुबलान

दरवाजे मना केले. आम्ही रागे उठोन गेलो. साहेबास कळावे म्हणून लिहिले असे. सर्व मजकूर राजश्री सिवबा खांडेकर यास सांगितला आहे. ते विनंती करिता विदित होईल. बहुत लेव्हवेस नाही हे विज्ञापना.

¶*Yeshvantrao Wolekar complains to Tarabai against one Shivaji Dubal who ejected him from his village and prevented him from rendering loyal services to her.*

---

*No. 156*] [*29-2-1748*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेशी**

विनंती. सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक साष्टांग दंडवत प्रणाम विज्ञापना. स्वामीचे कृपादृष्टीकडून ताा छ ११ रबिलावलपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. वडगांवचे मुकामीहून सविस्तर वर्तमान सेवेशी लिहिले आहे. आलीकडे राजश्री स्वामी व धनीन व मुरारराव देखील करविरास येऊन फाल्गुण शुध सतमीस मुराररराव स्वार होऊन तलंदग्याचे मुकामास लस्करांत गेले. त्यांचे अडमुदे बहुतच होते त्यांत कांही जाले कांही नाहीं. उभयपक्षीं सौरस्य राहिला न राहिला असें होऊन गेले. कागदपत्र अद्याप त्यांचे हातास गेले नाहीत. कारकून येथें आहेत. याउपरी त्यांकडे कागदपत्र कोणकोणते जातात, काय मजकूर होतो तो समग्र मागाहून सेवेशी लिहून पाठवितों, अगर निरोप घेऊन स्वार होऊन येतो. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji reports that the relations between Murarrao and the Chief of Kolhapur have been strained to the breaking point and that he had left Kolhapur. (See No. 24 above.)*

---

*No. 157*] [*7-2-1751*

पौ छ २६ रबिलोवल

**श्री**

श्रीमन्माहाराज मातुश्री आईसाहेब साहेबांचे सेवेसी विनंती. सेवक उदाजी चवाण हिमतबाहादर ममलकतमदार कृतानेक दंडवत विज्ञापना. ताा छ २१ रबिलोवलपावेतों साहेबांच्या कृपावलोकनेकडून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. साहेबीं सेवकावर कृपाळू होऊन आज्ञापत्र सादर केले ते मस्तकी वंदून सनाथ जाहलों. सिवाजी खांडेकर याबाा संकेत सांगोन पाठविला तो

आज्ञेप्रमाणे यानी सांगितला येशियास सेवक आज्ञाधारक असों. साहेबी आज्ञा केली त्याचप्रमाणें विच्यार होईल. येविषईचा अर्थ कितेक सिवाजी खांडेकर यांजवल सांगितला आहे. सेवेसी येऊन विनंती करितील त्याजवरून श्रुत होईल. सेवकास साहेबाच्या पायाखेरीज दुसरें देवत नाही. सेवेसी श्रुत होय हे[+] विज्ञापना.

¶*Udaji Chavan expresses his readiness to serve Tarabai, and execute her orders.*

---

*No. 158*] [*8-2-1751*

**श्री**

श्रीमंत राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी

पोष्य गोविंद खंडराव कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २२ राावल प्रथम प्रहरपर्यंत स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. स्वामीनी आज्ञापत्र सादर केले ते आजच प्रातःकाली पावले. लेखनार्थ अवगत जाला. राजश्री बाबा यांजकडील वर्तमान ल्याहावयाविसी आज्ञा केली. ऐशियास मारनिले पुण्यास आल्यापासून त्याणी पत्र येकहि आम्हास पाठविले नाही व आम्हीहि त्यास लिहिले नाही. हे स्वामीस अन्यथा वाटेलच, परंतु निशा मानावी, उदास बहुत आहेत. काही मात्र देखील कलत नाही. स्वामीची आज्ञा आलियाउपर लेहून पाठवितों. उतर येईल ते लिहून पाठवीन. त्यास आम्हास स्वामीच्या पायासिवाय दुसरें आहे असे नाही. वरकड येथील वर्तमान राजश्री नानानी वरचेवरी सविस्तर लिहिले आहे त्याजवरून विदित होईल. सातारियाचा शंशये सेवकाचा बहुत होता, लेहून पाठवीत होतों, प्रत्ययास येत नव्हते तें दादोबा आलियावर आले किंवा अद्यापिहि आहे ते आज्ञा करावी. सेवकास स्वामीविना त्रैलोक्यात दुसरा आधार नाही, हे निशा असो द्यावी. पुढें जसी आज्ञा होईल तसी वर्तणूक करून. हुजूर यावयाची आज्ञा होताच ते क्षणी स्वार होऊन सेवेसी येतो. आम्हा सेवक लोकाचा काही गुंता नाही. जेथे स्वामी ठेवितील, जे सेवा सांगतील ते करू. स्वामीने दूरंदेशीने सकलहि ध्यानात आणून उचितानुचित पाहून कर्तव्य ते करावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Khanderao Chitnis assures Sadashivrao of his loyalty after trying to remove any suspicion lurking in his mind regarding the writer's conduct at Satara.*

---

+ अक्षरें बाळबोधींत.

No. 159] [9-2-1751

**श्री.**

श्रीमंत माहाराज राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक त्रिंबकराव गिरमाजी कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल छ २३ रबिलौवलपावेतो स्वामीचे कृपाकटाक्षावलोकने सावनुरी सुखरूप आसो विशेष. स्वामीनी आम्हास आज्ञापत्र सादर केले पाहिजे कीं तुम्हास जाऊन बहुत दिवस जाहाले. आद्याप आबदुल मजीदखान यानी चौ सालाचा यैवज देऊन रवाना केले नाही. काये समजले आहेत? रुपया कांहीं सुटणार नाही. तहनामा लिहून दिल्हावरी हैगै करणे त्यास उचित नव्हे. याजकरिता नवाबास समजाऊन पैक्याचा निकाल क(रण्यास) जर दिरंग करितील तरी श्नेह परिछिन राहणार नाही मणून लिहिलियां ते पत्र रुबरू देऊन काम सरकारचे करून घेऊ. यैसे लिहिलिया वेगले बल पोहंचत नाही. सिवराव यास पत्र कीं पांचसात वेला बलाऊन पाठविले, परंतु तुमचे येणे न जाहाले. आद्याप सरकारचा यैवज देऊन त्रिंबकराव यास रवाना केले नाही. तुम्ही नवाबास समजावीत नाहीत. बरे रुपया कांहीं सुटणार नाही. सांप्रत लौकरी यैवज चौ सालाचा पाठऊन देणे. तुम्ही सरकारचे रुपये तीन हजार घेतले ते पांच वर्षे जाहाली. त्रिंबकराव याजबराबरी पत्र लिहिले होते. आद्याप रुपये पाठविले नाहीत. आपूर्व आहे. देखतपत्र त्रिंबकराव याचे स्वाधीन कर्जाचे रुपये करणे नाही तरी हुजूर येणे. धातुपोषणार्थ मात्र लिहिता परंतु कृत्रिमास चुकत नाहीत मणून दबकाऊन लिहिले पाहिजे. आम्हास या प्रकारे न ल्याहावें की तुम्ही या प्रकारे ल्याहावे मणून विनंति लिहिली त्याप्रा पत्रे पाठविली आहेत. कदाचित ते पत्रे यास दाखवावी लागताहेत तेव्हा हे मणतील कीं इतकी बातमी त्रिंबकराव लिहून जबरदस्तीने पत्रे आणविताहेत मणतील, व येशवंतराव महिमाजी याजकडे अठरा हजार रुपये आहेत ते त्याजपासून बिलांकसूर[1] घेणे मणून लिहिलिया निकट करून घेऊ. येथे नवाबासहि पत्र पाहिजे कीं त्रिंबकरायास लौकरी चौ साला यैवज देऊन सिवराव यास व त्रिंबकरायास रवाना करणे. येथे कांहीं ताल राहिला नाही. हजार बारासे तटें आहेत. आवाई दोन हजार फौज आहे मणून तलब[2] फारच चढली आहे. नासरजंगास मारिले. बहिरंगे गर्वहि फार जाहाला आहे. आपल्यापुढे कोणी मानीत नाही. सिवराव खुष्यामतीच्या गोष्टी लिहित आसेल, परंतु काही सरकारचे कामाच्या नाहीत. धातुपोषण लिहितो. आम्हास पत्र की तीन हजार रुपये सिवराव याजपासून अगत्य घेणे. तेणेकरितां

---

१ बिला – कसूर = हयगय न करितां. २ तलब = बाकी.

सरकारचे कामात कुच्यांद्य करणार नाही. नाही तरी बहुत निंदा करीत असतो. तिकडेस येत नाही. संभाजी माहाराज यानी जिला कोणत्या प्रकारे दिल्हा तो न कले. वरचेवरी कुचोद्याची व फितव्याची पत्रे येतात की श्रीमंतास कांही जिला दिल्हा नाही. आपल्या वकिलाकडे कगार आमल आहे मणून लिहिलिया वल कसे पोहचते? मातुश्री ताराबाईसाहेबासी व स्वामीसी विरोध आहे. फौज कांही इकडे येत नाही हे स्पष्ट समजले आहेत. फौज आलियावरी पाहून घेऊ. मागे बाबूजी नाईकाचे रुपये बुडविले त्यास कोणी काये केले? त्याचप्रो हेहि करू मणून गर्व करिताहेत. तथापि सिवरायाचे स्वाधीन कांही नाही. बखषी आबदुल कादीरखान मणून प्रबल आहे त्याजला येक पारसी पत्र आगत्य पाठविले पाहिजे, कीं सरकारचे कामात त्रिंबकराव आहेत हे ज्या प्रकारे सांगतील त्याप्रो नवाबास सांगून येवज बाकीचा पाठवीत व तुमचे मारफतीने उभये पक्षी श्नेह राहे तो विचार करणे मणून लिहिले पाहिजे. तेणेकरिता सरकारचे काम अगत्य करून होईल. याप्रो सर्व पत्र या कासिदाबाो पाठविलिया वल पोहचते. बहुत काये लिहिणे हे विज्ञापना.

¶*Trimbakrao Girmaji writes to Bhausaheb that the Nawab of Savnur is evading payment of tribute due from him as reports of grave differences and a clash between the Peshwa and Tarabai have reached him.*

---

*No. 160*] [*22-2-1751*

**श्री**

शेवेसी साष्टांग नमस्कार विनंती. छ ६ रबिलाखर शुक्रवार प्रहर रात्र येथास्थित असे विशेष. करवीरास खंडोजी पवार, इभराम पाठविले होते, तेथें साहा रोज नेहमी होते. तेथें बातमी ज्याप्रकारें घेणें तशी घेतली. त्यास काली गुरुवार सकाळचे प्रहरदिवसपर्यंत करवीरवासी ठिकाणींच आहेत. तेथील मजकूर तरी गडबड बहुतशी आहे. जमावपैकीं आहे तोच शेंपनास स्वार दोन अडीचशें प्यादा आहे. बंदोबस्ती बहुतशी केली आहे. परकीय माणूस जाऊं येऊं देत नाहीं. झाडाझडती चौकीशीनें करितात. राजश्री पेशवे याजकडील कारकून तेथें आहेत; जासूद जोड्या तीन आहेत, त्यास एकीकडे ठेविले आहेत. मातुश्री कडील व राजश्री दादाकडील कारकून जासूद नेहेमी आहेत. वरचेवर मातुश्री

व दादाची पत्रें येणें म्हणून जातात. पेशवे याजकडील दोन्ही सांडी[1] गेल्या होत्या जे उतावली न करणें; विचारेंकरून आपलें आगमानाचें केलें जाईल. त्यास सांडवालेस रुपये बारा देऊन लाऊन दिल्हे. त्यावरी कारकून गेला आहे. त्यास म्हणतात जे तुम्ही न्याल तैसे येऊं, यैसें अनुसंधान राखिलें आहे. मातुश्री व दादा यांस उत्तर पाठविलें जे येक वेळ आलों त्याचा परिणाम काय लागला ? यसें असतां या म्हणतां तरी वरील ग्रहस्ताचा निर्वाह केला म्हणजे येतों. यैसा मजकूर आहे. त्यास पेशवे यांचें अनुसंधान बरें असिलें आणि विश्वास देतील तरी त्याजकडे जावें अगर पर्वतावरील ग्रहस्थाचा निर्वाह केला तरी पर्वतास जावें यैसा निश्चय आहे. पर्वतावरी जाणें जालें तरी रात्रीचे करवीराहून कोकरुडास यावें, तेथून कालेंकर येशवंतराव यास सामील होणें, म्हणोन दादाची आज्ञा आहे. त्याणी सामील होऊन खलें गुंडेवरून पाटणास जावें. मावळे वगैरे लोक पुढें पाठऊन पालीस न्यावें, तेथून पर्वतास जावें. दुसरी वाट तलेसिंगास जावें. तिकडून इटेवरून दहापांचानशीं पर्वतास जावें. त्यास येक बातमी आहे जे, आजी शुक्रवारी निघावें. आजी निघाले नाहींत तरी पूर्णिमेचे दिवशीं निघोन यावें यैसा करार आहे. त्यास तेथील ग्रहस्थानें जिवाळेनें सांगितलें कीं पेशवे-कडील सत्वर जिव्हाला लागला म्हणजे पर्वतावरी जात नाहींत. आणि तिकडील अनमा(न) जाहाला तरी आणि वरील ग्रहस्थास समात केला म्हणजे पर्वतावरी जावें, त्यास वरील ग्रहस्त समाप्त जाहाल्याविना करवीर सोडीत नाहींत. त्यास पूर्णिमेअलाकडे जात नाहींत. पूर्णिमेपासून शष्टीपर्यंत पांच दिवस शिमगेमध्यें हालचाल नसतां रातबिरात यकादोघानशीं जावें यैसा मजकूर आहे. विदित जालें पाहिजे. सौभाग्येवती मातुश्री बाईसाहेब तोरगलाहून करवीरास येत होती. मार्गीं भोजेस गोसावी यांचा वाडा आहे त्यांणीं आंत घेतलें नाहीं. याकरितां राजश्री मानाजी पायगुडे यांस सांगोन भोजेस वेढा घातला. करवीराहून दोनशें प्यादे येक भांडें रवाना केलें आहे. यानंतर पर्वतावरील निर्वाह जाल्यास करवीरवासी येतात हा निश्चय. त्यास राजश्री पेशवे याजकडून अनुसंधान करून आणिल्यास उत्तम आहे यैसें दिसतें. गडावरील मातुश्रीचें व दादाचें पत्रें रोज जातात येताआहेत. विदित जालें पाहिजे. मागती माणसें बातमीस रवाना केलीं आहेत हे विनंती.

¶*News-letter to the Peshwa, forwarding information obtained by special messengers from Kolhapur about the intention of king Sambhaji and his Rani Jijabai to proceed either to Satara or to the Peshwa if the latter would conciliate them.*

---

१ सांडणीस्वार.

No. 161] [24-2-1751

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक बनाजी माधवराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ ८ माहे रबिलाखर मंदवार पावेतों कृपावलोकनें जाणून स्वानंदातिशय लेखानाज्ञा केली पाहिजे विशेष. छ ३ माहे मिनहूस सोमवारी दो प्रहरा राजश्री बापूजी बाजीराव यांचें व दमाजी गायेकवाड यांचें युध झालें खानदेशांतूनहि पत्र आलें. बजिनस नसिरजंगाचें हरकारेही बातमीचे पाहून आले, त्यांनीं जुबानी सांगितलें. सेवक दरबारी आसतां साता कोसाचे अंतर होतें. बापू बहादुरपुऱ्यावर होते. गायेकवाड गांधेलीवर होते तेही चाळून आले. हेही गेले. दरम्यान चौ कोसावर लढाई जाली. जुज मोठे जालें. सोनजी भापकर व त्याचा भाऊ त्याचें नांव जासुदास विदित नाहीं, ऐसे उभयतां कामास आले. आधीं भाऊ कामास आला त्यास काढावयास सोनजी उभा राहिला तोही कामास आला. जंगाचा प्रसंग असा जाला कीं जगजीवन पवार यानें तरतूद केली. जितके आराबा व कांहीं जेजायेला वगैरे दारूचें सामान खराबा करून त्याचा थाट मागें रचिला, त्याजमागें रचिला, त्याजमागें फौज उभी केली, आपण दोनी हजारानसीं पुढें आला. दिखाई दिल्ही. थोडी फौज आहे म्हणून, आमचेही फौजेनें चाळून घेतलें. काढावा काढून आपण त्या आराबिया मागें जाऊन राहिला. बापूच्या फौजेत मार आराबियाची फार जाली. तेथेंच हा प्रसंग उभयतांचा जाला. मग सरमिसल जाली. दादूखान कोण्हीकडे गेले ठिकाण लागत नाहीं. इतकियांत महिपतराव कवडे यांजकडे खंडेराव गायकवाडानें चालून घेतलें तेथेंही झोंटधरणी बरीच जाली, मोठी फौजेचे जोरें यांस उचललेंच होतें, परंतु स्वामीचे पुण्य प्रताप त्याचे मस्तकीं, म्हणून खंडेराव गायकवाडास जखमा तारवरेच्या भारी लागल्या. येक खांद्यावरही भारीच आहे. दुसरी पाठीवर दोन्ही घाव मातबरच, याजमुळें पालखीत घालून नेऊन जखमा सेखिल्या. वांचणें कठिण आहे, यैसें जासूद सांगत होते. तेव्हां माघारे आमची फौज बहादुरपुऱ्यास आली. दमाजीही गोंधळीवर गेला. दोघेही कायम राहिले. आणखी येक जुज होईल यैसेही म्हणत होते. आज आम्हांकडीलहि जोड्या येतील. सविस्तर लिहून पाठऊं. तूर्त आलें वर्तमान लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*News-letter from Banaji Madhavrao, giving a graphic account of the encounter between Bapuji Bajirao and Damaji Gaikwad's forces at Bahadurpura in Khandesh.*

3417

No. 162] [31-3-1748

श्री

श्रीमंत राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशी

विनंती. सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक विज्ञापना. स्वामींचे कृपादृष्टीकडून सेवकाचे वर्तमान ताा छ १२ रबिलाखरपर्यंत यथास्थित असे. छ ६ रबिलाखरचीं पत्रें छ १० रोा प्रविष्ट जालीं. आज्ञेप्रमाणें येथील रंग राखोन निरोप घेऊन स्वार होऊन येतो. सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेबीं जोडी पाठविली आहे ते आल्याविितिरिक्त सेवकास निरोप देत नाहींत. याकरितां ते जोडी सत्वर येई ते आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. राा मुराररराव तेरदल जमखिंडी प्रांते गेले. बाईसाहेब वडगावांस गेलीं. उदईक देवाचे डोंगरास जाऊन परवां येथें येणार. वरकड या प्रांतीचें वर्तमान सर्व यथास्थितच आहे. कतब्याचे मजकुरास उतर देतात कीं मामलियत श्रीमंतास सुटत नाहीं, तेव्हां कतब्याची वहिवाटहि त्यांसच करावी लागते. त्यांखेरीज आम्हांस दुसरा अवलंब आहे यैसे नाहीं यैसे बोलतात. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The departure of Murarrao Ghorpade to Terdal and of Jijabai to Vadgaon is reported to Bhausaheb by Ramchandra Bawaji himself proposing to return.*

---

No. 163] [2-3-1751

श्री

श्रीमंत राजश्री नाना
स्वामीचे सेवेसी

सेवक हरि राम कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल छ १४ रबिलाखर जाणून स्वानंदलेखन करीत गेलें पाहिजे. यानंतर स्वामीनी पत्र पाठविलें तें पावलें. मातुश्री ताराबाई याणी करविरी संदर्भ लाविला आहे. राजेश्री संभाजी राजे आलेवर मनसबेस विपर्यास पडतो येविसी तुम्ही व राजश्री मानाजी पायगुडे मिलोन त्यांचे येणें न होय यैसेंच करावें. मावले लोक कुमकेस येत होते तेही मारिले. या उपरी तिकडील बंदोबस्त कलेल तैसा करावा म्हणोन लिहिलें. अशास येविसीं पेशजी आपणाकडून पत्रें आलीं त्यावरून आम्ही भोजवर येऊन राहिलों. गांवावर हल्ला केली. गांव जेर जाला. आंतील येऊन बोलतात. आजउद्यांमध्यें गढी हस्तगत होईल. करवीरवासी याचा पैगाम आहे. कांहीं ममता राखोन त्यास हा गांव घेऊन देतों आणि अंतस्थेहि त्याचे विचारांत आहों. लक्ष प्रकारें त्याचें आगमन तिकडे न होय यैसे आहे.

आपण इकडील काळजी न करावी. तिकडील बंदोबस्त करणे तो करावा. वरकड मागून वर्तमान लेहून पाठवितों. कळलें पाहिजे. अंतर्स्थें व लौकिक पदार्थें बातमीत आहों. आपण स्वस्त असावें. आम्हांस आज्ञा होईल तेणेंप्रमाणें वर्तणूक करूं. विदित होय हे विनंती.

¶*Hari Ram promises the Peshwa to try his best to prevent Sambhaji of Kolhapur from proceeding to Satara whither he has been persuaded to march by Tarabai.*

---

*No. 164*] [*16-3-1751*

श्री

सेवेसी विज्ञापना. चितापुरचे वर्तमान. आपली आज्ञा घेऊन शेणकरीमध्यें मुकाम केला. काल रविवारीं चितापुरास जावें तो उदबाच्या विचारें येकाकी शहास न गुंतावे, पुढील उदेग भारी आहे, याकरिता कमरवाडी आडीच कोस नाला आहे तेथे मुकाम केला. संध्याकाळी रताजी चव्हाण आलियावर सव्या फौजा उदबानी आमची फौज (फाटलें) गमे देऊन संध्याकाळीं (फाटलें) पावले. रा। जोत्याजीराव पाटणकर यास त्यांनीं बलाविलें. समागमे रा। आपाजीराम देऊन पाठवले, त्यास भेटून करार केला कीं आपण भेटतों, मामलत विल्हे लाववणें. त्यावरी राजश्री उदाजी चव्हाण यानीं सांगून पाठविले कीं, श्रीमंतास पत्र पाठऊन आजचा दिवस मुकाम कोतों[1] करून मालगती संकर-वाडीवर मुकाम करावा. पाणी कागना नदीवरी आहे. तेथून भीमा तीन कोस राहती. आजचा दिवस तेथें मुकाम केलियास हे मातबर बसून कार्य सत्वर होऊन येईल, याजकरितां मालगतीवर मुकाम करावा, तेथून चारकोस कोळीरावर आपला तर सात कोस मजल पडेल, चितापूर पुढें दोन कोस राहील, सेहोंने[2] काम होईल. उदाजी चव्हाण समागमेच येतील. त्याचा हेत समागमे न यावें, थोडीबहुत तूर्त * * (उस्तवारी) (फाटलें) करावी, आपणाखेरीज (फाटलें) गत नाहीं, ऐसे म्हणतात. परंतु तूर्त मुकाम मालगतीचा कागना-नदी आहे तेथें करावा. आम्ही फौज दिल्हीं आम्हास जातां नये. तीर्थरूप रा। आबाजीपंत दादाचे वर्तमान काल स्वामीस लिहिलें आहे. जुजात राहिले. दोन दिवस ठिकाण नवते. मग सापडले. ऐसी इश्वरें गोष्ट आम्हावर मोठा कहरच केला. बरें स्वामिकार्यावर अन्न खाले त्याचा सेवट केला. परंतु वर्तमान कोण्हेही लिहिलें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The whole letter, in autograph by Vithal Shivdeo, to the Peshwa, reports his own movements towards Chitapur in the Karnatak and the death of his elder brother Abajipant in an action (with Damaji Gaikwad near Satara).*

---

१ लहान. २ शहाने.

No. 165] [17-3-1751

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री नाना व तथा**
**श्रीमंत भाऊ स्वामीचे सेवेसीं**

विनंति. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागायत छ २९ रबिलाखरपर्यंत स्वामीचे कृपेंकरून सुखरूप असो विशेष. आज शनवारीं संध्याकालीं राजश्री बावास राजश्री नानाचें पत्र सातारियाहून आलें कीं गायकवाडाची आमची गाठ पडली. जूज जालें. वेणेच्या माथ्यावर आलीकडे गाठ पडली. जूज होत नदीपर्यंत गेलों, तेथें त्याचा मोड जाला. पळून शहरांत गेला. पालख्या वगैरे लुटून पस्त केला. म्हणून पत्र आलें, त्याची नकल पाठविली असे. संतोषाचें वर्तमान स्वामीस कलावें म्हणून लिहिलें असे. या उपरी तो हिरमोड जाला, तेथें कोंडला. इतक्यांत ताबडतोड जर या प्रांती लौकर स्वामीचे येणे होतें, तर जितक्यानी कुर्फराणे[1] केलें तितक्यानीं फजित पाऊन स्वामीस शरण आले यैसें होईल; आणि सर्व मनसबा सिधीस जाईल. परंतु या प्रसंगीं इकडे येणें फारसें उपयोगांत पडेल. इतके दिवसांत तिकडीलही सर्व मनसबा उलगडलाच असेल. तर लौकर यावें उचित असे. तेथून सविस्तर लिहून आल्यानंतर सविस्तर वृत्त लिहून पाठऊं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति.

¶*Trimbakrao Vishvanath to the Peshwa from Poona, reporting the defeat of Damaji Gaikwad on the banks of the Venya.*

---

No. 166] [19-3-1751

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

विनंती. सेवक बनाजी माधवराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ २ माहे जमादिलौवलपावतों कृपावलोकनें जाणून स्वानंद-लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. छ १६ माहे जमादिलाखेर[2]चें आज्ञापत्र पाठविलें व थैल्या दिलीच्या पाठविल्या त्या पावल्या. दमाजी गायेकवाडाकडील वर्तमान तर दमाजी मजल दरमजल सातार्‍यास जावयानिमित्य जेजुरीस उजवी टाकून निरे-पर्यंत गेला. राजश्री बापूजी बाजीरावही फौजे सुद्धां कर्‍हेवर राहिले. यांस त्यांस

---

१ फितवे. २ रबिलाखर असावें.

[ फाटलें पत्राचे मागील बाजूवरील मजकूर. ] आठा दाहा कोशीं खालीं जालें. सर्व लोक जिकडे जिकडे थांगे[1] होते तिकडे गेले. सरकारचा तालुका वगैरे सिंव्हगडास गेला. लोकही काहीं अगत्य अगत्य गेले. सारांश पुण्यांत घरास येक दोघें माणसें राहिलीं आहेत. पुणें झांबडावेसें गायेकवाडाचें चित्तांत होतें. इतकियांत पिलाजी जाधवराऊ जाऊन त्यास हें कर्म योग्य नाहीं म्हणून सांगून फिरविलें, ऐसें जासुद जबानीं सांगत होते. राजश्री बावांनीं आपले कबिले पुरंधराकडे पाठविले. आपणही जेरीदे[2] आहेत. पुण्याकडील शह वारून पुढें लष्कर गेलें. इतकें वर्तमान कळावें म्हणून लिहिलें आहे. फौज कोण्ही मन:पूर्वक बापूचे आज्ञेंत वर्तत नाही; पुढें जें होईल तें सेवेसी लिहून पाठऊं. बहुत काय लिहिणें कृपा निरंतर असूं दिधली पाहिजे हे विनंती. येथून आठ दाहा जोड्या पुण्यास गेल्या आहेत. परंतु वर्तमान कोण्ही लिहीत नाहींत.

¶*News-letter of Banaji Madhav, the Peshwa's agent at Aurangabad, reporting what he had heard of Damaji's doings in the Deccan.*

---

*No. 167*] [*22-3-1751*

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसीं

विनंति. सेवक बनाजी माधवराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ ५ माहे जमादिलावल शुक्रवारपावेतों कृपावलोकनें जाणून स्वानंदातिशय लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. आलीकडे स्वामीकडील आज्ञापत्र येत नाहीं. इकडून जालें वर्तमान वरचेवर सेवेसीं लिहिलें आहे. सांप्रत वर्तमान आलें कीं छ २९ माहे रबिलाखरीं सातारियानजिक वेणेवर म्हसव्यापासीं गायेकवाड जाऊन राहिला. आपली फौज राजश्री नाना व बापू वगैरे वडुथापासीं राहिले होते तिकडूनही चालून आले, इकडून हेही गेले. लडाई बरी जाली. उठावणी च्यान्हे तर्फेनें बरीच जाली. महिपतराव कवडे याजला दमाजीनें उचलिलें होतें. इतकियांत श्रीमंताचे प्रतापें सेनापतीकडे दाटी होताच सेनापतीनें पळ काढिला. ते समंई कोण्हाच्यानें धर धरवला नाहीं. तेव्हां गायेकवाडसुधां जगजीवन पवार, खंडेराव गायकवाड आदीकरून सर्व पळूं लागले. आपले फौजेने मोडून त्यांस सातारियांत घातलें. उभय पक्षीं लोकही

---

१ थांगे = जागा. २ जरिदे = सडे.

बहुत जायां जाले. सारांश फत्ते श्रीमंताच्या प्रतापें आपली जाली. मातुश्री आईसाहेबही किल्यावरून अवलोकन करीत आसतीलच! रुबरू निशा श्रींनें बरीच केली!! हें वर्तमान बातमीचें जासुदाबरोबर नसिरजंगास आलें व आमचेहि जासूद आले. नसिरजंग बहुत संतोषी जाले. बहुत खुषबख्ती मानिली. जे कोण्ही आश्रित कोठींत असतील त्यांची संतोषाची सीमा नाहीं. आसो. इत:पर स्वामीनीही तिकडील प्रसंग उरकून इकडे यावयाचा विचार केला असेलच. यद्यपि लडाई जाली, हिरमोडही जाला तथाप येक दोन वेल बरीच लडाई होईल. गमाजीपंत येमाजीपंताचा पुत्र त्यानें तीन हजार फौज व पायेदल दोन हजार मेलविलें आहे. बतिससिरालेयाकडे गमाजीचा कारभारी आहे त्यानेंहि हजार फौज जमा केली आहे, व मुरारजी घोरपडा मिरज प्रांती पांचा साता हजारानसीं आला आहे यैसेंहि वर्तमान आहे. तथाप गमाजीची फौज जवळ आहे. येकादों दिवसांत सातारियास दाखल होणार यैसें वर्तमान होतें. तेही त्यांत सामील जाले व आमची फौज बाहेर आहे तिनें वांसलकडी व अजुखो[१] बंद केलाच असेल. ते सातारियांत उदक प्राशनास मिलत नाहीं तेथें पंधरा वीस हजार फौजेचा गुजरान कसा होईल? याजमुलें वाटतें कीं लढाई होईल. जरी जाली तरी फत्ते श्रीमंताकडे ईश्वरें नेमिली आहे. यतो धर्मस्ततो जय:. कलियुगीं स्वामी मूर्तिमंत धर्मावतार आहेत. बहुत सद्ब्राम्हणांचे आसीर्वाद स्वामीचे सहाय आहेत. म्हणून बुधीचा निश्चय यैसाच आस्मादिकांचा जाला आहे. पुढें जें होईल तें लिहून पाठऊं. परभारेंहि स्वामीकडे वर्तमान येतच असेल. आलीकडे दिली-कडील आथवा राजश्री मल्हारजी होलकरांकडील कांहीं आलें नाहीं. येतांच लिहून पाठवितों. बादशाहा बेगमेची थैली उत्तराची पाठविली आहे. आंबिकाबाई जाधव त्यानींही पत्र लिहिलें आहे तेंही पाठविलें आहे. समय आहे. पुत्राचे मनसबेविषईं स्मरणार्थ लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें. कृपा निरंतर आसूं दिधली पाहिजे हे विज्ञापना.

¶*News-letter by Banaji Madhav from Aurangabad to the Peshwa, describing the feelings of gratification when news was received of Damaji Gaikwad's defeat by the Peshwa's forces.*

---

*No. 168*] [*24-3-1751*

ताराबाईनीं कांहीं राहिली वस्तभाव आणावयास हत्ती दिधले. कांहीं सध्या खर्चासहि दिधले, व दादोबा भेटीस आले. बहुत प्रकारें समाधान केले. प्रति-पदेस आपले लष्कर वेण्यावर आले. लष्करांत आलो. पुनियास वर्तमान लिहिले.

---

१ अजुखा ? अजुदा ?

मागती स्वारी करून आपले लोक आले होते, ते दिवशीं कांहीं कांहीं जुज जाले. खायेम येहि राहिले. आपले लोक मागें परतोन वेण्येवर गेले. मागती स्वारी करून आले ते दिवशीं खासी राजहुजुरात जुजली. इकडील तिकडील माणूस जखमी जाले, नामांकित बुऱ्हानजी मोहेते याजला कपालावर जखम गोलीची लागली. आनखीही नामांकित लोक जखमी जाले. आपली फौज परतोन वेण्येच्या तलावर राहिली. आनखी मजकूर शेनापतीकडे कांहीं कारभार विचार नाहीं. भक्षावयास गाईकवाड देतो. तलेगांवीं नित्याचे आनकूल पडत नव्हतें. त्याजपरीस येथें घोडी व लोक व बारगीर स्वस्त आहेत. कारभार विचार तितका मल्हार गोविंद, गाईकवाड व ताराबाई विचारांत आहेत. सिरके व मोहिते व गाईकवाड एके विचारे आहेत. कांहीं दारूगोळा आंगरियाकडील आली व लोकही शेदोनसे पावेतो आले. राजद्वारचे वर्तमान कीं शेनापती घोरपडियास द्यावी, सरलष्कर आनखी कोन्हास द्यावे, खासखेल दाभाडियास द्यावी, हा राजकी मजकूर. गडावर गाईकवाड गेला नाहीं व शेनापतीही गेला नाहीं. मल्हार गोविंद व धोंडो मल्हार उभयेता मिलोन गेले होते. याजला सांगितले कीं गाईकवाडास सांगणें कीं तुम्ही होऊन जुजास न जाणे, ते आलियावर महार-दरियाबाहेर येकरूप[1] न निघनें. आषाढ श्रावणमासपावेतों निसूर[2] राहने. तुम्हास पोटासहि देत जाऊं, हा विचार आहे. जुजाचे दिवशीं शेनापतीस दमाजी आवाच्य भाषन केले होते. धारण तीन पायलिया जोंधले व सजगुरे ( बाजरी ) आडीच, कडबा चालीस पेंढिया पावेतो आहे. गांवांतून लोकास उपद्रव गाईकवाडाचा आहे. बाहेर आपलिया फौजेचा उपद्रव रयेतीस आहे. चैत्र श्रुा ९ नवमीपासून ताकीद जाली आहे. गाईकवाड कांहीं श्रीमंत आलिया-वेगला कांहीं भेटीचा प्रसंग करीत नाहीं. हा विचार प्रसंगी आहे. पुढें ही प्रसंगी वर्तमान होईल ते शेवेशी लिहीन. बहुत काये लिहिणे हे विज्ञापना.

शेनापती तो काहीं कारभार प्रसंगांत नाहींत. बेफिकीर आहेत. येऊन पस्तावी पडलो हे मानितात. परंतु पोटाच्या योगेंकरून बेफिकीर आहेत. तमाम असबाब हत्ती व आरब पायेदल तलेगांवीं आहेत हे विज्ञापना.

¶*A fragmentary letter reporting Damaji Gaikwad's entry into Satara, the situation of the Senapati and the plans of Tarabai.*

---

१ यकरूप = एकंदर, बिलकूल. २ स्वस्थ.

No. 169] [28-3-1751

**श्री.**

सेवेसी तुबाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता। छ ११ जमादिलावल गुरुवारपर्यंत स्वामीच्या कृपावलोकनेकरून येथास्थित असे विज्ञापना. काली सेवेसी स्वारांबरोबर यांच्या कराराचीं पत्रे लिहिली होती त्यावरून निवेदन जालें असेल. आजी सा घटका रात्रीं यांचा कुचाचा नगारा जाला. त्याउपरी सा घटका दिवसा रव[1] पडली. आजीचा मुकाम रायेचुरा अलीकडे * * कोसावरी आहे, तेथें मुकाम आहे. उदईक कृष्णेअलीकडे चौ कोसावरी मुकाम नेमिला आहे. येथें मातुश्री आईसाहेबांच्या व राजश्री दादोबा यांच्या बातमीच्या जोड्या होत्या. त्यापैकीं च्यार जोड्या बातमी घेऊन गेल्या कीं, राजश्री मुराराव श्रीमंतांच्या भेटीस गेले, म्हणून लेहून त्यांचा कारकून आहे त्याणें पाठविलें. रव पडलियावरी सेवेसी पत्र लिहिले असे. सेवेसी विदित जालें पाहिजे. बहुत काये लिहिणे ? सेवेसी स्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Tubaji Anant gives details about the halt of the armies round about Raichur and the river Krishna. The messengers sent by Tarabai and Dadoba have returned—he says—with the news that Murarrao has gone to wait upon the Peshwa.*

---

No. 170] [30-3-1751

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान**
**स्वामीचे सेवेसी**

विनंती सेवक हरि राम साष्टांग विनंती उपरी. येथील कुषल तागाईत छ १३ जमादिलौवल जाणून स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान कुषल असे. यानंतरें स्वामीनीं पत्र पाठविलें तें पावलें. तेथें आज्ञा कीं, गाईकवाडानें राजश्री बापूजी बाजीराव यांस रेटून सातारियाकडे जाणार, यास्तव तुम्ही राजश्री नानास जाऊन सामील होणें, अगर हुजूर येत असाल तरी न यावें, गंगथडीच्या सुमारें बापू असतील त्यास सामील होणें म्हणून लिहिलें व येचविसीं राजश्री मानाजी पायगुडे यासहि लिहिलें, तें सविस्तर कळों आलें. त्याजविसीचा अर्थ राजश्री तात्याच्या पत्रीं लिहिला असे, श्रुत होईल. प्रस्तुत आम्ही राजश्री नानाजवल आहोत. येक दुसरे कामकाज आम्हांकडून जालें ते आमचें आम्हीच लिहावें असें नाहीं. राजश्री नानाच्या रुबरू लोकानी शर्त केली. त्याणी च्यार

---

[1] रांग.

घटिका पाहिली. ते सेवेसी विषदें लिहितील. सारांश, स्वामीच्या पुण्येकरून बराच विचार जाहाला. याउपरी करवीरवासियास कितेक पर्याय बोलोन आलों आहों, त्याप्रमाणें त्याच्या निदर्शनास आलें पाहिजे. प्रस्तुत इकडील बखेडा जाला आहे, तथापि स्वामीच्या वचनावर निभ्रांत आहेत. राजश्री विसाजी नारायण त्याजवळ नेहमी आहेत. आगमनाची प्रतीक्षा मात्र आवलोकन करितात. तद्नरूप स्वामीपासून घडेल यास्तव हा भरवसा धरून स्वस्त आहेत. या फौजेचा विचार म्हणावा तर येकांत येक नाहींत. यामुलें हरयेक-विसीं अंगेजणी होत नाहीं. अशास स्वामीचें या प्रांतीं येणें जालियावरी सर्वेहि गोष्टी घडतील. सुचला मजकूर सेवेसीं लिहिला असे. श्रृत होये हे विनंती.

¶*Hari Ram, as instructed by the Peshwa, joined Nana Purandare against Damaji Gaikwad near Satara.*

---

*No. 171]* *[30-3-1751*

## श्रीगणराज

सेवेसी विज्ञापना. पौर्णिमा मंदवारी राजश्री स्वामीची हुजरात हशम दोन तीन हजार यासिवाय दमाजीकडील फौज तीनच्यार हजार पवईवर चालोन आले. दमाजीकडील फौजेच्या तोंडावर चिरंजीव पुरुषोत्तमराव यास फौजेनसी उभे केले. आम्ही आपले फौजेनसी लखजी बोंधे व खंडेराव जाधव यैसे पवईवर उठले, तो आम्हास मराठे सरदार सोबती दिल्हे होते त्याणी अनींं[1] राखिली. ते सविस्तर वर्तमान राजश्री नानानी लिहिलेच असेल. आम्ही तसेच चालोन गेलो. हशम व राऊत त्याकडील मोड जाला. राऊत नेऊन शनिवारात घातले. हशम तसेच डोंगरावर चढविले. येविसीचे सत्य मिथ्या राजश्री नानानीं लिहिलें असेल त्यावरून कलेल. स्वामीनीं आम्हास येथें पाठविल्यापासून आजी तागाईत तीनीं युद्धे जाली, परंतु स्वामीच्या पुण्येंकडून लोकांची चाकरी उत्तमच होऊन आली. हे वर्तमान सेवेसीहि विदित जालेच असेल. आम्ही सेवक आहो. चाकरीच करावी. केल्याचे अपूर्व नाहीं. परंतु स्वामीनीं लौकर यावे. येथील खुलासा लिहितां न ये. स्वामी सर्वज्ञ आहेत. तेथील गुंता जसा उरकेल तसा उरकोन जलदीनें येऊन येथील गुंता उरकावा, म्हणजे सारेच आले. आपणास दिसगत लागलिया येथील गुंजे[2] बलावते. यास्तव सेवेसी लिहिणे लागले. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*The writer Gopalrao Patwardhan conveys the news of the battle with Damaji Gaikwad and asks the Peshwa to return to Satara without loss of time.*

---

१ लगाम. २ जमाव.

No. 172] [March 1751

श्री

सेवेसी विज्ञापना. श्रीमंत राजश्री नाना स्वामीजवल राजश्री मुरारराव घोरपडे यांचा वकील श्रीनिवासराव आहे. तो येथे लिहून पाठवितो की, श्रीमंत दाभाडीवरी चालून गेले. त्यानी तीन कोस मावारे पिटले. श्रीमंतास गर्व जाहाला आहे. तलबहि फार चढली आहे. समीप काही फौज नाही. खर्चाची तंगच्याई जाहाली आहे. कर्ज फार जाहाले आहे. विप्रमंडली फार आहे. आद्याप तरवार कोठेहि केली नाही. दाभाडीचा जोर आहे व स्वामीमधे व नाना स्वामीमधे वैमनस जाहाले आहे. लडाई अद्याप पाहिली नाही मणून कितेक गोष्टी कुच्योद्याच्या लिहिल्या आहेत. ते पत्रें बजिनस नवाबास दखल होताहेत. सरकारचे काम खलल होते, याजकरिता श्रीमंतास लिहून पाठऊन, त्या ग्रहस्तास सेवेसी आणून, निष्ठुरपणे लौकरी निरोप दिल्हा पाहिजे. मुरारराव याचे श्नेहावरी द्रिष्टि देऊन, त्याला जवल ठेऊन घेतल्या बहुत नाश आहे. स्वामीचे येणे या प्रांतास जे समई होईल, ते समई कांही घोरपडे कामास येणार नाहीत हा निश्चये. त्याला खर्चास देऊन ठेविल्यास सार्थक नाही. नाना प्रकारे भेद घरचा फार लिहितो. तो आम्हास लिहिता येत नाही. घोरपड्याचा श्नेह कामाचा नाही. त्याला ठेविलिया, स्वामीचा बदनकषाची वार्ता होती. त्याचा पुत्र येथे नाना प्रकारे नवाबास सांगतो. विनंती श्रीमंतास लिहिली आहे. आगत्य त्याला निरोप देणे. स्वामी सुज्ञ आसा. हे विज्ञापना.

*¶Trimbak Girmaji writes to Sadashivrao Bhau the mischievous reports forwarded to Murarrao Ghorpade by his agent Shriniwasrao and suggests he should be immediately dismissed.*

---

No. 173] [March 1751 ?

श्री

विज्ञापना. स्वामीचें जाणें कोठवर जालें? राजश्री जानबा माहाराज निघाले होते ते येऊन भेटलेच असतील. पुढें तिकडील मनसुबा सत्वर उरकून इकडें यावयाचें करण्यांत येईलच. परंतु फारसा गुंता न पडतां सत्वरच निर्गम होऊन येणें इकडे होईल तर उत्तम आहे. राज्यांत फितुर जाला. यासमयीं कोण्ही कोण्हाचें नाहीं. यैसेंहि वर्तमान यैकतों, कीं जितके सरंजामी फौज स्वामीचे समागमीं आहे त्यांस अंतस्थें पत्रें चालतात, कीं तुम्ही उठून

येणें. त्यांनींहि त्यांसी करार केला आहे; परंतु आवधी कीं जोपर्यंत गायेकवाड बमर्यफौज[1] सातारियास न गेला, त्यांस आसरा न जाला, तोंपर्यंत कोणी जात नाहीं. फौज त्याचे हातांखालें जाली, फौजेचा आश्रा जाला म्हणजे सर्वत्रांनीं मिलावें यैसा करार जाला, म्हणून वर्तमान येक नाजूकस्थलीं श्रवण केलें. रकोरपूर्वकहि[2] स्वामीकडे आलेच आहेत. परंतु चितापासून विश्वास मानावासा नाहीं. स्वामी सर्वप्रकारें सावध दुरंदेश आहेत; परंतु सुचला अर्थ सेवकांनीं विज्ञापना करावी. सर्व स्वामीच्या पुण्यप्रतापें दूर होईल. राज्यभाराचे विचारीं मात्र सावध असावें. स्वामी तों आहेतच. खानाकडेही गायेकवाडाचीं पत्रें आलीं होतीं; परंतु खान स्नेहावर मजबूद व सेवकानेंहि खानासी येकांती समयानसार भाषण करून त्याच्या पत्राचें वारापाणी केलें. इकडे कांहीं आश्रा त्यास लागत नाहीं. कळावें हें विज्ञापना.

¶*News-letter from the Nizam's court to the Peshwa, warning him to be on his guard against the treacherous designs which were being carried on in his army by Damaji Gaikwad. The Khan, he reports, is not likely to be hostile.*

---

*No. 174*] [*16-4-1751*

**श्री**

**श्रीमंत राजश्री भाऊ**
**साहेब स्वामींचे सेवेसी**

विनंती सेवक हरि दामोदर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील सेवकाचे वर्तमान छ ३० जावल स्वामींचे कृपाअवलोकनेकरून मुा का धुळे प्रांत खानदेश येथास्थित असे विशेष. स्वामीचे छ २४ राखरचे आज्ञापत्र सादर जाहाले; तेथें आज्ञा कीं हिमत धरून काबू गांठून काम करणें. यैसियास सेवक लोकांची हिमत कमी व्हावी यैसे काये आहे? झुंझाभांडणात कोणी खासा सरदार जाया अथवा जखमीं जाला नाहीं. त्याजकडीलच माणसे फार जाया असता येषावभास[+] मात्र जाहला. सेवक लोक स्वामीचे कृपेने स्वामी-सेवेवर हजर असों. गायेकवाड घाट चढल्यावर आपली फौज कासारबारीने घाट चढली. राजश्री फिरंगोजी पवारहि तेथे येऊन सामील जाहाले; परंतु निकडीने गांठ घालावी हा मनसबा न देखोन राजश्री बापूजी बाजीराव यांस विनंती केली कीं खानदेशाची जप्ती केली होती, त्या अमलास खलेल होऊन

---

१ सहित. २ रघूजी भोसले. + यशाचा आभास.

सरदेशमुखीच्याहि आमलांत डोहणा जाला. कमाविसदाराची पत्रें आली तीं बजिनस दाखविली, आणि बंदोबस्तास कोणास रवाना करावयाचे त्यास करावें. त्याजवरून रा। महिपतराव कवडे समागमें वेऊन आम्हांस आपले पथकानसी आज्ञा दिल्ही, तुम्हीं जाऊन खानदेशचा बंदोबस्त होईल तो करणें. त्याजवरून प्रांत मजकुरी येऊन मोगलाईच्या आमलांत डोहणा जेथे होता त्यास फिरोन निटाऊन सरदेशमुखीदेखील येथापूर्व बंदोबस्त करून वसूल चालता केला. गायेकवाडाचे लोक ये प्रांते जागाजागा होते ते कुल उठोन बागलाणांत देरमालच्या व सोनगडच्या आश्रये पिंपलनेराकडे गेले. आपले लस्करचे बुनगे व जखमी व हस्ती पारोलियांत होते ते जिकडील तिकडे रवाना केले. बोध्याचा पहिला व जगजीवन पवार याचा पाडाऊ येकून दोन हस्ती अद्यापि येथें आहेत. गायेकवाड दरमजलीने मुलुक लुटित केंदूर पाबलावर गेला. तेथे सेनापतीची भेट होऊन पुढे सालपियांच्या घाटे वेण्यावर गेला. आपल्या फौजा मागे होत्या. राजश्री त्र्यंबकराव सदासिव नाना च्यार हजार फौजेनसी जेजुरीस आले. सर्वांच्या भेटी होऊन तैसेंच कूच करून त्यामागे जाऊन वेण्यवर फालगुन वद्य १४ युध्य कलें. गायेकवाड मोडून माहारदरियांत घालून गोट बुनगे लुटिलें. दुसरे रोजी मानाजी पायेगुडे व राजश्री नारायेणराव घोरपडेहि येऊन सामील आपले फौजेस जाले. उपरांतिक आईसाहेबी गायेकवाडाचे मदतीस भोईटे व सेकमिरां, सोलसकर, खानविलकर, बुराणजी मोहिते, सिरके, जाधव, हजार बारासे स्वार दिल्हे. त्यासी दुसरे युध्य चैत्र शुध ८ जालें. घोरपडे व पायगुडे याणीं उतम प्रकारें लडाई करून गायेकवाड मोडून माहार-दरियात घातला. तिसरे युध्य कही भारावयास कवडे गेले होते, त्याजवरून त्याची फौज तयार होऊन आडवी आली. पोहेपासीं चैत्र पोर्णिमेस युध्य जाले; तेव्हाहि गायेकवाड फिरोन कवड्याही मोडिला. सांप्रत त्यास दोन पाइली धान्य त्रृण नाहीं. पाणी येकसांज घोडियास पुरतें मिलत नाही. जाणौन त्याणीं मल्हार गोविंद श्नेहाच्या गोष्टीस्तव पाठविले. त्यास आईसाहेबी गाये-कवाडाचे चिरंजीव व जांवई गडावर भेटीस बोलाविले ते वरतेच ठेविले, कीं मुले युध्यांत कैसियास पाहिजेत? इकडे सलुक करावा तरी तिकडे मुले गुंतली. इतकियाउपरी तजवीज आईसाहेबाचे विचाराखेरीज होत नाही, या प्रकारचे वर्तमान. बुराणपुराकडील वर्तमान तरी अबदुलखैरखांस सलाबत-जंगाची सनद सुभेदारीची तीस हजार यैवज दरमाहा सिबंदीस नेमून पाठविला. खाजेमकुलीखांन यास गाजुदीखांन याची सनद आली जाणोन शहरांत परस्परें युध्य होऊन पनांस साठ माणूस जायां जाहाले; आणि फिरोन सलुक होऊन

तूर्त सुभेदारी शहरांत अबदुलखेरखा याची करार जाली. आपला अमल बाहेर आहे तैसा आहे. दिलीकडील वर्तमान तरी बुराणपुराकडून आलें. राजश्री मल्हारजी होलकर व मनसुरअलीखा यांच्या भेटी आगरियावर जाल्या. पुढें पठाणावरी अंतरवेदीत जाणार. सांप्रत गायेकवाडकडील भांजी खताल तीनसे राऊत नंदुरबारे व बालकृष्ण गणेश व आरब च्यार पांचसे पिंपलनेरी सोनगडच्या नाक्यावर व सुरत प्रांते हजार स्वार आहेत; परंतु यांत कोणीं मातबर नाहीं. सुरतअठाविसीत दुर्जनसिंग मांडवीकर याणीं धूम मांडिली. दुर्जनसिंगाची सलावत त्याजवर आहे. सरकारची फौज आम्हीं व राजश्री सदासिव दामोदर व राजश्री रामचंद्र माहादेव व शंकराजी माहादेव या प्रांते हजार स्वार आहों; परंतु सदासिवपंताचा जमाव निकमाकडे पेसजी नेमणुकेप्रमाणे त्याजकडे बुराण-प्रांते आहे. वरकड आमचा व रामचंद्र माहादेव याचा जतीच्या कामावर माहालोमाहाली गुंता जाहाला आहे; परंतु खतालाकरितां नंदुरबारेत जमाव करून तीनसे राऊत आपले पाठविले; आणि आम्ही व रामचंद्रपंत शंकराजीपंत बागलाणांत सांप्रत बालकृष्ण गणेशावर गेलो. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Hari Damodar traces the route followed by Damaji Gaikwad to Satara and describes his skirmishes with Nana Purandare. He also mentions that his son and son-in-law were invited to the fort by Tarabai for an interview and detained there. An interview between Malharrao Holkar and Mansur Alikhan is also reported by the writer by way of news from Delhi.*

---

*No. 175*] *[18-4-1751*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीं**

विनंती. सेवक बनाजी माधवराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ २ माहे जमादिलाखर पावेतों कृपावलोकने जाणून स्वानंदा-तिशय लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. काडल्लरसंगमचें पत्र सादर जालें त्यावरून सेवकास परम हर्ष जाला. स्वामीनीं सीघ्रच सलाबतजंगासी स्नेह संपादून पुन्हां आमित्राचे पारपत्यास आगमन केलें हें ईश्वरें मोठें कार्य केलें. पुढेंही येश शत्रुपराभवाचें व राज्याचे बंदोबस्तीचें स्वामीस प्राप्त होईल. सर्व सरदार आश्रा स्वामीचा इछितात. सर्वांस स्वामीवाचून दुसरा भरवसा आणिकांचा नाहीं. पुण्यप्रतापें सर्व घडून येईल. आजकारणें श्रीपंढरपूरपर्यंतहि आगमन जालेंच असेल. अलीकडे सातारियाकडील वर्तमान आथवा पुण्याकडील येत नाही.

सारांश गायेकवाड येथपर्यंत येऊन पश्चात्तापवंत जाला आहे. पुढें स्वामीचें आगमन जालें म्हणजे पादाक्रांत होऊन अभयदान घेऊन सेवक पूर्ववत होईलसें दिसतें. सलाबतजंगहि पहिले तारिखेस हैदराबादेहून कूच करून मजलदरमजल इकडे येणार. नासिरजंगास स्वामीचें पत्र पावतें केलें. उत्तर पाठविलें तेंहि प्रविष्ट होऊन भावार्थ अवगत होईल. जागिरा सलाबतजंगानी यांचे विचारें देऊं केल्या. यासहि आज्ञा हजूर यावयाची केली आहे. कधीं जाणार ? यांनीं आपली साहेता वचनगौरवें करावी म्हणून आज्ञा जाली होती तो भावार्थ सर्व निवेदिला. अद्याप यांस कांहीं बोलाऊं आलें नाहीं अथवा हा कांहीं भावार्थ जागिरा द्यावयाचा यांस त्यानी लेखनहि केलें नाहीं. येथें आलियानंतर पुढें काये प्रसंग होईल पाहावें. सलाबतजंग धारुरा इतके आले म्हणजे हे इस्तकबाले[१] जातील. तोंपर्यंत जावयाचा विचार दिसत नाहीं. गाजुदीखान निघणार, डांकहि येऊन बसली आहे, परंतु आद्याप दिली सोडून येक मजलहि न आले. च्यारबाग दिलींत आहे तेथें डेरे दाखल जाले होते. सार्वभौमानी मनःपूर्वक आज्ञा आद्याप दिल्ही नाहीं यैसेंहि यैकितों. जेव्हां येतील तेव्हां खरें. सलाबतजंगानीं आबदुल खैरखानाचे नांवीं बुऱ्हानपूरचे सुभेदारीची न्यबेत[२] पाठविली. गाजुदीखानानी खाजेम कुलीखानाचे नांवीं न्यबत व बादशाही फर्मान याचप्रमाणें सर्वास पाठविला होता त्याजवरून खाजेम कुलीखान सुभेदारी करीत होते. सांप्रत उभयतांत जूज जालें. शहरांतच उभयपक्षीं तीस माणसें मारलीं गेलीं. याखेरीज जखमीहि जाले. निदान आबदूलखेरखानाची फते जाली. दाही आपली फिरऊन खाजमे कुलीखानास घरीं बसविलें. काल परवां शहरीं दिलीहून लिहिलीं आलीं; तेथें वर्तमान आहे कीं राजश्री मल्हारजी होळकर वजिराचे मदतीस गेले होते. वजीर व जाट हे त्रिव(र्गी)नीं मसलत करून वजिरास दाहा कोस मागें ठेविलें. जाट समागमे घेऊन आंतरवेदींत प्रवेश केला. जातांच पठाणाचीं स्थलें दोन तीन होतीं ते चढ्या घोड्यानसी घेऊन तेथील पठाण बहुत मारले. हस्ती ७ व घोडे व माल मालीयेत जे सांपडली ते घेतली. सलाबत फार बसली हें वर्तमान आहमदखान पठाण वजिराच्या मुख्यास कळून बिनलडाई पळून कुमाऊंच्या पहाडाकडे पळून गेला म्हणून वर्तमान आहे खान बोलत होते. वजिराची फते मल्हारबानी करून दिल्ही, यांचे सलाबतीनें येवढें काम जालें. वजिरावर मोठें येहसान जालें. ईश्वरें स्वामीच्या प्रतापेंच शत्रूचा पराभव केला. ईश्वर स्वामीकडे पुर्ता आहे आसे कळूंन आलें. वरकड किरकोळ शत्रूचा पाड किमपि नाहीं. चहूंकडून स्वामीच्याच निशानाची फते होत जाते. सलाबतजंग आलियानंतर जाहगिराहि

---

१ सामोरे. २ मुतालिकी.

मन:पूर्वक देतीलच. खानहि सांगतील. अंतर पडणार नाहीं. स्वामीचें आगमन सत्तक्रसीस सीघ्रच होईल. जालियाचें आज्ञापत्र कृपाकरून पाठविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें ? कृपा निरंतर आसूं दिधली पाहिजे हे विनंती.

*¶Banaji Madhav forwards news of Salabatjang and advises the Peshwa to maintain friendly relations with him. He goes on to give information about recent events at Satara and Delhi.*

---

*No. 176]* *[20-4-1751*

पो ११ जमादिलाकर

**श्री**

**श्रीमंत राजश्री रावमामा[1] स्वामीचे सेवेसीं**

पोष्यांकित बनाजी माधवराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार. कुशल तागायत छ ४ माहे जमादिलाखर पावेतों कृपेनें जाणून स्वानंदातिशय लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. श्रीमंत काडद्वर संगमास आलियाचें वर्तमान आलें होतें. मजल दरमजल भिवरेचें पाणी धरून आठा दिवसांत श्रीपंढरपुरास यावें. त्यास आज पंधरा दिवस जाले. बहुधा जवल आले असतील. आपणांकडेहि पत्रें येत असतील. कोठपर्यंत आले, परस्परें सातारियास जाणें होईल, किंवा पुण्यास येतील. गायकवाडाकडील वर्तमान आलीकडे कलत नाहीं. वर्तमान यैकतों कीं येऊन गुंतला. जातां निवतांहि कठीण आहे. महागाई फार जाली आहे. त्यामुलें त्याजकडील लोक आमचे फौजेंत चाकर राहावयास येतात, म्हणून त्यास श्रीमंत आलियावर पादाक्रांत होऊन आपला अपराध क्षमा करऊन पदरीं पडेल, येथपर्यंत वार्ता यैकतों. प्राय: तसेंच आसेल. त्याच्यानें काय होणें आहे कलतच आहे. विशेष वर्तमान तर दिलीकडील गाजुदीखान येक मजल आलीकडे आले यैसी आवाई आहे; व राजश्री मलारजी होलकरांकडील वर्तमान तर वजिरासी भेटून वजीर व जाट हे त्रिवर्ग आंतरवेदींत प्रवेश केला. हें वर्तमान आहमदखान पठाणास विदित होऊन त्यानें आपला हरोलें[2] पाठविला. त्यासी व आमची फौज व जाट येकत्र आहेत, वजीर कांहीं तफावतीनें मागें आहे, त्यांसी यासी लडाई जाली. हरोल मारून घेतला. लडाई बरी जाली. हस्ती सात आठ व घोडीं च्यार पांच हजार घेतलीं. लस्कर लुटून पस्त केलें. पठाण फार मारले गेले. दोन तीन स्थलें घेतलीं. यांची सलाबत[3] भारी जाली. याजमुलें दहशत त्या मुलकांत

---

१ त्रिंबकराव मामा पेठे. २ आघाडी. ३ सलाबत = वचक, दरारा.

फार जाली. हें वर्तमान आहमदखानास विदित होऊन बिनलडाई पळून कुमाऊंच्या पाहाडाकडे गेला येैसें वर्तमान आहे; व हैदराबादेहून लिहून आलें आहे कीं सलाबतजंगानी आम्हांस श्रीमंताचे मदतीस पाठविलें आहे. फौजहि समागमें देणार म्हणून. श्रीमंतीं तों लिहिलें नाहीं. शहरीं वर्तमान आहे आसेहि असेल तर फारच उत्तम आहे. श्रीमंताचे पुण्यप्रतापें सर्व होऊन येईल. मौजे साकूरच्या सनदा पाठविल्या, पावल्या असतील. सेवेसीं विदित होये हे विज्ञापना.

¶*Banaji Madhav conveys to Trimbakrao Pethe the latest tidings about Damaji Gaikwad's movements and also about an encounter between Holkar and the Pathans in the North Doab.*

---

*No. 177]* *[23-4-1751*

पो छ ९ जमादिलाकर

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत राजश्री**

**भाऊ स्वामीचे सेवेसी**

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत छ ७ जमादिलाखरपर्यंत स्वामीचे कृपेंकरून सुखरूप असों विशेष. स्वामीनी सांडीणस्वाराबरोबर पत्र पाठविलें तें पावलें. ऐवजाविसीं वगैरे कितेक तरतुदेविसीं आज्ञा केली त्यास ऐवज तर परवाचे दिवसीं छकड्यावर घालून येक लक्ष रुपये पाठविला, तेहि लौकरीच येऊन पोंहचतील. दिढा लक्षाची आज्ञा होती त्यास ऐवजाची तरतूद करून आज पनास हजार रुपये उंटावर घालून स्वार बरोबर देऊन रवाना केले. आज दोन च्यार कोस जाऊन राहातील. हेहि सालप्याचे घांटे लौकरीच येऊन पोंहचतील. आणिकहि चालीस पनास हजार रुपयांची तरतूद केलीच आहे, परंतु आजमासें दोन लक्ष रुपये येकमाहा राजश्री नाना व बापूचे फौजेस लागतात. त्या पैकीं आजमासें दीढ लक्ष रुपये वैशाख मास पैकीं त्यांस पावले. आणिक ऐवज त्यांजकडे देणे लागेल, येविसीं आज्ञा करणें ते करावी. पैठणची चिटी तेच दिवसीं रवाना केली. मागती वरचेवर निकडीचीं पत्रें पाठऊन तोहि ऐवज आणवितो. खानदेशांतहि राऊत जप्तीचे यैवजाकरितां पाठविले आहेत. दाहा बारा दिवसीं चाळीस पनास हजार रुपये राजश्री रामचंद्र माहादेव पाठवितील. येथें आज लक्ष रुपयांची तजवीज स्वामीकडे पा यासिवाय आहे; परंतु येथेंहि रोज हशमाचा वगैरे खर्च फार आहे. आजपर्यंत पावणे दोन हजार इशम, सवाशें जेजाल आधिकच पा. यासिवाय आज उद्यांचे दिवसांत दोन तीनसें माणूस रवानगी करितों. वसईच्या गरनाला लाहान २०० व तुके[१] ५००, थोर गरनालेचे गोले २० यैसे आले तेहि

१ बोथट बाण.

उदईक रवानगी होईल. तोफा पांच साहा छकड्यावर घालून ठेविल्या व फटकडीहि थोरली तयार करविली. तिचेहि साहित्य होतच आहे. ती आणविल्यावर थोरले गरनालेचे गोले फटकडी बराबर पा॥. बाकी सामान उद्यां रवाना होईल. पंचवीस तीस जेजाल आणिक रवाना करितों. गोलंदाज वसईचे आले आहेत. तोफाबराबर पाठऊं. साष्टीचे गोलंदाज व हातगरनाला चालवावयाची बाकी तोफ परवाचेच दिवसीं रवाना केली ती पोंहचलीच असेल. साहित्य हशम लोक फौज सर्व विपुल जालें. पारपत्याचा समय मात्र आला असावा. स्वामी सातारियास कधीं दाखल होणार हें सेवकास ल्याहावयाची आज्ञा करावी. सतरुषीचें वृत्त तर सविस्तर अवगत जालेंच असेल. स्वामी गेले, आतां अनायासें पारपत्य जालेंच. बाण नेणें तर उंट पाठऊन द्यावे. तीन कैच्या बाण सिध आहेत. येथें नदी-पलीकडील दारूखान्यास आग काल सोमवारीं लागली. सकालचीच चौ घटका दिवसा. त्यास बाण व दारू सिध जाली ती आंत न ठेवावयाची आज्ञा स्वामीची आहे. तथापि त्याचें पारपत्यगार बेकैदीमुळें ठेवितात. तैसेच बाणास फरमे करणे, अगर जंगी सामान गरनाला वगैरे भरणे ते दूर नेऊन भरावे, तेहि न करितां गाफीलपणें बैकेदी करितात, त्यामुळें फरमां+ करतां आग लागली. चालीस पनास गरनाल उडाली. माणूस कोणी जायां जालें नाहीं. येक मात्र हुरफला थोडा आहे. खेर जाली. आंत दारू खंडीभर व शंभर बाण होते. भरवसा माणसें घालावयास न पुरे तथापि लोकांनी व आणानी शर्तीनिसी भिंतीस भोकें पाडून आंतून बाण व दारू पलविली. आग दरवाजेयाचे सोप्यास लागली. वाट बंद जाली. स्वामीचे पुण्येंकरून फार खैर जाली. येक माणूस जायां जालें नाहीं. जर बाण सुटते तर अनर्थापात होता. कोटांतील दारूखानाहि जवलच होता. स्वामीचे पुण्यें करून सर्व गोष्टी निर्विघ्न जाल्या. बहुत काय लिहिणें? कृपा केली पाहिजे हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath informs the Peshwa and Bhausaheb that he has dispatched cash to Satara and reports a fire in the ammunition stores at Poona beyond the river.*

---

*No. 178]* *[24-4-1751*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत राजेश्री**
**भाऊ स्वामीचे सेवेसी**

विनंती. सेवक त्रिंबकराव विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत छ ८ जमादिलाखरपर्यंत स्वामीचे कृपेंकरून सुखरूप असों विशेष.

---

+ माप.

श्रीमंत राजश्री विश्वासरायांची रवानगी पुणियास केलियाचें वर्तमान लिहिलें ते कळलें. मध, वाळा वगैरे जिनस आणविला, त्याप्रमाणें काल्च रवाना केला. पोहचेल. च्यार पांचशें हशमी माणूस खानदेशीं व रेवदंडेकर व बलकवडे यांजकडील व कांहीं वसईकर जमा जालें; त्यांची खर्चावेंचाची बेगमी करून देऊन आज उंद्या इतकियांत रवानगी करितों. आजपर्यंत जितकें माणूस पाठविलें तितक्यांची दीडमाही बेगमी करून देऊन रवानगी केली. काडीइतका गवगवा नाहीं, सबब रवानगीला येक दोन दिवस बेगमी करून द्यावयास लागतात. कांहीं आरबहि आले आहेत तेहि पाठवितों. आज हुके ५०० व गरनाला २०० ऐशा रवाना केल्या. उद्यां आणिक तीस जेजाला पाठवितों. तोफा पांच साहा व फटकडी सिद्ध केली. आज्ञा आली म्हणजे छकड्यावर घालून रवानगी करितों. बाणहि उद्यां परवां इतकें तीन कैच्या पाठवितों. राजश्री दिनकरपंतासहि लोकांचा गुंता उरकून परवा तेरवा रवाना करितों. स्वामी सातारियास दाखल जालियावर सलूख किंवा लढाई ये गोष्टीचा डौल पडलाच असेल. वरचेवर सेवकास सविस्तर वर्तमान ल्याहावयाची आज्ञा करावी. राजश्री मानसिंग थोराताचें वर्तमान पूर्वीच लिहिलें होतें त्याचें उतर कांहींच आलें नाहीं. त्याचे स्वार तर खानदेशांत पैका आणावयास पाठविले आहेत. खासा पंचवीस तीस खांशानिशी येथेंच आहेत. बहुत काय लिहिणें कृपा करावी हें विनंती.

¶*Trimbak Vishvanath Pethe to Nana Saheb and Bhausaheb, informing them from Poona of the arrival of Vishvasrao and of the dispatch of forces and ammunition against Damaji Gaikwad.*

---

*No. 179*] [*26-4-1751*

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान**
**स्वामींचे सेवेसीं**

विनंती. सेवक बनाजी माधवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील तागायत छ १० माहे जमादिलाखरपर्यंत स्वामीकृपेनें येथास्थित जाणून स्वकीये कुशल लेखनाज्ञा करावी विशेष. आज्ञापत्रें सादर जालीं तीं पावलीं. साता लक्षांचा परवाणा व सलाबतजंग यांचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. वेदशास्त्रसंपन राजश्री दीक्षित स्वामींनी व सेवकानें पत्रें सर्वांची प्रविष्ट केलीं. सर्वांचे अनुमतें प्रतिउत्तरें घेऊन मागाहून लिहून पाठऊं. येथील वर्तमान नबाब सलाबतजंग यांचीं पत्रें नासिरजंग यास दोन तीन आलीं कीं श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचा आमचा

श्नेह बहुत जाला. त्याणी कुमकेस फौज आणविली, त्यास येथून राजश्री जानोजी निंबालकर वगैरे पांच हजार फौज रवाना केली, तुम्ही तेथून पांच हजार फौज व रेहकले[१] व बाणाचे उंट शंभर रवाना करणें, व सुलतानजीचे पुत्रास सजावल[२] पाठऊन फौज सुधां जाऊन सामील होत तें करणें, म्हणोन ताकीद आली. त्यावरून नासिरजंग याणी सुलतानजीचे पुत्राकडे सजावल रवाना केले व येथील फौज व रेहकले व बाण वगैरे सैद हमीदखान, सियादतखान यांचे पुत्र, यांस रवाना करितात. उदईक शुक्रवारीं डेरेदाखल होतील आणि शनवारीं कूच करून स्वामीकडे येऊन पोहचतील. नासिरजंग यासहि आज्ञा आहे. दो चौ दिवसांत सरंजामी करून आपणहि स्वार होऊन येतील. बहुत काय लिहिणें कृपा निरंतर आसूं दिधली पाहिजे हे विनंती.

*¶Banaji Madhav reports that Salabatjang was preparing to send succour to the Peshwa in the struggle against Damaji Gaikwad.*

---

*No. 180]* *[27-4-1751*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री नाना ता। श्रीमंत राजश्री**
**भाऊ स्वामीचे सेवेसीं**

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत छ ११ जमादिलाखर पर्यंत शनवार प्रहर रात्र आवसीची सुखरूप असो विशेष. गुरुवारीं गाईकवाडावर फौज तयार करून हला करविली. अगोधर हशमी लोक फौज पाठऊन येवतेश्वरची चौकी मारून तिकडून व जकातवाडीकडून ऐसी चहूकडून मार बसूं लागली. मग शरण आला. कांहीं बाकीच राहिली नवती. परंतु शहर मारलें जाईल आणि शरण आल्याचें संरक्षण दोन्ही विचार उत्तमच जाणोन, स्वामीनी कृपा केली उचितच केलें. स्वामीचे पुण्याचा प्रभाव कोठवर ल्याहावा! या उपरी आपले मुदेमाफिक जसे म्हटले तसे कार्यहि होऊन येईल. मातुश्री ताराबाईकडीलहि बहुधा कारभार निर्गमन निखालसता होईलसें दिसतें. स्वामीचे ताले अप्रतिम. रुपयाविसीं लिहिलें त्याचें सविस्तर उत्तर कालच पाठविलें त्याजवरून कलेल. आज पाहाटेस राऊतबराबर उंठावर रुपये पाऊण लक्ष रवाना करविले तेहि लौकरीच येऊन पोंहचतील. शहरीहून

---

१ बैलाची गाडी. २ सजावल – तगादा करणारा.

राजश्री बनाजी माधवराव यांचें पत्र आलें. राजश्री मल्हारजी होलकर याजकडील वर्तमान लिहिलें तें श्रवण होऊन बहुतच संतोष जाला, बजिनस पत्रच पाठविलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विनंती.

¶*Trimbak Vishvanath acknowledges receipt of the letter reporting the defeat of Damaji Gaikwad and sends some treasure.*

---

*No. 181*] [*29-4-1751*

**श्रीशंकर**

**श्रीमंत राजश्री नाना व ता। श्रीमंत**

**राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसीं**

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत छ १३ जमादिलाकर सोमवार दीढ प्रहर दिवस सकालचा वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीचे सेवेसीं पत्र जोगू व जानू खिजमतगार याजबराबर पाठविलें तें पावेल. मुख्यपत्रीं राजश्री मानासिंग थोराताचा मजकूर होता त्याचें प्रत्योत्तर आलें कीं, तुम्हांजवल असों देणें. त्यास आज्ञेप्रमाणें येथेंच राहातील. त्याच पत्राबराबर पुरवणी लाहान होती त्यांत कितेक मजकूर लिहिला होता, त्याचें जरूर जाबाचें प्रयोज्यन होतें, त्याचें उत्तर कांहींच आलें नाही. तर त्या पुरवणी पत्राचा शोध करऊन उत्तर पाठवावें. खिजमतगारमजकूर याजबराबर स्वामीनी पत्र पाठविलें तें आतांच पावलें. तोफ फटकडीहि पाठवावी म्हणून आज्ञा. त्यास फटकडीचा गाडा वगैरे सरंजाम जे दिवसीं सिध जाला, तेच दिवसीं गायकवाड भेटल्याचें वर्तमान आलें, त्याजवरून ती रवाना केलीच नाहीं. तोफा च्यार आगोधर येक दिवस रवाना केल्या होत्या, त्या वाटाखालीच येक मजल गेल्या होत्या, त्याही हें वर्तमान आइकोन पुढें न गेल्या. त्यास रवाना करावयाची आज्ञा जालिया मागती ताबडतोड तोफा व फटकडी रवाना करूं. तर प्रत्योत्तराची लौकर आज्ञा करवावी. लोक वगैरे सरंजाम रवाना केला तो येऊन पोंहचलाच असेल. आणिकहि वरचेवर लोक साष्टी वसईकडील वगैरे जागजागांचे येतात ते वरचेवर रवाना करीतच आहों. न जातां तोफा मात्र न गेल्या तर येविसींची आज्ञा काये ते लौकर करावी. बागापैकीं जिनस थोडा थोडा निघतो, तो राजश्री जिवाजीपंताकडून रवाना करवीत असतों. पावत असेल. मूल पाणीच नाहीं. नदी आगदींच आटली. दो चौं दिवसांवर नदीचे पाण्याचा मजकूर आला. यास्तव कोणेही मल्यांत फारसी फलफलावल नाहीं. बहुत काय लिहिणें? कृपा करावी हे विनंती.

¶*Trimbak Vishvanath to the Peshwa, informing the addressee of the arrangements which were being made for sending guns and ammunition.*

No. 182]

छ २२ जााकर

[1-5-1751

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान

स्वामीचे सेवेसीं

विनंती. सेवक बनाजी माधवराऊ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ १९ माहे जमादिलाखरपावेतों कृपावलोकनें जाणून स्वानंदातिशय लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. स्वामीचें आगमन सतऱ्‍षीस[1] होऊन गायकवाड पादाक्रांत जालियाचें वर्तमान परस्परें श्रवण करून परम आनंदावाप्ति जाली. स्वामीचा प्रताप आसाच आहे. येथूनहि फौज निघणार. तातड फार करितात. परंतु मोंगलाई कारभार. आज म्हटलें तर आठ दिवस निघावयास पाहिजेत. तदनंतर मजल दरमजल पोंहचावयास दिवसगत लागेल. या प्रकारचा कारभार आहे. लोकांस खर्चास देऊन वाटे लावावें त्याचाहि यैवज केला पाहिजे. यैसें यास चहूकडून संकटच आहे. गाजुदीखान येणार त्याचे मनीं खानाचें विषम गेलें आहे कीं बादशाही फर्मान यानी घेतला नाहीं. तस्मात् यांचेच चित्तीं आमचें दक्षणेस आगमन न व्हावें, सलाबतजंगासी निजामआलीसीहि आंत:शुधि नाहीं, तेथेंहि मनस्ताप निर्माण जाला आहे, याजमुळें खान व आबदुरजाखान व येक दोवे उमदे आपलेठाईं बहुतच दिलगीर आहेत कीं परिणाम कसा लागेल, आबरू कसी वाचेल ? या प्रकारचा विचार येऊन पडला आहे. तनखियाचा विचार तर हैदराबादेस पत्रें यांची गेलीं आहेत, तेथून उत्तर आलियावेगळें कांहीं येक आहे नाहीं यैसे नाहीं. पाहावें कसकसें होईल. स्वामीचे प्रतापें सर्वहि मागें पुढें होऊन येईल. दोन दिवस मात्र ढील आहे. सेवेसी श्रुत होये. दिलीकडील आथवा आणखीहि कोण्हांकडील नवलविशेष आलें नाहीं. बहुत काय लिहिणें. कृपा निरंतर आसूं दिधली पाहिजे हे विनंती.

¶*Banaji Madhavrao to the Peshwa, reporting the dilatory nature of the measures taken by Salabatjang to send troops for the help of the Peshwa.*

---

No. 183]

[3-5-1751

श्री

श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत

राजश्री भाऊ स्वामीचे शेवेसी

विनंती. सेवक त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साा नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ १७ जमादिलाखर शुक्रवार दोन प्रहर दिवस सुखरूप असों विशेष.

---

[1] सातारा.

स्वामींनी सांडणीस्वारां बा। पत्र पाठविले तेथें आज्ञा कीं इंदुरीस व दावडीस पैका आहे म्हणून बोलवा आइकतो, त्यास त्याचा बारकाईनें शोध करणे आणि गावाजवळ दरवाजियास तफावर्तानें से दोनशे माणूस याप्रमाणे चौकी ठेऊन आतील वस्तभाव बाहेर जाऊ न पावे तें करणे म्हणून आज्ञा; त्यास आज्ञेप्रा। हशम येथें जमा तीनेकशें माणूस आहे तें काहीं इंदुरीस व दावडीस थैसे पाठवितो. बोभाट तर होईलच. आम्हीं मात्र आपलेकडून त्यास उपसर्ग काडीमात्र देणार नाहीं. वस्तभाव आले गेले, याची चौकसी * * * करतील रा। गोपाल रायाचे पांचसे स्वार पा। म्हणून आज्ञा. त्यास तेहि स्वार आले म्हणजे दोही जाग्याचे बंदोबस्तीस पाठऊ आणि आपले तर्फेनें सांगूं कीं तुम्हीं गावांत सुखरूप राहाणे. जो कोणी येईल जाईल त्याची मात्र चौकसी करावयाकरितां आम्हास पाठविलें आहे, याप्रों जे लोक जातील त्याणी बोलावे आणि बंदोबस्त करून राहावे. येणेप्रों सागोन लोक उदईक रवाना करतों. या पत्राचे उत्तरांची आज्ञा लौकर करावी. याउपर हशमी लोक व गैरसरंजाम न पाठवणे म्हणून आज्ञा; त्याप्रो जो सरंजाम येथे येईल तो येथेच ठेऊन घेऊ. पाठवीत नाहीं. तळेगावास व इंदुरीस स्वामीचा कौल घेऊन मातुश्री उमाबाईकडील सांडणीस्वार आला होता तो आमचा कागद स्वामीचा होता तो आम्हास देऊन तळेगावास तेव्हाच गेला. आम्हाकडील काडीमात्र उपसर्ग तळेगावास लागत नाही. व त्यांचे तट्टु पडतालहि वाटेनें जाते. त्यासहि आज्ञेप्रां अटकाव करीत नाहीं. सेवेसी विदित व्हावें म्हणून लि। असे. बहुत काय लिहिणे ? कृपा करावी हे विनंती.

¶*Trimbakrao Vishvanath to Nanasaheb, assuring him that he would comply with his instructions regarding the posting of guards over Induri and Davadi in order to prevent the removal of treasure reported to be there. The writer also assures him that the poor peasants will not be molested in any way.*

---

*No. 184*] [*17-7-1751*

श्री

राजश्री पंतप्रधान गोसावियांसी

ℒ श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो। दर्याबाई निंबालकर दंडवत विनंती उपरी. येथील क्षेम ता। छ ४ रमजान परियंत आपले कृपेस्तव येथास्थित असे विशेष. कृपा करून पत्रे पाठविलीं तें छ १२ शाबानी प्रविष्ट होऊन परम संतोष जाहाला. व रा। भोजाबा नाईक याणी आपणाकडील कितीयेक ममतेचा अर्थ सांगितला त्याजवरून चिताचे ठाई बहुत आनंद पावलो. सतरुषीकडील अर्थ राजश्री यांणी आमचे ठाई

अनविश्वास धरिला येैसा कालगतीचा महिमा म्हणून लिहिले, तरी त्यास स्वहिताच्या गोष्टी सांगितल्या, परंतु त्यांचा विश्वास न धरतां गडावरी गेले तेथें जे सुख प्राप्त जाहाले ते त्याचे अनभवास येऊन शरीरींहि भोगिलें. तोहि प्रसंग श्रीकृपेनं कुशलरूप जाहाला. याजउपरी त्याजकडे रा। जीवनराव गंगाधर पत्रें देऊन छ १७ शाबानी रवाना केले. त्याणी वरते जाऊन पत्रे दिल्हीं. कितीयेक मजकूर येकांती त्यांस श्रृत केला. त्याचे प्रतिउत्तर आम्हास लिहिलें होतें तें परस्परें आपणाकडे पाठविलें. त्या पत्रातील भावगर्भ आपल्या ध्यानास आला असेल. त्या पत्राच्या नकला आम्हाकडे आल्या आहेत. याचा विचार गोसावियानी काये केला आहे तो लिहिला पाहिजे. आम्हास सर्व प्रकारें आपली आज्ञा प्रमाण असे. राजश्री शामराव यांसी सत्वर सतरुसीस पाठवणे म्हणून आपले आज्ञेवरून राजश्री बाबूराव त्र्यंबक यांणी लिहिले होतें. त्यास उभयेता चिरंजीव श्रावण शुध प्रतिपदेस येथें दाखल जाले, याजकरितां गुंता पडिला होता. सांप्रत आपले आज्ञेप्रमाणे मारनिलेची रवानगी केली असे. ते प्रसंगास पोहचलिया-वरी तेथील विचार जो लिहिणे तो सेवेसी लेहून पाठवितील. आम्ही दोन च्यार पत्रें तीर्थरूप राजश्री आनंदराव जाधव हवालदार यांसी बहुतांप्रकारें लिहिलीं की तुम्ही श्रीमंताचे ममतेंत राहाणे. तेणेकडून परिणाम उत्तम आहे. त्यांणीहि आम्हास लिहिले होतें जे त्यांचे आज्ञेसिवाये नाहीं. हे येश आपले आपणास घ्यावे म्हणून आम्हास शफतपूर्वक लिहिले आहे. वर्तणूक कैसी करितील ती पाहावी. आम्हास सर्व प्रकारें आधार आपला असे, दुसरें जाणत नाहीं. कळलें पाहिजे. बहुत काये लिहिणें? लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Daryabai Nimbalkar writes to the Peshwa, expressing her complete trust in him, and complaining that her brother Ramraja rejected her advice and suffered imprisonment in consequence.*

---

*No. 185*] [*30-11-1750?*

छ १९ मोहरम

नकल

**श्री**

**पुा तीर्थरूप राजेश्री भाऊस्वामीचे सेवेसी**

विनती उपर. राजश्री संभाजी राजे याजकडील रेखोजी जाधव व जानोजी वेताळ यानीं छ १० मोहरमी रात्री राजश्री स्वामीजवळ प्रसंग केला. त्याजवरून राजेश्री स्वामीनी आम्हास बोलाऊन नेऊन आज्ञा जालियाच्ये वृत आलाहिदा

पुरवणीत लिहिले आहे. त्यावर छ ११ मोहरमी प्रातकालीचे रेखोजी जाधव व जानोजी वेताल मागती दरबारास आले. राजश्री स्वामीनी राजश्री प्रतिनिधीस बोलाऊन नेले. आम्ही गेलो, तेव्हा रेखोजी जाधव व जानोजी वेताल यास स्वामीनी आज्ञा केली जे तुम्ही राजश्रीस विनंती करणे की राजश्री प्रधानपंत आलियावर तुमची ठाणाठुणी व मुलकात पैका घेतला असेल तो, फौज लुटली असेल तो देखील, अवघा निर्गम करणें तो करून देवऊ म्हणून समाधानपूर्वक जाऊन विनंती करणे. त्यावर उभयेतानी उतर केले की आमचे राजे आईकणार नाहीत. आम्ही काही विनंती करीत नाही. त्यावर राजश्री स्वामीनी राजश्री प्रतिनिधिस आज्ञा केली की येविसीची निशा आपण तुमचे करितो. तुम्ही करवीरवासी राजश्रीकडे जाऊन मध्येस्तीने तुम्ही त्यांची निशा करून समजाविसी करणे म्हणऊन सांगितले. आणि आम्हास पुसिले ये गोष्टीचा काये विचार? त्यावर आम्ही उतर केले की राजश्री प्रधानपंत माहाराजाचे वचनासिवाये नाहीत. माहाराज हुकूम करितील त्याप्रमाणे वर्तणूक करतील म्हणऊन. त्यावर मग राजश्री प्रतिनिधि करवीरवासी राजश्रीकडे जाऊन त्याचे समाधान केले. सिधांत करून आले की येथून लस्करचे कूच होईल, मग ज्या मुकामीहून राजश्री संभाजी राजे निरोप मागतील ते मुकामीहून द्यावा म्हणऊन निश्चयेकरून येऊन राजश्री स्वामीस श्रुत केले. जाहाला मजकूर सेवेसी लिहिला आहे. परंतु हेच गोष्टी सेवटास गेली म्हणवत नाही. कोणे गोष्टीचे शास्वत नाही. मानावेसे नाही. विदित जाले पाहिजे. सेवेसी विज्ञापना.

*¶Purandare to Sadashivrao Bhau, reporting that Ramraja had deputed the Pratinidhi to go and visit Sambhaji of Kolhapur and adjust his demands. The Pratinidhi accordingly visited Sambhaji, satisfied him and returned.*

---

*No. 186]* *[1750 ?*

**श्री**

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजमान्य राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यासी आज्ञा केली यैसीजे. तुम्हाकडून सरकारचा यैवज येणे त्यापैकीं राजश्री हणमंतराव मोहिते यासी वरात रुपये

*¶This unfinished letter reveals the attitude of Tarabai towards Raghoji Bhonsle, evidently after the death of Shahu.*

No. 187] [March 1748 ?

श्री

विनंती सेवक रामचंद्र बावाजी कृतानेक सेवेशी विज्ञापना. सेवकास इकडे येऊन च्यार महिने होत आले. अद्यापवरी दोन ताकीदरोखेहि सेवकाचे वस्तू करून घेववले नाही. यैसें असतां सेवकें उद्योग केल्याचा तपसील पत्रीं काय ल्याहावा? परंतु वजारतमाब यथून निघोन जाऊन मग ताकीदरोखे करून घ्यावे म्हणून स्वामीची आज्ञा. त्यास सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेबांचा विचार स्वामीसी परिछिन्न दुसरे प्रकारीचा नाहीं हे हा अंतर्भाव प्रथमच कळों आला. वजारतमाब बहुत मायावी, त्यांचा अंत कांही लागलाच नव्हता. बोलतात हेच प्रमाण भासोन साळढालीवरी होतो तों त्यांची स्थितरीत उघड करून स्वामीनी आज्ञा पत्रारूढ केली त्यावरून खबरदार होऊन त्यांतच सिरोन त्यांचे सर्व फैलांत[१] दरखुर (?) होऊन स्वामीचे पुण्यप्रतापें त्यांस हतोध्यम हतोत्साह केले. ज्या गोष्टीत बाईसाहेबांस त्यांचा तिरस्कार येई तेच गोष्टीचा त्यांजवळून अत्याग्रह करविला, तेव्हां यांत त्यांत विपर्यास येऊन वजारतमाब बहुत गलाव्यांत पडिले. फौज फुटून चालिली. दंगे बसोन फजिती करणार ते नित्य कजिये करीतच आहेत. कोल्हापुरी देणें किरकोळ वाण्यांउदमियाचें पंचवीस हजार आहे. तलंदग्यातून तळ उठावयासी कनिष्ठ पक्षीं दाहा हजार रुपये तऱ्हीं पाहिजेत. तलंदगेकराबाबत सापडलीं घोडी तितका यैवज कोठेहि ठेऊन गुंता उरकोन जावें म्हणून यत्न करितात. कोठेहि बनाव होत नाहीं. स्वराज्यांत कदीम सरदेशमुखीचे इसाफतीचे गांव दाहा बारा पेशजी यांकडे चालत होते. अलीकडे दुई वारल्यापासून चालत नाहीत. ते चालवावयाचा करार तोरगलीं जाला होता त्यांत यक गांव देऊं म्हणतात. राणोजी घोरपडे चिकोडीकर यांचे पारपत्य करितों, संरजाम सोडवितों, तो आपणास द्यावा, सावनूरकर सामिलातीस घेऊन हें कार्य आपण करितों, म्हणून म्हणत होते. त्यास जाब जाला कीं अधी घटपेपलीकडे दौलतराव वगैरे यांचा बंदोबस्त करून या, मग हेहि आज्ञा करूं. पलीकडील सिंदे नरगुंद व पथके स्वाधीन करावे म्हणून फारच आग्रह केला. ते गोष्ट परिछिन्न होत नाहीं म्हणून साफ सांगितले. स्वामीकडील संस्छाने दूर करून सरकारची सरकारांत ठेविलीं. तुम्हीं वजारतमाब यांचे मारफतीनें येऊन नवे तह करून यैवजाचा निर्गम करून देणें असीं पत्रें तयार करऊन त्यांस दाखविलीं. या प्रकारीचा घंटाघोष केला. वजारतमाब यांणी हे गोष्ट सातारा प्रेरून तेथून येणारांची पत्रें आलीं होतीं त्यांस वजारतमाब यांची उत्तरें गेलीं कीं

---

१ कारस्थान.

संस्थाने आम्हीं करून घेतलीं असा प्रगटार्थ जितका व्हावयाचा तितका होऊन जालीं पत्रें निर्माण जाले जागांच राहिलीं. पलीकडील सुभे व पालेगार व जागीरदार यांस साहित्यपत्रें तयार जालीं आहेत तीं पत्रें व यक घोडा व रवानगीची वस्त्रें देऊन रवाना करणार. सर्व गोष्टीनें खटे बेजार जाले. परंतु देणेदाराचा व तल सुटावयाचा धीर निघाला पाहिजे याकरितां बहुतच बजीद होउन घोडी व बोली पंचवीस हजारांच्या आहेत, ह्या घेऊन वाण्या उदम्यांचे हवाले द्या आ(णि) नकद दाहा हजार रुपये द्या म्हणिजे आपणास सर्व पावले, म्हणून मगरमिठी देऊन बसले आहेत. बाईसाहेबास समाधान नाहीसें जालें आहे. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramchandra Bawaji writes how according to instructions he worked up dissensions between Murarrao and Jijabai of Kolhapur and brought about his departure.*

---

*No. 188*] [*End of 1750?*

**पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व तथा**
**राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी**

विनंती उपरी. करवीरवासी वारणेअलीकडे उतरून कृष्णा वाळव्याजवळ पार जाले. समुद्रेश्वराजवळ डोंगर चढोन अंताजीपंताचे फौजेजवळ आले. तेहि सडे भेटीस गेले होते. हा भाव पेशजी लिहिलाच होता. त्यास धामणेरे यास रमणा (?) झाडी आहे त्या झाडींत येऊन राहिले होते. दुसरे वर्तमान तासगांवचे आबराईत आले होते. बतीस राऊत निवडक समागमे होते. तिकडून अंताजीपंताचे फौजेने यावें, हे ते मिळोन सातारा यावें असा मनसबा होता. परंतु चिमणाजी बापूजी व उदाजी चव्हाण यांचा जमाव जाला. येथे आम्हांस कळोन आम्हीहि सावधता केली. स्वामीनी पुण्याहून फौज पाठविली हेहि आवाई पडली त्याजमुळें माघारे फिरोन गेले. दंग्याची गोष्ट जाली होती खरी. स्वामीचे प्रतापे विध्वंस ग्रंथ जाला. माघारे गेले म्हणोन धनाजी थोरात याणी सांगोन पाठविले त्याजवरून लिहिले आहे. आम्हाकडील बातमीहि येईल त्याचे वर्तमान लिहिलें जाईल. तासगांव म्हणजे येथून सा कोस कृष्णेचे कांठी आहे तेथें संभाजी राजे प्रमाण आले होते. कळावें हे विज्ञापना.

¶*The writer Nana Purandare informs the Peshwa of the arrival of the Raja of Kolhapur near Valva and of the interview between him and Antaji Shivdev. They intended to proceed to Satara but on learning that troops had been dispatched from Poona they went back. Letter No. 228 should be read in conjunction with this.*

No. 189] [6-1-1752?

# श्रीलक्ष्मीकांत

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब
साहेबाचे शेवेसी

विनंती. सेवक रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा कृतानेक विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ता। छ ९ माहे रबिलावलपर्यंत साहेबांचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. संक्रमणप्रयुक्त तिळशर्करा खलिती १ एक शेवेसी पाठविली आहे प्रविष्ट जाहलियाचे आज्ञापत्र सादर करणार साहेब धनी आहेत. शेवेसी विदित व्हावें याजकरितां विनंती लिहिली असे. सेवेस श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Raghoji Bhonsle sends Tarabai the customary present of* tilgul, *with the compliments of the season.*

---

No. 190] [12-1-1752

# श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजश्री अंताजी सिवदेव यासी आज्ञा केली येसीजे. पागा बारगीर तबेला घोडी २० व येडका १ व पखालेचा बैल १ यांसी दररोज व दरमा जिनस व नगद येणे प्रो

| गला दररोज बारुल | वजन पके | वाख दर माहा वजन पके |
|---|---|---|
| ८।।।२।।। हरभरे | ८८।. तेल दररोज | ८।. |
| ८।।२।। बाजरी | ८८१. लोणी दररोज | रोजमराबा। |
| | | यादी रु दरमाहा |
| ८१।।२। | ८८१। | १३७ |

येकून दाणा दररोज बा। चंदी दीडमण सवा दोन पाइली वजनपके दररोज सवासेर व वाख दरमाहा दाहासेर व रोजमरा बा। नेमणूक यकसे सततीस हा येवज रा। रत्नाकर विठल याजकडे देशमुखीचे येवजी पावत होता. हाली हे सनद तुम्हांकडून देविले असे, तरी देशमुखीचे येवजी देत जाणें. जाणिजे छ ६ माहे रबिलोवल सुा। सलास खमसैन मया व अलफ.

¶*Tarabai orders Antaji Shivdev to supply fodder for the cavalry horses, at the rates mentioned.*

3443

No. 191]

[14-1-1752

श्री

श्रियासह चिरंजीव विजईभव मार्कंडियांचे अयुशे राजाराम छत्रपति यासी प्रती दर्याबाई निंबालकर कृतानेक आशीरवाद उपरी. येथील कुशल ता। छ ७ माहे रबिलोवलपरियेत क्षेमरूप जाणून स्वकीये कुशल लेखण हरघडी करून संतोशा-अभिवृधि करीत असावें. या नंतर बहुत दिवस जाहाले, आपणाकडील पत्र येऊन चित संतोश होत नाही. तेणकरून चितास येकक्षण चैन पडत नाही, तर निरंतर आपल कुशलार्थ पत्री लेखण करून चित समाधान पावे ते केल पाहिजे. संक्रमणाची तील व शेरकरायुक्त पाठविले आहेत ते स्वीकारिले पाहिजे. बहुत काये लिहिणे? लोभ असो दीजे हा आसीरवाद.

¶*Daryabai Nimbalkar sends Sankranti greetings to her brother Chhatrapati Ramraja.*

---

No. 192]

पाहिलें

[23-2-1751

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसीं

विनंती. सेवक हरबाजी राम कृतानेक सां। नमस्कार विज्ञापणा ऐसीजे. येथील कुषल तागायत छ ७ माहे रबिलाखर स्वामीच्या कृपाविलोकणेकरून येथास्थित असे. यानंतर स्वामी कृपाळू होऊन आज्ञापत्र सादर केलें तें सिरसाह वंदिलें. शहरचा पैका घेणे तो व बोलणे तें राजश्री हरि दामोदर यांजसी बोली लावणे म्हणून आज्ञा व अबदुल खैरखांजसि थैली पाठविली ते राजश्री चंद्रभान मुधाजी व सेवकाणी प्रविष्ट केलीं. उत्तर प्रतिउत्तर जालें. शहरची बोली राजश्री हरिपंत फैसल करितील म्हणून आज्ञा हें जाहीर केलें. तों पातशाहाचा फर्माण व नवाब गाजो-दीखानाचा इनायतनामा बऱ्हानपूरचे सुबेदारीचा व खानदेशाचा खान वालाशान खोजम कुलीखांजसि आला, तेव्हां खैरखांजीणी कुल आमला फैला त्याजकडे रुजू केला, आणि सेवकास उत्तर दिलें, कीं आतां सालजाब त्यासी लावणे. त्यास सालजाब खोजम-कुलीखांजीसी केला. याणी उत्तर दिलें तें तपशिलवार चंद्रभानजीनी सेवेसीं लिहिलें आहे त्यावरून विदित होईल; व स्वामीस खोजमकुलीखांजीणी थैली पाठविली आहे त्यावरून विदित होईल व आज्ञेप्रमाणें खैरखांजीचा व खोजमकुलीखांजीचा सालजाब

राजश्री हरिपंतास लिहिला आहे विदित होये. राजश्री महिपतराव कवडे व राजश्री हरिपंत व राजश्री बापूजी भीवराव हे फौजेसहवर्तमान शेरबेगच्या बहादुरपुन्यास आहेत व गाईकवाडची फौज नां(मं)डव्या जवळ आहे. येक लडाई जाली. यांहीं गाईकवाडाचे पांच सरदार व हजार हजार बारासें माणसें मारलीं म्हणून छ मजकुरीं हरकारे आले त्याणी बातनी सांगितली. पुढें वर्तमान येईल तो लिहून. गाजीदीखांजी हस्तनापुराहून बाहीर निघाले नाहींत. निघणार आहेत म्हणून वर्तमान आहे. पुढें जैसी आज्ञा होईल तेणेप्रमाणे सुभ्यासी सालजाब करून. विदित होये हे विज्ञाप्ति.

*¶Harbaji Ram reports the talk that he and Chandrabhanji had with Khojam Kulikhan after the latter had received despatches from the Emperor and Ghazi-ud-din. He also describes an encounter between Mahipatrao Kavade, Haripant, Bapuji Bhivrao and the Gaikwad.*

---

*No. 193]* *[26-6-1752*

पोछ २८ रजब.

**श्री**

**श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब**
**साहेबाचे सेवेसी**

विनंती. सेवेसी सेवक मंबाजी सोनवणी हवालदार व कारकून दिा श्री मुाा किले प्रतापगड साहेबाचे सेवेसी विज्ञापना. ताा छ २२ माहे रजब सन सलास खमसैन पर्येंत सेवकाचे वर्तमान येथास्थित आसे. श्रीच्या पडशालाचा शाकार करावयाबदल जावली सुभाहून कुंभार सालाबाद येतात; त्याप्राा सालमजकुरी रोखे करून कुंभार आणविले. त्यास मौजे लाखवड ताा सोलसे व मौजे उचाट ताा कानदखोरे या हरदू गावच्या कुंभारानी रोखे माघारी दिल्हे. परजन समीप आला, तरी हरदू गावच्या कुंभारास मुजरद हुजरे पाठऊन कुंभार गडास येत आणि शाकार होये येसे करणार साहेब खावंद असेत. शाकार तटला आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञप्ति.

मराठी
अस्पष्ट
शिक्का

***¶The Havildar of Pratapgad requests Tarabai to arrange without delay for re-thatching of the roofs of the outhouses of the temple of Goddess Bavani.***

No. 194] [5-7-1752

श्री

वर्कू जमा माहाल जामदारखाना सरकार श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब सुा सलास खमसैन मया व आलफ. जमा माहाल जामदारखाना निा दरुनी माहाल वाडा १ पैकी गुा लखमोजी भोसले खोजे व विष्णु नरहरि व सिवाजी जामदार खरिदी कापड गुा विठलभट पैठणकर सन तिसापैकी रुपये ४००० च्यार हजाराचे कापड पैठणाहून आणविलें. कैलासवासी सखवारबाई याणी आणविले ते परभारें लिंगापा नाईक तांबवेकर याजकडे अमानत ठेविले. त्याची चौकसी सरकारात होऊन कापड आणविले त्यापैकी जमाई सनगे

१ मंदील हिरवा छडीदार किमत रुपये यैन १०७

१ पातळ महताबी किनारा आस्वली किा ७००

२ पातळे सेलारी

१ पंचरंगी आडकणीदार किा १९५

१ बादली आडकणीदार किंमत २२५

२ ४२०

९ चिराडिया

| | | |
|---|---|---|
| १ | निंबोली किमत रुपये | ७५ |
| १ | केसरी किमत | ४७ |
| १ | पंचरंगी किमत | ८५ |
| १ | कुसुंबी शालूची | ६५ |
| १ | कसरी किमत | ६५ |
| १ | कुसुंबी छडीदार | ८८॥ |
| १ | हिरवी खसखसी किा | ९४ |
| १ | बनोसी छडीदार किा | ९५ |
| १ | बादली सोनेरी किा | ९८ |
| ९ | | ७१२॥· |

२ चोलखण जरी कुसुंबी जालीदार ३३।·

१५ १९७२॥।

० पेठेचा खर्च बाा पटी रुपये २१०

२१८२॥।·

सनगे सुमारी पंधरा सनगे किमत रुपये येकवीशे पावणेत्र्याऐसी जमा आसे.

छ ४ रमजान

¶*This paper illustrates how outstanding accounts of purchases were adjusted. Sakwarbai referred to in the paper was the Rani of Shahu who performed sati and the account of her wardrobe is here mentioned.*

3446

No. 195] [6-8-1752

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजश्री इंजोजी कालभार यांस आज्ञा केली येसीजे. तुम्हास हुजूर दर्शनास यावयाविसी आलाहिदा आज्ञापत्र सादर केले असे, तर देखतपत्र हुजूर दर्शनास येणे. या कामास सखोजी पोल व हरजी बागूल हुजरे पाठविले यांसी खर्चास रुपये १० पनास देविले आसत. आदा करणे. जाणिजे छ ७ सवाल सुरु सलास खमसेन मया अलफ. (बहुत) काये लिहिणे !

लेखन शूध.

बार सुद सुरुसुद बार

¶*Order issued by Tarabai summoning Injoji Kalbhor to her presence.*

---

No. 196] [14-10-1752

पौ छ ९ जिल्हेज सुा

सलास आश्विन शुध दसमी

श्री

**श्रीमंत तीर्थरूप मातुश्री आईसाहेब**

**वडिलाचे शेवेसी**

अपत्ये सभाजे राजे साष्टांग दडवत प्रणाम विनंती उपरी. अत्रत्य कुशल आश्विन शुध सप्तमी मंदवारपर्यंत असे. प्रस्तुत बहुत दिवस जाहाले, परंतु वडिलाकडून पत्र येऊन वृत निवेदने संतोष होत नाही. तर यैसी गोष्ट नसावी. निरंतर आसीरवादपत्री आनंद होये ते गोष्ट केली पाहिजे. वरकड कितेक आज्ञा राजश्री येसवंतराव गायेकवाड यास केली आहे. सविस्तर वडिलांस लिहितील त्यावरून कलो येईल. उतर सत्वर पाठऊन द्यावे हे विनंती.

¶*Sambhaji Raje of Kolhapur writes to Tarabai, enquiring after her health.*

---

\+ संभाजीराजे ह्यांचें हस्ताक्षर.

No. 197] [25-10-1752

पो छ १७ माहे
जिल्हेज सुा सल्लास
खमसेन मया व अलफ

श्रीगजाननवरद

तीर्थस्वरूप माहाराज मातुश्री आईसाहेब
साहेबाचे सेवेसी

आपत्ये सखुबाई निंबालकर दंडवत विनंती उपरी. येथील क्षेम जाणून स्वकीये स्वानंद लेखनाज्ञा करीत गेले पाहिजे विशेष. अवदा फलटण देसी पर्जिन्य मुतलख नवता. बरंग[1] पडले. तो राजश्री पेशवे यांची पत्रे आली जे अविलंबे स्वार होऊन येणें. त्यावरून बमयेफौज चिरंजीव बाबा पेशव्याकडे साहेबाचे भगवे निशाणाची सेवा करावी यैसे जाणोन गेले. सांप्रत्य माहादाजी निंबालकर याचे रोखे व किले ताथवडा याचे रोखे देसात गावगना बकरी व मसाले ऐसे जाले आहेत. त्यावरून कुल रयेत तजावजा जाली आहे. यास्तव सेवेसी पत्र लिहिलें आहे. आजीपावतो दुसरा कोणाचा रोखा देसात जाला नवता; आणि अवदा नवी गोष्टी जाली. आम्हास तो आपणा वेगला दुसरा अस्त्रये कोणाचा नाहीं. उभयेतासहि ताकीद करणार साहेब समर्थ आहेत. विशेष काय लिहिणे. कृपा निरंतर असो दीजे विनंती.

¶*Sakhubai Nimbalkar complains to Tarabai against the rapacity of Mahadaji Nimbalkar.*

---

No. 198] [14-11-1752

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणी राजश्री बाबूराव भोसले यासी आज्ञा केली येसीजे. रा तानाजीराव खानवलकर यांची माणसे कागद घेऊन राजश्री कानोजी मोहिते याजकडे गेली होती. त्यांस तुम्ही माणसे आपणाजवल ठेऊन घेतली म्हणून हुजूर विदित जाले. तरी तीं माणसे हुजूर पाठवणें. जाणिजे छ ७ माहे मोहरम सुा सलास खमसैन मया अलफ.

¶*Tarabai orders Baburao Bhonsle to send back the messengers whom he had detained on the way.*

---

१ रोगांची साथ.

No. 199] [20-11-1752

## श्रीआई आदिपुरुष

### सकलगुणअलंकर्ण अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य
### राजश्री बाळाजीपंडित स्वामी गोसावी यासी

पोष्य जगजीवन परशराम कृतानेक नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करविलें पाहिजे विशेष. पूर्वी आपले पत्र आले होते जे राजश्री त्रिंबकराव यासमागमें कांही फौज पाठऊन तुम्ही तिकडील बंदोबस्तास राहणे म्हणून लिहिले होते, त्याजप्रमाणे त्रिंबकरायासमागमें फौज पाठवावी तरी त्रिंबकराव निघोन गेले. याजकर्डाल इकडील बंदोबस्त करून दक्षणेकडील मनसबा घडत होता तो विघड करून राजश्री गमाजीस दीड हजार फौज नामी लोक बराबरी रवाना केला; इतकियांत राजश्री बाबूराव सदाशिव आपल्याकडे यावयासी म्हणून निरानरसिहपुरापावेतो जाऊन तेथें मुकाम करून जमाव पाच सातसें राऊत करून राजश्री आबाजी नाईक यांसी पुढे किला ताथवडा[1] येथे पाठऊन आपण लोकिकांत गेले ऐसे दृश्यमान करून एकाएकी निघोन ताथवडियास आले. आम्ही सातारा श्रीमंत मातुश्रीच्या दर्शणास गेलो होतो. राजश्री यमाजीपंत किणयेस होते. बातमी समागमें लष्करात होती. छ १२ मोहरमी बातमी कळतांच आम्ही निघोन किणयेस आलों. पुढे नाइकावरी फौज पाठऊन विचार करावा तो उभयता नाइक मजकूर किणयेस येऊन मध्यस्त घालून सांगोन पाठविले कीं भेटी घेऊन जाऊं. घरास आलियानंतर इतर अर्थ न करावा. याजकरितां भेटी होऊन निरोप दिला. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

¶*The visit of both Babuji Naik and Abaji Naik to fort Tathavda and further on to Kinhai is communicated to the Peshwa by Jagjivan Parashram Pratinidhi.*

---

No. 200] [20-11-1752

## श्रीआईआदिपुरुष

### पुरवणी राजश्री बाळाजी पंडित स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी. छ १२ मोहरमी उभयता नाईक मजकूर आमचा निरोप घेऊन सातारियास जाऊन रविवारी छ मजकुरी अस्तमानीची घटिका रात्रीं मातुश्रीचे दर्शण घेतलें, दुसरे दिवशीं इंदुवारी छ १३ रोजी जिवाईचे वाडीजवळी डेरा देऊन राहिले आहेत. वरकड त्याचे कर्तुत्वाचा अर्थ व विचार राजश्री दिनकर महादेव

---

१ संतोषगड, शंभुमहादेवाजवळ.

याणीं लिहिलाच असेल अगर लिहितील. मुख्य त्यास आणून आमचे पारपत्य करऊन पुढें आणिखी पारपत्ये करून राज्याचा बंदेज करावा हे मानस राजश्री मानसिंग जाधवराव याचे आणि या कर्मात अग्रगणी मध्यस्त बाळाजी केशव, विष्णुपंत[१] याचे भाचे ते कुलदिवाण जाधवराव यांचे. पुढेंही योजिला अर्थ सिधीस न्यावा हें मनोगत जाधवरायाचे आहे. तदनरूप योजना करीत आहेत. याज-मुळें राजश्री गमाजीचे राहणे जाले आणि पूर्वी आम्ही येविसीची सूचनाहि आपल्यास लिहिली होती जे पांचसातसे फौज लौकिकास्तव आमच्या साहित्यास व कोणी दरमियाने लबाडी करील त्याच्या पारपत्यास घाटाखाले पाठवावी. परंतु तेथील मनसबियामुळे चितांत अर्थ न आला. प्रस्तुत येथें हें कुचोद्य उभे राहिले आहे. महतर पद द्यावें हेहि मनोगत जाधवरायाचे आहे. देतीलच. परंतु पारपत्य आपल्या चितांत करावयाचे असेल तरी राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ यांसी लेहून दोन हजार फौज आमच्या साहित्यास पाठवावी. त्यांत सर्वहि बंदेज वडोन येतील. येविसी अनमान न करावा. आमचा सर्व विचार आपल्यावरी आहे. आपण उदासता न करावी. प्रस्तुत माणसे ठेवावयासी कोठे स्थळ नाहीं. येविसीची विचारणा आपण चितांत आणून मनुषास स्थळें योजून पाठविले पाहिजे. मार्गप्रतीक्षा करीत आहों. कलले पाहिजे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

¶*The Pratinidhi Dadoba requests the Peshwa to help him against the mischief contemplated by Babuji Naik with the help of Manaji Jadhav.*

---

*No. 201]* *[16-12-1752*

**श्री**

**अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री**
**दिनकर माहादेव गोसांवी यास**

सेवक विश्वासराऊ बलाल नमस्कार सुर सन सलास खमसैन मया व अलफ. तीर्थरूपांनीं लष्करांतून तुम्हांस पत्रें लेहून पाठविलीं आहेत, तीं तुम्हांकडे पाठविलीं आहेत, यांजवरून सविस्तर वृत्त कलेल. तीर्थरूपांनीं मनसब्याचे अर्थ व कर्तव्य पदार्थाचा विचार सर्व लिहिला आहे तो पुर्ता समजोन जो विचार करणें तो करून आम्हांस येथें लेहून पाठवीत जाणें व तीर्थरूपांकडे वरचेवर लेहून पाठवीत जाणें. तुम्ही लिहून पाठवाल त्या अन्वयें येथून साहित्याची तरतूद सर्वहि

---

१ विष्णु विश्वनाथ ? (ले. ७९ पहा.)

होऊन येईल; परंतु बावरपणें न लिहिणें. दम धरून पुर्ती शोध करून लिहीत जाणें. तुम्ही जो मजकूर ल्याहाल त्याप्रमाणें साहित्य उपराला सर्वहि होऊन येईल. परंतु मुख्यत्वेंकरून सर्व प्रकारें प्रतिनिधीपासून नेट धरवावें. यांणीं त्याचें विश्वासावर जाऊन न फसावें. येविशींची सावधता तुम्ही वरचेवर करावी, आणि दिवसाचें नित्य वर्तमान वरचेवर आम्हांस लिहीत जावें. फौजेचीं पथकें आणविलीं आहेत. दोन तीन हजार फौजहि थोडेंच दिवसांत जमा होईल. हशम वगैर सरंजामहि पोख्ता पुणियास याउपर राहीलच, परंतु तीर्थरूपांचे लिहिल्याप्रमाणें सर्वहि मनसब्यांचे सुकाण मंत्रभेद होऊं न देतां राखावें. हालींचे पत्रींचे भाव इतर कोणासहि कळूं न द्यावे. ज्यांसी प्रयोजन त्यांसीच तुम्ही सर्व प्रकारें बोलून ते काईम राहात तें करावें. रवाना छ ९ माहे सफर. (लेखनसीमा.)

¶*Visvasrao Ballal cautions Dinkar Mahadev to use the greatest circumspection in obtaining accurate information about the Naik's movements and to act accordingly for preventing trouble.*

---

*No. 202]* *[28-11-1752*

**श्री**

**अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री**
**दिनकर माहादेव गोसांवी यांसी**

सेवक विश्वासराऊ बलाळ नमस्कार सुहूर सन सलास खमसैन मया व अलफ. तुम्ही तीर्थरूपांस पत्रें पाठविलीं तीं पावलीं, त्यांचीं उत्तरें आलीं तीं पाठविलीं आहेत, त्यावरून कळेल. तेथील वर्तमान वरचेवर नवल विशेष अढळत जाईल व कळेल तें लेहून पाठवीत जाणें. जाणिजे छ २१ मोहरम. तुम्हांकडील बाळाजी गणेश आले होते त्यास सांगणें तें सांगोन तुम्हांकडे पाठविलें आणि सांगितलें कीं तुम्ही जातांच सांगितले मजकुराचे सविस्तर जाबसाल लिहून पाठवावे, त्याचें उत्तर कांहींच पाठविलें नाहीं; व वरकडहि कांहीं नवलविशेष पूर्वी तुम्ही पत्र पाठविलें होतें त्या अलीकडे लिहिलें नाहीं. तर निरोपाचा जाबसाल व नवलविशेष वर्तमान वरचेवर सर्वदां लिहून पाठवीत जाणें. नवीन गृहस्थ आले आहेत त्यांची फारशी वळवळ असली आणि जरूर फौजेचा दबाव पाहिजेसे असेल तर तैसेंच लिहून पाठवावें. फौजहि जमा केलिया होईल, परंतु जागजागां जफ्तीचे कामावर आहे. विना प्रयोज्यन जमा केलिया काम बुडेल तर अंतरबाह्य सविस्तर शोध करून सत्वर लिहून पाठवणें, त्याप्रमाणें तरतूद केली जाईल. छ मजकूर

तीर्थरूपांचे पत्रीं तुम्हांस मोगलांकडील वर्तमान लिहिलेंच आहे. त्यास खुलासा मजकूर. सर्वप्रकारें यंदां आपली जबरदस्ती, मोगलाचें बळ कमी, परंतु केवळ बुडऊन नेसनाबूद करूं म्हणतील तर आगीचें बळ, त्याबद्दल इकडील व तिकडील व मुलकाची खराबी फार होईल, यास्तव विवेकावर घेऊन सलाच मोगल गळां पडून करतो तो करावा. ये समयीं त्यांस रक्षावें हाच विचार होईलसा दिसतो; तथापि ईश्वरी इच्छा न कळे. याउपरहि नवल विशेष येईल वर्तमान तें लिहून पाठविलें जाईल. छ मजकूर. (लेखनसीमा)

¶*Vishvasrao Ballal to Dinkar Mahadev, assuring military help for the Pratinidhi and reporting the overtures for peace with the Nizam. This is the first initiation of the rising son of the Peshwa into the affairs of state.*

---

*No. 203*] [*30-12-1752*

**श्री**

**अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री**
**दिनकर माहादेव गोसांवी यांसी**

सेवक विश्वासराऊ बलाल नमस्कार सूर सन सलास खमसैन मयां व अलफ. तुम्ही छ २२ सफरचीं पत्रं पाठविलीं तीं पावलीं, लिहिलें वर्तमान सविस्तर विदित जाहालें. राजश्री प्रतिनिधीचे उपराळियास फौज पाठवावयाचा मजकूर लिहिला तो साद्यंत कळला. ऐशियासी पूर्वी फौज पाठऊन द्यावयाविशी तुमचीं निकडीनें पत्रें येत होतीं तों मध्यें तीर्थरूपांचा व मोगलाचा सला जाहाला त्यामुळें नाईक दबलेसे जाहाले, याजकरितां फौज पाठविली नाहीं; परंतु कोणे वेळेस कोणता समय पडेल हें कांहीं कळत नाहीं. फौज जवळ असावी हा भाव चित्तामध्यें आणून गंगथडी प्रांतें राजश्री दादो महादेव व खंडेराऊ बरगे फौजसुद्धां होते त्यास पत्र लेहून पाठऊन आणविलें. ते लौकरच येतील ऐसें समजोन तुम्हांस लिहीत गेलों कीं फौज पाठवितों; परंतु फौज नाशिकचे गढीस मोर्चे देऊन गुंतली आहे. इतक्या दिवसांत गढी हस्तगत जाहाली असेल अथवा आठां चहूं दिवसांत होईल, तदनंतर फौज येईल, आली म्हणजे पाठऊन देतों. फौज नाशिकचे गढीस गुंतली नसर्ती तर येतीच. आतां मोर्चे दिल्हे असतां उठऊन आणावी, तेव्हां बदनक्ष होतो आणि लौकिक फटकळ होतो; याजकरितां कार्य जाहालियाविरहित आणितां येत नाहीं, हा विचार तुम्हांसहि कळतच आहे. यानंतर राजश्री मल्हारजी होळकर यांजकडील मजकूर लिहिला तो साद्यंत कळला. ऐशियास ह्या गोष्टी त्यांजपासून कदापि घडणार नाहींत, त्यांणीं बहुत देखिलें आहे व बहुत ऐकिलें आहे. विचारी पुरुष आहेत, अविचारी नाहींत. रुसोन आले याजमुळें, शिपाई आहेत, ऐखादे

समर्थी बोलून दाखविलें असेल त्याजवरून राजकारणीं मनुष्यें आहेत त्यांणीं आपपल्यें भावें घेतलें असेल; इतका मजकूर असता तर येथें आम्हांस कांहीं तरी अढळता, आम्ही ते गोष्टीची पैरवी करणें तैशी करितों. त्यांच्या घरीं हा मजकूर कांहींच आढळत नाहीं. तुम्हांस खरें अथवा लटकें जें वर्तमान आढळलें व कळलें तें आम्हांस कळावें याजकरितां लेहून पाठविलें; उत्तम गोष्ट केली. आम्ही त्यांजकडील बातमी राखणें तैशी राखीत जाऊं आणि आढळेल वर्तमान तें तुम्हांस लेहून पाठवीत जाऊन. तुम्हांस तेथें जें वर्तमान अढळत जाईल व कळेल तें खरें असो अथवा लटकें असो; परंतु वरचेवर लेहून पाठवीत जाणें. लेहून पाठवावयाविशी आळस येकंदर करीत नव जाणें. तुम्ही तेथील वर्तमान तपशिलवार लेहून पाठवितां हे गोष्ट उत्तमच आहे, येणेंकरून तेथील सर्व वर्तमान कळोन सावधतेस अंतर होत नाहीं. आम्हांसहि राजश्री प्रतिनिधि व राजश्री येमाजीपंत फौजेविशी लिहीत असतात, आम्हीहि त्यांस समाधानपूर्वक फौज येतांच पाठऊन देतों म्हणून लिहितों; परंतु अडचणीचे पर्याय जाले ते तुम्हांस कळावे म्हणून सविस्तर लिहिले असेत. हालीहि मागतीं त्यांजकडे पत्रें पाठविलीं आहेत कीं गढी फत्ते जाहाली असली तरी लौकर येणें. कार्य जालियानंतर तेहि लौकरच येतील. नवल विशेष दिनचर्येचें वर्तमान सर्वदां लिहून पाठवीत जाणें. प्रतिनिधीकडील तीन चिठ्या पाठविल्या त्या पावल्या. रवाना छ २३ सफर

लेखन सीमा.

¶*Vishvasrao Ballal to Dinkar Mahadev, assuring him that reinforcements would be sent to the Pratinidhi as soon as they would be available after the successful conclusion of the siege of Nasik where they were employed. News about Malharrao Holkar's treachery was also received : but the writer says in a very interesting and informing letter that it may not be true.*

---

*No. 204*] [*9-7-1752 ?*

**श्री**

**राजश्री पंत प्रधान**

**गोसावी यासी**

॥ श्रीमंत सकलगुणअलंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये स्नेहांकित +राघोजी भोसले व जोगोजी भोसले व माधवराऊ भोसले व हणमंतराऊ भोसले

+ हा नागपूरकर नव्हे.

कृतानेक दंडवत विनंती. येथील क्षेम ता। आशाढ शुध दशमीपर्यंत येथास्तित जाणऊन स्वकीये स्वानंदवैभवादिलेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशेष. येथील वर्तमान पूर्वी सेवेसी लिहिले त्यावरून श्रुत जाले असेल. तहाचा मजकुर राजश्री दमाजी गायेकवाड व राजश्री देवजी ताकपीर व रा। माधवराऊ निंबाजी व रा। मलार गोविंद यानी तहाचा मजकूर घातला, परंतु धातुपोशण दिसते. प्रस्तुत मातुश्रीबाई भाडगावीहून अंत:पुरास गेली. तेथून आलियावरी जे होणे ते आपले प्रतापे करून होणे ते होईल. पर्वताचा मजकूर तर परस्परें शामलाचे साहित्या जकिरा व नूतन शामल भरणा भारी होऊन बंदोबस्ती करितात. सारांष साहेबानी आमचा हात धरून अभिमान धरिला त्याचें सार्थक करणार आपण समर्थ आहेत. वरकड कितेक सविस्तर वर्तमान रा। संकराजीपंत व रा। माणको नागनाथ सेवेसी पाठविले आहेत, ते निवेदन करितां श्रुत होईल. बहुत काय लिहिणे, कृपा निरंतर असो दिल्ही पाहिजे हे विनंती.

मोर्तब
सुद

¶*The move for negotiations started by Damaji Gaikwad and Devji Takpir is communicated to the Peshwa by the Bhonsles Raghoji, Jogoji, Madhavrao, etc., probably employees of the Senapti.*

---

*No. 205*] [*1752 ?*

श्री

यादी आईसाहेबांच्या पत्राचा जाब. साहेबीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. राजश्री येमाजीपंत यांणी आपणांकडील चिमणाजी विठल याजबराबर जमाव देऊन जावली सुम्या प्रांतें रवाना केले आहेत, ते किल्ले प्रतापगडास उपद्रव देणार म्हणोन विदित जालें, तरी येविशी येमाजीपंतास ताकीद करून सांगोन किल्लयास उपद्रव न लागे तें करणें म्हणोन आज्ञा केली. ऐसियास राजश्री येमाजीपंत पुणियांत होते ते प्रस्तुत लष्करांत आले आहेत. ये गोष्टीचें वर्तमान मनास आणून येविशी मशारनिलेस ताकीद करून सांगोन किल्लयास उपद्रव न लागे ते गोष्टी करूं.

येणेंप्रमाणें पत्र लिहावयाची आज्ञा जाली.

¶*Tarabai agrees to issue orders to Yemaji Shivdev not to molest Pratapgad.*

3454

No. 206] [21-12-1752

श्रीभवानीप्रसन्न

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी

विनंती. सेवक येमाजी सिवदेऊ कृतानेक नमस्कार विज्ञापना. ताा छ १४ मोहरम मुकाम किणये स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील दिनचर्येचे वर्तमान राजश्री पंतप्रतिनिधि यांचे पत्री लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. राजश्री प्रतिनिधिपंत यांसी स्वामीविना दुसरे दैवत नाहीं. स्वामीच्या चितात जो अर्थ येणे तो सुखी येऊ. सारांष गोष्टी येथील मनसबा एकच आहे. जो स्वामीच्या अकल्याणाच्या (गोष्टी) बोलतो त्याजवरी दया मातुश्री करिता(त). राजश्री जाधवरावहि त्यासी स्नेह करितो व जो स्वामीच्या कल्याणाची गोष्ट बोलोन जाबसाल करितो त्याचे पारपत्य करावयाचे चितावरी घेतात. हा अर्थ स्वामीच्या चितात न आला तरी आमचा इलाज काय? सारांष गोष्टी पंत-प्रतिनिधीचे कबिले त्यांसमागमे फिरतील. जें घडावयाचें असेल तें घडो. परंतु आमची माणसें पुणियांत आहेत. कांहीं माणसें वस्तभाव, सिंगरे साठी, सतर कुणबिणी, देखील पुणियास रवाना करितो. परंतु नित्यकृत्याचे साहित्य व वरकड किरकोळहि साहित्य पाहिजे. स्वामी थोर आहेत याचा विचार केला पाहिजे. आम्हास तो दुसरी गति नाहीं. श्रीमंत राजश्री पंत प्रतिनिधि यांच्या कबिलियास स्थल नेमून देणे. स्वामीसहि विदित आहे. स्थळ नेमून देणार स्वामी समर्थ आहेत. चिरंजीव राजश्री त्रिंबकराव शेवेसी पाठविले आहेत यांचे पालन करणार स्वामी थोर आहेत. सर्व प्रकारें सांभाळ केला पाहिजे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Yamaji Shivdev to the Peshwa, assuring him of his own and the Pratinidhi's loyalty and requesting protection for himself and family at Poona against the machinations of Tarabai.*

---

No. 207] [7-6-1752?

श्री

तीर्थरूप श्रीमंत माहाराज मातुश्री

आईसाहेब साहेबाचे सेवेसी

अपत्ये कानोजी मोहिते दोनी कर जोडून सिर सां दंडवत विनंती. ताा छ ९ शाबान पावेतों साहेबांचें कृपाद्रिस्टीकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. साहेबीं आज्ञापत्र पाठविले, पावोन बहुत समाधान जाहाले. तेथे आज्ञा

जे सिबंदी उतरून देणें म्हणोन आज्ञा; त्यास सिबंदीनें गवगवा बहुत केला आहे तो पत्रीं लिहितां पुर्वत नाही. रोज उठोन गवगवा करितात. सिबंदीचे पाई पनास हजारपावेतों खाली आलीं. त्यास उस्तवारी करणार साहेब धणी आहेत. उस्तवारी करून लोकांस निरोप द्यावा लागतो. साहेबी उस्तवारी करून दिली पाहिजे. साहेबांचे आज्ञेखेरीज नाही. ज्याप्रां हुकूम होईल त्याप्रां वर्तणूक करीन. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Kanhoji Mohite requests Tarabai to liquidate the debt in which he is involved on account of the expenses of his army, before it could be distanded.*

---

*No. 208]* *[27-1-1753*

**श्री**

**श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब**
**साहेबाचे सेवेसी**

विनंती. सेवक सिवाजी सालोखे कृतानेक विज्ञापना. ताा छ २१ रबिलौवल पावेतो साहेबाचे कृपावलोकनेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे. यानंतर राजश्री उदाजी चव्हाण व राजश्री मालोजी घोरपडे मुधोलकर व राजश्री आबाजी घाटगे कागलकर व चिकोडीकर वगैरे पालेगार व राजश्री स्वामी करवीरवासी यांची हुजरात व निशान यैसे पाच सात हजार राऊत प्यादे जमा होऊन आजी महिनाभर मिरज प्रांतात येऊन प्रांत आवघा खराब जाहला. येविसी कुमकेचा अर्थ व खर्चाचे बेजमीविसी साहेबाचे सेवेसी विनंतीपत्रें पाठविली. परंतु कुमकहि येऊन न पोहचली व खर्चाचीहि बेजमी न जाली. सोनीचे ठाणेस वेढा घालून बैसले. चिरंजीव राजश्री आगनोजी सालोखे कबिलेसुधा देखील वोडी पिडी आदि करून ठाणेत होते. आत पाणियाचा तोटा जाहला व बाहेरून कोणाची कुम(क) न जाली, याजमुळे ठाणे जेर होऊन घेतले. तेथोन निघोन-मिरजेवरी येणार यैसा मजकूर आहे. याचा विचार साहेबी करावा. दिवसे-दिवस फौज भारी होत चालिली. सेवकावरी निदानचा प्रसंग प्राप्त जाहला आहे. यास्तव सेवेसी विदित व्हावे म्हणून विनंतीपत्री लिहिले आहे. तरी अशा समयात कुमक येऊन पोहचल्या किल्याची व सेवकाची शरम राहती आणि साहेबाचा जागा जतन होतो. राजश्री पंत प्रतिनिधि व राजश्री बाबूराव व हुजरात यांची रवानगी होऊन सत्वर येऊन पोहचलेल्यानें गनीमाचा पराजय करणार साहेब धणी समर्थ आहेत. दारूगोली दाणा सामानाविसी साहेबास पेशजी पाचसात वेळा लिहीतच आलो, परंतु उस्तवारी होऊन आली नाही तरी

खर्चाची बेजमी व दारुगोळीचे साहित्य व कांही बाण यांची उस्तवारी होऊन रवाना करणार साहेब धणी आहेत. सेवकाचे इनाम गाव दोन आहेत. त्यास साहेबी येक दोन वेळा परवानगी दिली होती. परंतु सनद आली नाही, तरी साहेबी सेवकावरी कृपाळु होऊन तांबवे[1] व नादगाव[1] या दोही गावच्या सनदा द्यावयासीं आज्ञापत्र पाहिजे. आम्हास साहेबाच्या पाया खेरीज दुसरे दैवत नाही. शेत्रु भारी जाहल्याने साहेबाचे उपयोगी नाही. यांत साहेब धणी आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Sivaji Salokhe complains to Tarabai against the depredations of Udaji Chavan, Maloji Ghorpade Karvirkar and others in the province of Miraj and requests her to send an adequate force to relieve him. Take Nos. 230 and 233 with this letter.*

---

*No. 209*] [*13-1-1753*

पो छ १२ रबिलोवल

**श्री**

**श्रीमंत माहाराज तीर्थरुप मातुश्री आईसाहेब**

**साहेबाचे सेवेसी**

अपत्येवत पार्वतीने कृतानेक विज्ञापना. ता छ ७ रबिलावलपरिंत साहेबाचे कृपाद्रिष्टीकरून आपल्याकडील वर्तमान येथास्तित आसे विशष. साहेबांचे सेवेसी संक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले आहेत. वडिली स्वीकारावे. प्रविष्ट जाहलेचे प्रतिउत्तर द्यावया आज्ञा केली पाहिजे. यानंतरी या प्रांतात राजेश्री उदाजी चव्हाण हिमतबहादर याची फौज आली आहे. समागमे पलीकडील माहाराज राजश्री स्वामी करवीरवासी याजकडील आहे. मिरजेनजीक नमजीवर (?) मुकाम आहे. मिरजकराचे त्याचे युध्ये जाहले. राजश्री प्रतिनिधि याची फौज रविवारी वांगीस आली. पुढे कोणीकड जाणार कलत नाही. सेवेसी श्रुत व्हावे याजकरिता लिहिले आसे. श्रुत होये हे विज्ञाप्ति

*¶Tarabai is informed by one Parvati that Udaji Chavan in conjunction with the forces of the Kolhapur Raja has invaded the territory of Miraj.*

---

[1] + कराडजवळील दोन गांवें.

No. 210] [18-1-1753

पौ छ २२ रबिलौवल

**श्रीराम**

**श्रीमन्माहाराज मातुश्री आईसाहेब**
**साहेबाचें सेवेसी**

विनंती सेवक घनशाम नारायेण मंत्री कृतानेक विज्ञापना. येथील कुशल ताा पौष्य सुध चतुर्दसी गुरुवारपर्यंत साहेबाचें कृपावलोकने येथास्थित असें विशेष. कृपा करून संक्रमणप्रयुक्त तीलशर्करा पाठविली ती पावली. चव्हाणानें मिरज प्रांतें धामधूम करून कलह आरंभिला आहे, त्याकरितां प्रतिनिधि रवाना केले आहेत, त्यांस सामील होऊन उपमर्द होये तो करणे म्हणून आज्ञापिलें. त्यावरून राजश्री गोपाळजी भोसले यांस आणऊन फौजनसी रवाना करविले आहेत. आम्हाकडीलहि लोक जमा करविले आहेत. सत्वरीच सामील होतील. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापि.

¶*Ghanashyam, after his father Naro Ram's death in 1748, accepts the orders of Tarabai and sends his contingent against Udaji Chavan.*

---

No. 211] [25-1-1753

पौ छ २२ रबिलौवल

**श्री**

**तीर्थरूप मातुश्री आईसाहेब वडिलांचे शेवेसी**

अपत्ये संभाजी राजे कृतानेक साष्टांग दंडवत प्रणाम विनंती उपरी. अत्रत्य कुशल पौष्य बहुल सप्तमी गुरुवासरपर्यंत असे. यानंतर वडिलीं पत्र पाठविले ते पावोन संतोषावह जाहाला. मकरसंक्रमणाप्रयुक्त तीलशर्करा पाठविली ते उतम समई पावोन अत्यादरे स्वीकार करून परम संतोष जाहाला. याचन्वये पत्रीं संतोषाभिवृधि करीत असावे हे विनंती.

¶*Sambhaji Raje to Tarabai, conveying compliments of the season for the Sankrant day. It would be interesting to ascertain the periods during which Tarabai and Sambhaji of Kolhapur were on friendly terms or otherwise; this letter can supply a partial clue.*

No. 212] [Recd. 2-2-1753

पो छ २७ रबिलावल

श्री

सेवेसी विज्ञापना. प्रतिनिधींनी स्वामीस पत्र लिहिले होते त्याचा जाब त्यास लिहिला त्याचा अन्वये सेवकास लिहिला तो कलला. स्वामीचे आज्ञेप्रमाणें तीन महिने त्यास सांगत लिहीत गेलो. आजपावेतो त्यास प्रमाण वाटत होते. केवल प्राणावर गोष्ट आली त्यापासून रात्रदिवस नेत्र गालीत बसले. आमचा उपाये ल्याहावयाचा राहिला नाहीं. पंधरा रोजांतील * * * तीन मास जाहाले अद्यापि कोठेहि दिसत नाहीं * * * * * * सेवकानें काय म्हणावें? मातु * * * * नाईकाचा चवाणाचा पदरी पैका नाहीं. देव ब्राह्मणाच्या इनामती आदीकरून घासदाणे घेतले. चवरोजा रोजमरा पंध्रा रोजानीं दिल्हा. सेवट परिणाम नाहीं, तेव्हां संकटांत पडिले. आम्ही कृत्रिम करितो असे परिछिन्न त्यास बिंबले. या काली दहा हजार रुपये भागानगर आगर हर कोठील यैवजी मिलते तर महिना पंधरा रोज टिकाव धरते. याउपर दम धरित नाहीं. सेवकानें पहावें ते विदित करावे म्हणौन लिहिले आहे. नाईकास मल्हारबानें पैका दिल्हा, मातुश्रीस पन्नास हजाराच्या मोहरा पाठविल्या, यामुले सावध जाहाले. नाईक आपले फौजेस नालबंदी देतात, रोज सेपनास येत आहेत, बोली करीतच आहेत. दोन हजार पावेतो जमा जाहाले. बारामतीस तर्ण[१]-सडी ठेविली नाहीं. किल्यावर चढवून आधीच सावध होऊन हाताभवती गुंडाळून तयार जाहाला आहे. मनसबा काहीं कलत नाहीं. ताथाब्याचे राजकारण कसे करितां ते लिहिणे म्हणौन आज्ञा, त्यास मुरारजी घोरपड्याचा सापत्न भाऊ सुभानराव घोरपडा येथं मातुश्रीनी आषाढमासीं आणिला. बहुत कांहीं आशा दाखविली होती. त्यामुले येऊन फसला. कर्जदार जाहाला. परिणाम नाहीं, याउपर मागे तोंड काय दाखवावे, श्रीमंत स्वामीची सेवा करून लौकिक संपादावा, हा सिद्धांत करून आम्हाकडे बोली लाविली. त्यास प्रस्तुत फल काय? परंतु बोलत होते असे करून ठेवावे. त्यास आम्ही सांगितले तुमचे हातून कांहीं काम होऊन येते तर आम्हास श्रीमंताजवल विनंती करावयास जागा होती. त्यावरून ताथोब्यावर कर्णाटकी प्यादे संभरपावेतो आहेत ते याचे वलख्ये त्याकडे राजकारण करून, किल्ला घेऊन द्यावा हा मनसबा योजिला आहे. प्याद्यांस पांच सात हजार रुपये द्यावे, पुढें चालवावे, सुभानरायास मातुश्री सरंजाम देणार आहेत त्यास श्रीमंतानीं संमत देऊन याचा जडाव येथं करून द्यावयाचें वचन द्यावे, याप्रमाणें

---

[१] काडी.

द्यावे लागते. किल्यावर कानडे लोक संभर सवासे नाइकाचे खासगी चालीस पन्नास प्यादे जाऊन येऊन असतात. फारसे जातील त्या दिवशीं बाकी असतील ते खाली घालवावे. आपणच किल्ला बळकावा, आमचे दोनसे माणूस ठिकाण करावे, तेथें नेऊन ठेवावे याप्रमाणें जाहाल्यावर आहे तेच दरवाज्यानें चढवावे याप्रमाणें राजकारण होत आहे. नाइकाची लेक व आनखी किरकोल बायका किल्यावर आहेत. वस्तभाव एक लक्षपावेतो आहे. पांच सात महिने पुरे ऐसा गलाहि किल्ल्यावर चढविला आहे. काम बरेंच दिसते. परंतु नाइकापासून एकादी वावगी वर्तणूक होऊन सरकारकामास धका बसोन जाहिऱ्यान्यांत गोष्ट आलियाखेरीज हे काम स्वामी करणार नाहींसे दिसतें. परंतु राजकारण आसल्यास तोटा नाहीं, नफाच जाहाला तर होईल, म्हणोन बोलोन करार करून ठेवितो. पर्वताचा फारच गलाटा जाहाला असे. तुमचे विचारे जाहाले तर दोन तीन हजार पावेतो रुपये त्याजकडे दक्षणेस रवाना करावे * * * * * * आम्हाजवल पैसा नाहीं. पोषे * * * * * * * * दिल्हा पाहिजे. त्यास तीन हजार व त्यास देणे काय असतील ते, या पत्राच्या जाबाबा देविले पाहिजेत. गंगजीरायास पाठवावयाचा मनसबा विचारास आला तर त्यास हजार दीड हजार तूर्तच द्यावे लागतील. त्याची आज्ञा करावी. पर्वतांतून कारकुन आला त्यास आठ रोज होऊं आले. मागें काय जाले असेल, फिरोन त्याचाहि करारीचा जाब आणावा म्हणोन त्याजकडील कारकुनासमागमे पाठविला. पांचसे रुपये उगेच समागमे दिल्हे आहेत. तो मोठा जलद तिसरे रोजीं माघारा आम्हाकडे येईल. कररजाब आला. दोघास पाठवावयाची आज्ञा जाली तर पाठवू. पैका आधी देविणार स्वामी समर्थ. हे विज्ञापना.

¶*The writer gives an account of Babuji Naik and his preparations at the fort of Tathoda. Murarrao Ghorpade's brother Subhanrao, who had arrived at Satara, was befriended and induced by the writer to capture the fort from the Naik by surprise.*

---

*No. 213*] [*8-2-1753*

**श्री**

**अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री**
**दिनकर महादेव गोसावी यांसी**

सेवक विश्वासराऊ बलाल नमस्कार सूरसन सलास खमसैन मया व अलफ. तुम्ही छ २ रबिलाखरचें विनंतीपत्र पाठविलें तें पावलें, लिहिलें वर्तमान सविस्तर विदित जाहालें. राजश्री आबाजी नाईक यांचें व राजश्री येमाजी शिवदेव यांचें युद्ध होऊन

नाइकाचा मोड जाहाला. निशाणाचा हत्ती व दोन तीनशें घोडे प्रतिनिधीचे फौजेनें घेतले. नगाऱ्याचा उंट नेला व बुनगे लुटले म्हणून तपशिलें लिहिलें तें सावंत विदित जाहालें व राजश्री येमाजीपंत यांणीं पत्र लेहून पाठविलें, त्यावरून सर्व विदित जाहालें. राजश्री बाबाजी जाधव फारच खिन्न जाहाले. प्रतिनिधीचा आमचा दावा लागला, याउपर आम्हांस कलेल तसा सूड घेऊं म्हणोन बहुत कांहीं आवेशानें वल्गना केली, त्याचीं कारणें लिहिलीं तीं कळलीं. येविशी बातमी राखावी म्हणून लिहिलें व नीरेवर फौज स्वामीची आली, हें फार उत्तम जाहालें. येथें फार दबाव पडला, प्रतिनिधीहि सांगतील तेव्हां त्याची कुमक करावी लागेल, येविशी तेथं सरदार आहेत त्यांस आज्ञा करावी म्हणून लिहिलें तें कललें. ऐशियास तुम्ही लिहिलें त्याप्रमाणें नीरेवर फौज आहे तेथील सरदारांस लेहून पाठविलें आहे. राजश्री दादो महादेव फौजेसहवर्तमान येकां दोहो दिवसांचे मजलेवर आले आहेत. लौकरच येतील; आणि येथें येतांच ताबडतोब रवाना करितों. याउपरी फौज यावायाचा कांहीं गुंता आहे ऐसें नाहीं. फौज येऊन पोहचली ऐसेंच निसंदेह समजावें. वरकड कित्येक बातमी तुमचे लिहिल्याअन्वयें राखणें ती राखीतच आहों. येथें तों कांहींच अढळत नाहीं, तशाहिमध्यें शोध करावयाचा त्या प्रकारें करीतच आहों. तुम्हांसहि तेथें जें अढळत जाईल तें वरचेवर लेहून पाठवीत जाणें. जाणिजे छ ४ रबिलौखर. (लेखनसीमा).

¶*Vishvasrao Ballal informs Dinkar Mahadev that he was glad to hear the news of Yamajipant's victory over Babuji Naik and assures him that further succour was being sent to Yamajipant without delay.*

---

*No. 214*] [*9-2-1753?*

**श्री**

विनंती[१]. येथील क्षेम जाणून स्वकीये लेखनआज्ञा केली पाहिजे. विशेष. किले यादवाड येथे निशाण चडऊन झेंडा उभा केला. माघ सुध शष्टीचे मुर्त किला हस्तगत जाहाला. गोकाक परगणेस बोटगिरेस निशाण पाठविले आहे. यादवाडकर व गोकाककर हे दोनी देशमुख सर्व प्रकारे स्वामीचे पदरी पडल्या सर्व प्रकारे याचे आगत्य धरून निभाऊ देणार स्वामी समर्थ आहेत. सर्व प्रकारे देशमुखचे ऊर्जित केले पाहिजे. कासिदाचे वर्तमान राजश्री रामचे(द्र) आणाजी याही शेवेसी लिहीले आहे, त्याजवरून विदित होईल. किलेचे बुरज सुमार सर्वास आहेत. याखेरीज येक बुरजावर सज्या बांधला आहे. दरवाजे दोन व

---

१ पत्र विसाजी नारायण याचें.

विहरी तीन व तोफ येक बुरुजावर आहे. किला उची सात गज आहे. आसपास कुरंदाचा[1] धोंडा आहे. मोरचा व सुरंगाचा विलाज काही नाही. घोडेचा विलाजई नाही. भर किला आहे. परतु इमारत कची आहे. किलेबाहेर पेठ वोसली आहे. किलेखाले गाव पचवीस चालत आहेत. हे सर्व वर्तमान स्वामीस शेवेसी श्रुत व्हावे याकरिता लिहिले आसे. वरकड वर्तमान सिनापा व गोपालजी शेवेसी निवेदन करिता विदित होईल. बहुत काये लिहिणे? कृपा आसली पाहिजे हे विनंती. राजश्री रामचद्र आणाजी यास व देशमुखास वस्त्रे उतम पाठवावियास आज्ञा केली पाहिजे. हे विज्ञापना.

¶*Visaji Narayan reports the capture of the fort of Yadwad, evidently for the Peshwa. It must be ascertained from whom the place was captured. This should follow letter No. 231.*

---

*No. 215*] *[13-2-1753*

**श्री**

**राजश्री पंत प्रधान**

**स्वामीचे सेवेसीं**

श्रीसकलगुणांअलंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री सिदोजी थोरात कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. तागायेत छ ९ माहे रबिलाखर मंगलवारपावेतों मुा चिमणगांव येथे स्वामीचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित जाणून स्वानंद लेखनाज्ञा करावी. यानंतर स्वामीचे आज्ञेवरून राजश्री पंतप्रतिनिधि याजपासीं फौजेसुधां आसों. राजश्री बाबू नाईक याचा व राजश्री प्रतिनिधीचा दोन वेळा मुकाबिला जाहाला. आजी छ मजकुरीं मोडून पिवाड(?)केला. राजश्री आबाजी नाईक हस्तगत जाहले. दोन हती सांपडले. पैकीं येक मृत्यु पावला. तो युधाचा विस्तार चिरंजीव राजश्री सिवाजी थोरात सेवेसीं निवेदन करितां विदित व्हाईल. वरकड सेवकाचा आभिमान स्वामीस आहे. आपले पायां-सिवाई आन्यत्र विचार नाहीं. सेवकाचा अनुपत्ये विचार दूर करणार श्वामी धणी समर्थ सर्वज्ञ आहेत. बहुत काय लिहिणे. कृपा वर्धमान असों दिल्ही पाहिजे, हे विनंती.

¶*Sidhoji Thorat reports to the Peshwa a skirmish between the Pratinidhi and Babuji Naik in which Abaji Naik was captured. Thorat had helped the Pratinidhi by order of the Peshwa.*

---

१ तांबडसर दगड.

No. 216] [16-2-1753

पो छ १३

रबिलाखर सुा सलास

खमसेन

**श्रीआईआदिपुरुष**

सेवेसी[1] विज्ञापना. ताा छ १२ रबिलाखर भृगुवासर मुाा सिरवडे[2] कृष्णातीरी साहेबाचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित आसे विशेष. साहेबी आज्ञापत्र पाठविले तेथे (आज्ञा) जे. चव्हाणाकडील धंदा निर्वेध जाला असला तरी तुम्ही विशा(ळ) गडच्या शहास सत्वर जाणे म्हणून आज्ञा केली. त्यास चव्हाणाकडे बातमीस (?) लोक ठेविले असे. प्रस्तुत चव्हाणाचे मुकाम सेटसल कवठे येथे आहे, झाडून फौज फुटून गेली नाही. वरचेवरी रुसवे होऊन लोक जात आहेत. पुरता तिकडील विचार कललियानंतर मग विशालगडच्या शहास आज्ञेप्रमाणे जाऊन पारपत्य केलें जाईल. चव्हाणाच्या लस्करांत वर्तमान आहे जे कोकटणूर येथे जाऊन वेढा घालावा यैसे आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Pratinidhi to Tarabai, communicating the movements of Udaji Chavan.*

---

No. 217] [15-3-1753 ?

**श्री**

**श्रीमंत नाना स्वामीचे**

**शेवसी**

आज्ञाधारक विसाजी नारायण कृतानेक विज्ञापना. येथील क्षेम ताा फाल्गुण सुध येकादसी पावेतो किले यादवाड[3] येथे स्वामीचे दयेकडोन सुखरूप आसो. विशेष. किले यादवाड येथे निशाण लाऊन सेवस विनंतीपत्रे पाठविली होती, त्यावरून सेवसी स्रुत जाहाले आसल. राजश्री रामचद्र आणाजी याजकडील ब्राह्मण, जासुदासमागमे होता, त्याचे नाव हुजूरचे पत्री काही * होते. यैसे आसोन श्रीमतानी त्याजबाा जाबस्वाल केला त्याजवरून या मनसुभेचे मकसुदी तेथे आहेत, त्याही आपले रावटसि नेऊन बहुत प्रकारे बोद करून त्या ब्राह्मणाने रुबरू स्वामीपासी विनंती केली जे, या ग्रहस्तास रवाना करणे. त्यावरून स्वामी त्याचे

---

१ सबंध पत्र एकटाकी आहे. २ कऱ्हाडपासून दहा मैल. ३ गोकाक तालुक्यांत.

नाव पत्री लिहिले जे, याजसमागमे फौज देऊन रवाना करून पाठवितो. ये गोष्टीस कारण काये ? राजश्री पाडुरंग शामजी कितुरास गेले होते. या प्रसंगी ते नव्हाते. यास्तव त्याही हा विचार लिहून रुबरू सागून जे आज्ञा करून व्यात्री ते घेतली. राजश्री रामचद्र आणाजी हे स्वामीचे आज्ञेवरून उदेगास प्रवर्तले आहेत. ते आपले हर्शकडोन स्वामीशेवा करून दाखवावी येस आसता पत्री नामाविधान लिहून पाठविले त्याजवरून याचे चिती विपर्यास वाटला. आम्हास विचारू लागले, जे आमचे हातून सेवाचाकरी होईल ती करून दाखऊ. येसा निछये त्याचा येकनिस्टेने शेवा करावी हाच आर्थ त्याचे चिती आसता त्याचे समाधान ज्या प्रकारे करावयाचे ते प्रकारे स्वामीचे आज्ञावरून केले. राजश्री देवजी मोहिते व त्याचे पुत्र चौवेजण येस स्वामीचे शेवेवर शेहे दीडशेहे स्वारानिसी चाकरी येकनिष्टेने करीत आहेत. सर्व प्रकारे त्याचे ऊर्जित स्वामीस करणे आवशक आसावे. सर्व प्रकारे स्वामीचे पदरी या प्रती कोणी न पडता जातीनिसी पदरी पडले. राजश्री भिमापा बालापा देसाई यादवाड यास पाठी सिकेचे कागद पूर्वापार येत आहेत. त्याप्रा त्रिवर्गास पत्रे लिहून पाठविलेने शेवा करीत आहेत. पुढ आणखी कितेक कार्य आहे ती स्वामीचे पुणेकडोन घडोन येतील. सुज्ञाप्रति विशेष लिहिणे शेक्त नव्हो. हे विज्ञापना.

¶*Visaji Narayan surnamed Joshi Huprikar in the employ of Ichalkaranji writes to the Peshwa, recommending to his favour Ramchandra Annaji and three others. The former was in the employ of the Ghorpade, Senapati of Kapsi.*

---

*No 218]* *[4-4-1753 ?*

**श्री**

**पुरवणी राजश्री रावमामा स्वामीचे सेवेसी**

विनंती. तागाईत चैत्र शुद्ध १ पावेतों वर्तमान येथास्थित असें. यानंतर इकडील वर्तमान तर राजश्री उदाजी चव्हाण कोकुटनुर परगणियांत सात आठशें रावतांनशी होता. फौज विजापूर प्रांतें आलीसी कळलियावर वरकड लोकांस निरोप देऊन दोन तनिसें रावतांनसी सुरापुरास गेला. तेथें कांहीं कबिले ठेऊन कांहीं पंचगिरीस ठेवावयास गेला. नवाब निजामनआलीचींहि पत्रें त्यास आली आहेत. विदित होये. प्रस्तुत राजश्री नाईक सुरापुरचे मुलकांत जातात. राजश्री सेनापति व नवाब मोगलआली येसें सर्वत्र येकत्रच समागमें आहेत. पुढें पंचमाहालाकडें जाणार. श्रुत होये, बहुत काय लिहिणें ? लोभ असो द्यावा, हें

१ धारवाडच्या उत्तरेस १० मैल.

विनंती. राजश्री जाधवरायांचीं पत्रें नवाब बसालतजंग यास गेलीं आहेत. त्याचे यांचे भेटीचा योग घडावासा मनसबा करि(तात). वरकडहि पाळेगरी यांसीहि नवाब मोगल आलीचीं पत्रें व आपलीं पत्रें पाठविलीं आहेत. तो राबतीखाली[1] आहे. यावर कितेक राजकारणी मनसबेकरून पुढें काय कर्तव्य त्याचें चितीं हें न कळे. आढळलें वर्तमान सेवेसी लिहिलें आहे. [फाटले] घडेल तें खरें. विदित होय हें विनंती.

¶*The writer reports to Trimbakrao Mama the departure of Udaji Chavan and Babuji Naik towards Surapur: and also the movements of Mir Mogal Ali and the Senapati, Ghorpade.*

---

*No. 219*] [*Before 1745, the year of the writer's death.*

पो छ २ जमादिलाखर

**श्रीव्यंकटेश**

**सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी-**
**आलंकृत राजमान्य राजश्री**
**पंत प्रधान स्वामी गोसावी यासी**

पोष्य व्यंकटराऊ नारायेण कृतानेक सांष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वानंदअभ्युदयचित्त प्रमोदवित असिलें पाहिजे. यानंतर आपला निरोप होऊन स्वार जालों ते नांदणीस[2] येऊन दाखल जालों. येथील प्रसंग पूर्वी वार्तिकासमागमें पत्रीं पेशजीं लिहिलाच आहे त्यावरून अवगत जालाच असेल. स्वामीनी जमावाची आज्ञा केली त्यास या प्रांतातील नामांकित लोक च्यार पदरीं असावे, समयोचित कामकाज पडलियास नगें[3] राहेत ऐसें पाहून ठेविले आहेत. याउपरी स्वामी आज्ञा करितील ते समईं स्वार होऊन येऊं. आपण सातारियाहून गेलियादारभ्य तिकडील वर्तमान कांहीं कललें नाहीं. तरी सविस्तर लिहावया आज्ञा केली पाहिजे. राजश्री उदाजी चवाण अथणीस आहेत, त्याचे समजाविसी-बद्दल राजश्री मंत्री व राजश्री येमाजी सिवदेऊ व बालोजी डुबल ऐसे राजश्रीनी पाठविले आहेत. त्यांचे समजाविसीचा प्रसंग कैसा होऊन येतो तो पाहावा. चिकुडी-करहि राजश्री उदाजी चवाणाजवली आहेत. त्यास ऐकतों जे, चिकुडीकराची व यांची आणभाष जाली आहे कीं आम्हाकडील ठाणीठुणीं आहेत त्यास उपसर्ग करावा, साधल्यास ठाणेहि घ्यावें. ऐसियास आम्हीं तों जे रीतीनें मजबुदी ठाणि-यांची करावी ते केलीच आहे. आपणांसहि श्रुत असावें याजकरितां लिहिलें

---

१ स्नेह; अनुबन्ध, ये जा. २ करवीर इलाखा, शिरोळजवळ. ३ नग = प्रतिष्ठा.

आहे. काटक संधि पाहून आपल्या काबूस न चुके, आपला व चवाणाचा श्नेह. त्यास गतवर्षी आम्हांस स्वामींनें आज्ञा केलियानरूप हा कालवरी चालिलोंच आहों. अंतर न केलें, ऐसें असतां काटकाचा अभिमान धरून सतत वाढविली तरी श्री समर्थ आहे. आपण पुढें शब्द लावितील याजकरितां श्रुत व्हावें म्हणोन लिहिलें असे. लस्कराची रवानगी कधीं होणार, आम्ही कधीं यावें हें लिहिलें पाहिजे बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनंति.

¶*Vyankatrao Narayan to the Peshwa, informing him of the situation on the Kolhapur side and of the writer's readiness to move wherever he would be ordered.*

---

*No. 220]* *[8-4-1753*

**श्री**

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब याणीं राजमान्य राजश्री चिमणाजीपंडित सचिव यासी आज्ञा केली ऐसीजे. अंबरी गुरव व मलारी गुरव मौजे लोहाणकर याणे तुफान करून दताजी पा गायेकवाड यासी मारून पळाला, तो किले विचित्रगड तेथें जाऊन राहिला आहे. तरी ये गोष्टीची वाजपूस करावी लागती, याजकरितां गुरवमजकूर हा आसपास कोणे गावी असेल अगर किले मजकुरी असेल त्यास हुजूर पाठवणे. या कामास सुभानजी नलवडे हुजुरे पाठविले. यासी खर्चास रुो १० दाहा देविले हे गुरव मजकुरापासोन देववणे. जाणिजे छ २ जमादिलोवल सुहुरसन सलास खमसेन मया व अलफ. बहुत लिहिणे तरी सूज्ञ असा.

¶*Tarabai orders Chimnaji Sachiv to capture and send back the miscreants Ambari and Malari Gurav.*

---

*No. 221]* *[12-4-1753?*

**श्री**

**पुा राजश्री भाऊ स्वामीचे**
**शेवेसी**

आज्ञाधारक विसाजी नारायेण कृतानेक सां दडवत विनंती. येथील क्षेम ताा चैत्र सुध नवमी पावेतो सवदतीस स्वामींचे दयेकडोन सुखरूप असो. साप्रत

किले यादवाड येथून कूच करून धारवाडास हस्तगत करावा म्हणून नवमीचे दिवशी गाठ घातली. परंतु काही विलाज जाहाला नाही. त्यामधे यामधे युध होऊन राजश्री द्वेवजी मोहिते याजकडील लोक च्यार पाच जखमी व घोडी च्यार जखमी व सिदेकडील लोक व घोडी पाच सात जखमी जाहाली. स्वामीचे शेवेवर द्रिष्ट देऊन खस्त मेहनत केली. परतु वाच्याअंश जाहाले, याजकरिता शेवेचा मुजरा जाहाला नाही, म्हणून आपले चिती दुचित आहेत. हे कार्य प्रगट जाहलेवर दोन रोज सबुरी करवणे म्हणून उभयेतानी व आम्ही राजश्री रामचद्र-पतास बहुता प्रकारे सांगितले. परतु त्रिवर्गाची गोस्ट न यैकता हटनिग्रह केला जे बहुता दिवसी स्वामीसेवा आली आसता तुम्ही लोकी या प्रसंगी आंगेज न केलिया बदलाम सरवस्वे तुम्हावर. यैस यैकोन उभयेतानी आंगेज बराच केला. आम्ही समागमे होतो, परंतु शेवेचा मुजरा होऊन आला नाही. सर्व प्रकारे त्याही आपले पायाची जोड केली आहे. त्याचे ऊर्जी(त) करणार स्वामी समर्थ आहा. किले माारावर युधे जाहाले तेच घडीस कोणास न पुसता रिघोन रो रामचद्र आणाजी गेला. आद्यात वर्तमान राजश्री लक्षुमण कोडा शेवसी निंवेदन करिता श्रुत होईल. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*Visaji Narayan reports that an attack on Dharwar had failed.*

---

*No. 222*] [*April 1753?*

**श्री**

आज्ञा केली ऐसीजे, तुम्ही दोन चार विनंतीपत्रे पाठविली त्यावरून सावित्सर अवगत जाहाले आणि रा सुभानजी मान आले, त्याणी तपासिले निवेदन केल्या-वरून कलले. येसियास तुम्ही येकनिष्ट सेवक विश्वासू हे जाणून चिरंजीव कैलासवासी याणी तो जागा तुमच्या वडिलाचे स्वाधीन केला, त्यामधे तुम्ही आधिकोतर सेवकपणाची रीत केली. त्यावरून तुम्हावर साहेब बहुत खूष आहेत. सालमारी मुलुकची खराबी जाहली. किल्याची बेगसी नाही. कर्जदार जाहलो म्हणून तपासिले लिहिले. येसियास तुम्ही कार्यकर्ते आहा. साहेब तुमचे ऊर्जित करतील; आणि कर्जवामाचीहि वाट होईल. तुम्ही कोणेविसी चितात दुसरा अर्थ न आणणे. इनामगावाविसी लिहिले. तरी तुमचे गाव सुदामतप्रमाणे करार करून द्यावयाचे जरूरच आहे. माघून त्याचा विचार करून आज्ञा केली जाईल. तुमची निष्ठा जाणून मरातब योजिला आहे. त्याची सनद करून मागाहून पाठविली जाईल. प्रस्तुत राजश्री पंतप्रधान त्या प्रांते येणार म्हणून

वार्ता आहे. येसियास आपले जागियाची बंदोबस्ती करून बहुत सावधपणे राहणे. चार लोक व पतके सरदार यास मायेत घेऊन गाहा करून आवघे येकदील होऊन साहेबाचा जागा जतन होऊन तुमचे सेवेचा मजुरा होये तो आर्थ कराल हा निशा साहेबाचा आहे. हाली हे आज्ञापत्र सादर केले आसे. तरी आज्ञा केली हा मार चितांत आणून वर्तणूक करणे म्हणजे साहेब तुम्हावर कृपालु होऊन ऊर्जित करितील आणि सर्व आर्थ तुमचे मनोदयानुरूप घडोन येईल हा निशा असोन देणे. वरकड कितीक आज्ञा करणें ते सुभानजी माने व सैद खुतुब यास केली आहे. सांगतील त्यावरून कलल. विनतीपत्रे माहे जमादिलाखर

¶*The letter is evidently from Tarabai and exhorts the addressee to be loyal and firm. It shows how she flattered the sardars so that they might assume a hostile attitude towards the Peshwa.*

---

*No. 223*] [*4-7-1753*

पौ छ ११ सवाल.

श्री

श्रीमत माहाराज आऊसाहेब साहेबाचे सेवेसी. आज्ञाधारक परवतराऊ जाधव चरनावर मस्तक ठेवून सां दंडवत विनती. येथील कुशल श्रावण सुध शष्टी जाणोन स्वकीये कुशल लेखकास आज्ञा केली पाहिजे विषेश. साहेबी आज्ञापत्र पाठविले ते पावून प्रम संतोश जाहाला. हुजर दर्शनास येणे म्हणून आज्ञा केली त्यास पूर्वीपासून स्वामिसेवा आमचे वडील करीत आले. त्याप्रा आम्हीहि करावी हाच भाव आहे. हली रावो जिवाजी पाठविले आहेत हे सेवेसी विनती करितील ते यैकोन आम्हास जे आज्ञा करणे ते केली पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विज्ञाप्ति.

¶*Parwatrao Jadhav expresses readiness to serve Tarabai and solicits orders.*

---

*No. 224*] [*7-7-1753*

पो छ १९ माहे रमजान
सन सलास खमसेन

श्री

**श्रीमंत माहाराज मातुश्री आऊसाहेब**
**माहाराजचे सेवेसी**

विनंती. आज्ञाधारक मकाजी यादव येलोवकर[1] दोनी कर जोडून साष्टांग दंडवत विनवावया प्रार्थना यैसीजे. माहाराजाचे कृपेकरून ताा छ ९ बुधवार पावतो

---

१ येळावी.

मौजे मजकुरी खुशाल आसो. माहाराजाची भेटी जाहाली माहाराजानी वस्त्रें दिली. वस्त्राचे सम(यीं) * * माहाराजास आर्जी केली तेव्हा माहाराजानी आज्ञा केली कीं राा कानोजी मोहिते हंबीरराव याचे ताबिनात केलें. माहाराजाचे आज्ञाप्रमाणें त्याचे कसबेतीस[1] असतां गडावर जाऊन बैसल. आम्हास दुग्धा वाटली. फिरोन काही आमची परत (?) केली नाही. आम्ही उठोन आपले घरास आलो. महिना दीड जाहाला. मागती त्याचे कागद आले कीं तुम्ही तयार होऊन येणे. येस तीन कागद आले. आम्हास हुकुम माहाराजाचा त्याचप्रमाण वर्तणूक आम्ही करावी. आम्ही जमेदार लोक. यास्तव आपणाकड हरि माणकेस्वर पाटविलें आहेत. आपण हुकूम करितील त्यासारिखी वर्तणूक करूं. आपणापासी संनिध पाचारिलें तरी पायापासी सेवा करूं. अगर हुकूम जाहाला तरी राा कानोजी मोहित हंबीरराव याजकड जाणें यैसा हुकुम केलिया तिकड जाऊ. याबाबें धनियास अर्जी लिहिली आहे. अर्जी परिसोन उतर पाठविले वर्तणूक करूं. माहाराज धनीसाहेब आहेत. फार ल्याहावसे नाही. सेवसी विज्ञापना होय.

¶*The writer Makaji Yadav, who is a jamadar, expresses his willingness to act up to the orders of Tarabai.*

---

*No. 225]* *[6-8-1753?*

छ १३ सवाल

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंत प्रधान**
**स्वामीचे सेवेस**

आज्ञाधारक आनंदराव गिरधर मोकाम करवीर त्रिकाली सास्टांग नमस्कार. विज्ञापना ताा छ ६ सवाल येथील श्रीमत माहराज सौा जिजाबाई पनाल्यामधेंच आहेत. गडची बंदोबस्ती करितात. सतरसीचा विवेक जालाचे वर्तमान परस्परें यैकोन दिलगीर आहेत. पुढें निभाव कसा होईल म्हणौ फिकिरेमधें आहेत. स्वामीवर रुष्ट आहेत जे, आजपावतों श्रीमंताची आस्ता धरोन श्रीमंताखेरीज नहुतें. सांगितल्याप्रमाणें यैकोन विक्षेप (प)डोन आमचे महत्कार्य श्रीमंताही करोन द्यावें म्हणोन मर्जी रक्षिली, परंतु परिणामीं तिकडील विले धरोन आम्हास पूर्ववत करोन ठेविलें, यैस बोलोन फार कस्टी आहेत. परंतु हे अगदीं अंतर्यामीचेंच बोलतात. बहिरंगे धीर टाकीत नाहीत. प्रस्तुत गाडदी वगैरे

---

१ खिसमतीस.

जमाव येऊन पंचगंगेवर करवीरानजीक येऊन उतरला व मागाऊनहि येणारसी आवाई आहे. याकारिता टोकेर देखील तोडोन काहडोन वाट बंद केली. संशयामधें आहेत. करवीरांत व पनाल्यांत दरवाज्यामधें पाचसें माणूस कमर बांधोन रात्रंदिवस खबरदारीमधें असतात. राजश्री रामचंद्रबावाचे पुत्र भगवंत-गडास जमाव सुधा जाणार. जमाव भारी येऊन वरचेवर उतरतो यांस सतरसीचे राजकारणाविसींचा संसये चितामधें येऊन आपल्या सावधपणामधें आहेत. सरखेलीचे राजकारण करोन द्रव्य घेऊन मालवणास भेटावे याकरिता गेलो होतो, येविसीं विक्षेप श्रीमंताचे चितामधें येऊन आपणावर अविश्वास श्रीमंताही धरिला यैस ध्यानांत आणोन सरखेलीची हेळणादि करितात. श्रीमंतास विक्षेप येणेस सरखेलीचें राजकारण निमित्य जालें म्हणौन परिछिन्न कललें. प्रस्तुत त्याविसी खटे जाले आहेत. हरघडीस तोच अर्थ ध्यानास येऊन अफसोस करितात. सतरसीचें वर्तमान यैकिल्या तागाईत सुखरूप निद्रा पडत नाहीं. बहूत याचनेंत दंग आहेत. सेवकापासीं जासूदजोड्या नाहीत. च्यार जोड्या हुजूर गेल्या त्यामधें येकहि जोडी मागारी आज्ञापत्र घेऊन अद्याप फिरली नाही. याउपर नाजूक वर्तमान लिहिणेस अजुराहि येथें मिलत नाही. मर्जीस येई ते आज्ञा केली पाहिजे. कर्जदाराच्या उपसर्गामुले सेवकास चैन पडत नाही. खर्चाची विपत्य. पूर्ण बोढीचा प्रसंग सेवेस दोन तीन वेळ लिहिला. काही कर्जाची वाट अद्याप न जाली. कृपा करणार खावंद समर्थ आहेत. श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Anandrao Giridhar writes to the Peshwa from Kolhapur that Jijabai is at the fort of Panhala and that the king is very grieved to hear of the events at Satara and that the Peshwa could not carry out his promises. Sambhaji Raja of Kolhapur is also sorry to learn that his political relations with the Angria did not meet with the Peshwa's approval.*

---

*No. 226*] [*9-8-1753*

पो छ १४ शोवाल

**श्री**

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब साहेबाचे शेवेसी शेवक रवलोजी घाटगे झुंझारराऊ कृतानेक विज्ञापना. ता छ १० सवालपर्यंत साहेबाचे कृपावलोकनें-करून शेवकाचे वृत येथास्थित असे विशेष. साहेबाचे चरणासन्निध यावयाची आपेक्षा धरून मार्ग लक्षित आहे. आज्ञापत्र सादर जालिया दर्शनास येऊं. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ravloji Ghatge expresses his willingness to serve Tarabai.*

---

१ नावा.

No. 227] [27-9-1753?

श्री

श्रीमंत राजश्री नाना
स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक विसाजी नारायेण चरणावरी मस्तक ठेऊन सा। नमस्कार विनंती यैसीजे. येथील वर्तमान तर आश्विन शुध प्रतिपदापरियं(त) स्वामीचे आसीर्वाद करून मनोलीस सुखरूप आसो विशेष. सिंदे यांजकडील वर्तमान तर तळ्रास दोन हजार फौज व पांच हजार प्यादे यैसे मोरचे लाऊन बैसले आहेत. सुरुंग तयार जाले आहेत. येका दो दिवसीं उडवणार आहेत. आपली मार्गप्रतीक्षा करितात कीं, येकादा सरदार पाठऊन आमची त्यास निरवणूक करून रवाना केला तर त्याजपासी आम्ही चाकरी करूं, यैसे म्हणतात. आगर आमचे पोटाचीहि बेगमी केली तरी चाकरीस आंतर होणार नाहीं. येकनिष्ठेने सेवा करू यैसे वारंवार बोलतात. रा। देवजी मोहिते व त्यांचे लेक चवघेजणे यैसे स्वामीकडे उठोन येत होते. पुरातन चाकर पदरचे पागा स्वाधीन होती. सरंजाम पागेचा त्यांजखालीं आहे. त्यांस वर्तमान कळले की, श्रीमंतानी मनाळीसं[1] आम्हास पाठविले हे यैकोन त्याणी आ [अपूर्ण]—

¶*Visaji Narayan Joshi recommends Sindia and Devji Mohite to the attention of the Peshwa for service.*

---

No. 228] [End of 1750

श्री

राजश्री चिमणाजी बावा गोसावी यासी

॥ ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये श्नो। सिदोजी थोरात दंडवत विनंती उपरी. येथील कुलश जाणौन स्वकीये लेखन करीत गेले पाहिजे विशश. आपण पत्र पाठविले ते पावले. तेथे लिहिले जें, आपण सतरुषीहून कूच करून मोहा-[2] गांवास दाखल जालो. राजश्री उदाजी चव्हाण हिमतबाहदर व ममलकतमदार यांची भेटी जाली. ते व आपण येकत्र असो. यैसियासी, तुम्ही व राजश्री रताजी चव्हाण फौजसुधा रहिमतपुरामाजी येणे, या प्रांते कितेक कामकाज आहे

---

१ मनोळी. २ सातान्याहून पूर्वेस सहा मैल.

म्हणौन लिहिले. तरी, राजश्री अंताजी सिवदेव जमावसहित कलेढोणावर[१] येऊन उतरले आहेत. आजीउदियात इकडे यावे हे बातमी वरचेवरी येती. त्यास आम्हास सातआठ कोसाचा तफावत आहे. यैसे प्रसंगी तिकडे अलियाने इकडील अगदी मुलुक खराब होणार व लौकिकहि फटकल दिसतो. शाह सोडून कैसे निघावे, हा येक विचार. दुसरा मजकूर, संभाजी माहराज वडगांवी आले तोहि ज (मा) व येकत्र होतो. त्यांचा मनसबा काये तोहि कलत नाही. यैसे प्रसंग इकडील आहेत. (आ)म्ही आपला मार्ग पाहतो. जे इ [ फाटले ] अवघे फौजेचा गाह [ फाटले ] करावा यैसा मजकूर [ फाटले ] आहे. कलले पाहिजे. बहुत काये लिहिणे, लोभ असो दिला पाहिजे, हे विनंती.

श्री धानाड (?) चरणी
तत्पर सीवाजीसुत
सीदोजी थोरात नीरंतर

मो.

¶*Sidoji Thorat writes to Chimaji Bawa that it would not be advisable to comply with his instructions to march to Rahimatpur, as some trouble is expected from Antaji Shivdev who is encamped at Kaledhon. This should be read in conjunction with No. 188.*

---

*No. 229*] [*November 1747 ?*

## श्रीगणराज

सेवेसी त्रिबकं[२] हरि कृतानेक विज्ञाप्ति. ये प्रांतीचे वर्तमान लिहीत जावे म्हणौन आज्ञा. त्यास इकडील वृत तरी अर्जोजी यादव बदलोन ठाणी बलाविली, भेटीस न ये अगर यासहि येऊ न हि सारखा (?) त्याउपर याणी तोरगलास जाऊन तिकडून रा मुरारराव यास घेऊन आली. आले उपर रोज बरोज मुरारराऊ फौज जथू लागले. अर्जोजीने चिकोडीकरासी संदर्भ करून त्याजकडील जमाव घेऊन आला. हे वर्तमान करवीरवासी यास लागताच याणी राजश्री सेनापति कापसीस राहातात तेथे गेली. आम्ही ते प्रसंगी तेथेच होतो. तेथे जाऊन करार जाहला की, चिकोडीकर याणी प्यादे जवादे घातले हे काढावे, चिकोडीकर न काढीत तरी सेनापतीनी चिकोडीकर आणू नयेत. हे बोली

---

१ साताऱ्याहून पूर्वेस अजमासें २५ मैल. २ पटवर्धन.

कापसीत होत्ये तो पावनगड फितवेने करवीरवासी याणी घेतला. तेथून करविरास गेली. तेथे गेलेउपर वडगावासभोवती गावखेडी होती तीहि घेतली. गुमट अकिवाट घेतले. किरकोल सारी घेतली. वडगाव, आलते, हेरले, मुरगूड इतकी आर्जोजीकडेस राहिली. वडगावासभोवती गावे घेऊन तेथे मुरारराऊ याजकडील राऊत ठेविले. सेनापतीस वरचेवर पत्रे पाठविली तो हे कापसीहून लाटेस आले. चिकोडीकरहि भेटले. परतु चिकोडीकरानी आणखी जमाव घातला परतु तो काढिला नाही. सेनापति ते मिलोन इचलकरंजीनजीक लाटेवर आले. त्याउपर करवीरवासी याणी राजश्री प्रतिनिधि व उपाध्येबावा याजकडे पाठविले. उपर याणी करार केला की, माहाराज व बाईसाहेब यावे. त्यावर तेहि आली. आद्यापि आर्जोजी भेटत नाही. आजी उद्या म्हणतात. मुरारराऊ दोन हजारपावेतो जमा जाहाले. वडगावकरात त्यास जुज येक दोनी होऊन घोडे दाहा पावेतो पडली, जखमी जाहली हे लौकर निवडते. राजश्री मुरारराव या प्राती जमा आहे. त्यात सेनापतीमध्ये हर्षामर्ष वाढला. यात आकस जागे-याचा शाहा बसला आहे. पुढे जे होईल ते सेवेसी लिहून पाठवितो. मुरारराव याचा शाहा टलला म्हणजे सेवेसी हाजीर होतो. मुले माणसे कुरुंदवाडी आणि हे समई टाकून कैसे यावे? याजकरिता दोन दिवस राहिलो. स्वामीवाचून दुसरे दैवत नाही. स्वामीचे सेवक आहो. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Trimbak Hari apologises to the Peshwa for his inability to start at once owing to the trouble created at Kolhapur by Murarji Ghorpade and Arjoji Yadav. This letter gives the origin of Murarrao's visit to Kolhapur and subsequent developments described in letters 17-29.*

---

*No. 230*] [*27-1-1753?*

श्री

राजेश्री बावाजी जाधव गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री मालजी चव्हाण रामराम विनंती उपरी. येथील कुशले जाणून स्वकीये लेखन आज्ञा निरोपित जावे विशेष. आमचे वर्तमान तो आपणास विदितच आहे. राजेश्री आगनोजी सालोखे यानी आम्हास बाहिर घालून मूल माणसे दोनी वरसे बंदस घातली. येविसी श्रीमंत माहाराज मातुश्री यानी व आपण दोनी तिनी ताकीदपत्रे पाठविली, परंतु त्यानी माने केली नाहींत. याकरितां चिरंजीव राजेश्री उदाजी चव्हाण हिमतबहादर ममलकतमदार यानी गांव घेतला. त्यासी श्रीमंताची पत्रे सिवाजी खांडेकर याबराबरी आली की आगनोजी सालोखे यासी बिसातसुधा सोडोन देणे. याजप्रमाण त्यासी लाऊन

दिल गाव जाळून सत्यानास केला. त्यासी आम्ही मुलमाणससुदा गांवी आहा. आगनोजी सालोख्यानी मनेराजुरीत आसरा करून मुलुक मारिला व आम्हासी घसघस लाविली आहे. आम्ही पूर्वीपासून धन्याच्या पदरीचे असो. त्यामधे वृधापकाळ, डोळस दिसत नाही. आपण आर्ज करून येंवढ्या खेड्याची सनद करून देविलिया गुदरान करूं. वतनी खंड आहे. आगत्ये मनावरी घेऊन कार्य करून देविल पाहिजे. पत्री विस्तार काय लिहिणे? कृपा लोभ असो देणे हे विनंती.

¶*Malji Chavan to Bavaji Jadhav : complains against the trouble caused by Agnoji Salokhe and informs him that Udaji Chavan helped him in taking the village from Salokhe. The writer further requests him to secure for him a Sanad for the village. This should be taken in conjunction with Nos. 208 and 233.*

---

*No. 231*] [*10-1-1753?*

**श्री**

श्रीमंत राजश्री नाना

स्वामीचे शेवेसी

आज्ञाधारक विसाजी नारायेण चरणावर मस्तक ठेऊन सा। नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ २९ रबिलावल मो। मुनोली जाणून स्वामीचे कृपादृष्टीकडून सेवकाचे वर्तमान येथास्तित असे. यानंतर राजश्री विठल विश्राम याचे नि। पांडबा रवाना केले. त्याणी सागितलेवरून सकल अर्थ विदित जाहाला. मागून जासुदासमागम पत्रे पाठविली जे, कार्य उरकोन सत्वर यावे. अशास आम्हापासी सरंजाम जो आहे तो विदितच आहे. नरगुदकर व सरदेसाई व सिंदे यास पत्रे लिहिली की, विसाजी नारायेण तेथे आहेत. त्यास जे साहित्य प्यादे जवादे जे लागेल ते करावी म्हणून आज्ञा जाहाली. आशास हा जिल्हा घोरपडे याचा सेवक माहादाजी राम ते या प्रांती सात आठसें स्वारानसी सिंदे व नरगुंदकर यास समागमे घेऊन खंडण्या घेतात; असे असतां स्वामीनी हुजरून आज्ञा केली तर त्याचे जिलेमधें आम्ही स्थल घेतलेने यास समाधान काये? यास्तव ते आमच्या शोधास लागले. याकरिता त्याचा आम्हास भरवसा वाटत नाही. यास्तव राजश्री देवजी मोहिते याचे नि। राजश्री बाबूराव पुतलाजी याचे विद्यमाने राजश्री हिंदुराव घोरपडे याजकडील राजश्री रामचंद्र आणाजी याची आमची व पांडबाची भेट जाहाली. आपले त्याचे कितेक भाशण होऊन आपले मातबारीसारखा सर्वहि आंगेज केला. आणि मारनुले याणी सिंदेकडील कासीराव मजमदार यागी होते त्याकडे संधान करून सात

आठसें प्यादा मिळऊन बाहेर निघालों. त्यास यादवाड प्राा ठिकाणा जाहाला पाहिजे. इकडील लोकास उमट न पडावा याजकरितां निघोन जावयाचा सिधांत केला. येक दोन रोजा ठिकाणास पावतो. राजश्री जयेराम सावंत व राजश्री देवजी मोहिते यांजकडे सरकारची व आमची पत्रे पाठविली त्याची उतरे वरचेवर आली जे, ठिकाणीची आनुसंधाने राखून आसणे. आपण जमावानसी येऊन पोहचतो. ते आलेंनतर येकत्र होऊन स्वामीच्या तपोतेजेकडून कार्यसिधी होईल. स्वामीकडे जी स्थले लिहिली होती तेथील माणसे वरचेवर येतात, दिरंग पडो न द्यावा असे म्हणतात. परंतु आम्हापासी साहित्य नाही याजकरिता दिरंग होत जातो. राजश्री विठोबानी आपले स्वकीये ग्रहस्तास सांगितले होते आणि मागांहून इकडील ग्रहस्तास पत्रेहि पाठविली होती, परंतु त्याकडील साहित्य होता दिसत नाही. आणि या प्रांती आपले वळण नाही. रामचंद्र आणाजी मातबर माणूस याही यादवाड प्राचा सकळ अर्थ विठोबास लिहिला आहे ते बजिनस पत्र आवलोकन करावे. पत्राप्राा आम्ही उभयेतानी वचन दिले आहे. त्याचे पत्राप्राा व यादीविदीप्राा पत्रे व वस्त्रे पूर्वापार पधतिप्राा सन न लिहितां पाठऊन द्यावी. गोकाक प्राचा मजकूर राजश्री विठोबाचे पत्री लिहिला आहे तो पाहून तेथील ठाणी आहेत ती हस्तगत होतात. गोकाक प्राा व यादवाड दोन तीन लक्षाचा मुलूक आहे. पटीची पटी मोकली होती. इतके जाहालियास सर्वहि थंड होतात. आमचा विचार कोठे प्रगटास आला नाही. बहुता जणास वहमा पडला आहे हे षडमास बसोन काये विचार करितात, या शोधामधे आहेत. आम्ही तों ठीक करून ठेविले आहे. राजश्री मुराराव याजकडील वर्तमान आपणाजवळ असेल. इकडे वर्तमान आहे जे, घाट चढोन येतों. माहादाजी रामास पत्रे आली. दाहा हजार फौजेस नालबंदी पाठविली. तुंगभद्रापलीकडे राहाणे, नदीपार न होन, म्हणून लिहिले आहे. आमचा रोजमरा आशाड मासी पुणेचे मुकामाहून रुपये २९ पाठविला होता त्याजवर दफ्तरदारानी रुा स्वामीपासी चिठी लेहून दिली. स्वामीनी देणे केले. बारा रुपये पावले. स्वामीस श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Visaji Narayan to the Peshwa: reporting Ghorpade's movements in the Yadwad District, in concert with Vithal Vishram's son Pandoba who was sent by the Peshwa. This should be taken in conjunction with Nos. 214 and 217.*

---

*No. 232]* *[1748?*

श्री

राजश्री सदासीव चिमणाजी पंडित यासी श्रीमंत सकलसौभाग्यादिसंपन्न मातुश्री जिजाबाईसाहेब उपरी. पूर्व संदर्भाच्या अन्वयानरूप तुम्हांकडे वेदशास्त्रसंपन्न

3475

राजश्री दादंभट श्रौत्री यांसमागमे आज्ञापत्रें सादर करून कितेक बोलीचालीचा प्रारंभ युग (क्त) सद्दढतेच्या प्रसंगाची आज्ञा सांगोन पाठविली. त्याप्रो चितीं संभऊन पूर्वसंकल्प सिधीस नेऊन प्रामाणिक वचन निदर्शनास साहेबाच्या यावें. तदोतर हुजूर संतुस्टता प्राप्त होऊन मध्यस्ती केली त्या गोस्टीचा फलादेश घडोन यावा या विचाराकरितां विनंतीपत्राचा मार्ग लक्षिला. अविलंबे कार्ये द्रिस्टीस पडावें. लौकिक उतम दिसोन येशास पात्र तुम्हीं व्हावें. साहेबी सर्वाविसी येख्तयारी आपणावर टाकावी, यैसे कितेक मनोदय साहेबीं कल्पून गत-वर्षापासून वेदशास्त्रसंपन्न राजश्री भटजीस लागोपाठ रवाना केले. यैसें असता साहेबांचे प्रत्यास गोस्ट दिसोन न ये तेव्हां साहेब मध्यस्त होऊन हुजूर वचन गुंतविलें त्याचा लौकिक कोणे प्रकारीचा होणार? हा अर्थ चितात आणून तदनरुप याउपरी पूर्व संदर्भाच्या विचारानरुप अंगेजणी करून श्वराज्य कर्तव्यार्थ पेसजी बोला जाहली आहे, व करारबाज यादी लेहून दिल्या आहेत, त्याप्रो निदर्शनास साहेबाचे यावें. हुजूर विनंती केली आहे, ती सत्यता होऊन राज्य उपयोगी मनसबा घडे ते करावे. यैसे राजश्री बालाजी पंडित प्रधान यास तुम्ही सांगोन त्वरेने करवावे. या गोस्टीचे तुम्हास अगाध कोणतें आहे; सविस्तर वेदशास्त्र-संपन्न राजश्री श्रौत्री याजवळ आज्ञा सांगोन पाा आहे व पंडित माारनिले यास आज्ञापत्र सादर असे त्याजवरून साद्यंत कलेल. साहेब मध्यस्त तुमची निस्टा द्रढतर, हा भरवसा साहेबास हुजूर विनंती करून तीन संवस्थानची ताकीदपत्रें घेऊन पाठविली आहेत. साहेबाचा तुमचा करारबाज कोणे प्रकारचा आहे, श्वराज्याविसीं पंडित माारनिले यांचे मांडीचे उसे केले आहे, हाहि अर्थ ध्यानांत आहे. सारांश गोस्ट पूर्व संदर्भाप्रो हुजूर निदर्शनास साहेबी आणून द्यावे आणि येशास पात्र तुम्ही व्हावे हा अर्थ चितात आणावा. सकलार्थ तुमचे चिती संभवावा येदंनिमित्य राजश्री बावाजी भुजंग यांस आज्ञा करून पाठविले आहेत; व राजेश्री पंडित प्रधान यांस आज्ञापत्री लेख केला आहे. त्याजवरून सांगोपांग चितात आणून योजिले कार्ये सीघ्रवत होये ते करणे. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.



¶*Jijabai of Kolhapur sends a messenger to Sadashivraobhau with a communication expressing her regret at the delay on the part of Bhau to give effect to all those points that were agreed upon between them. The delay, she says, has placed her in a very awkward position. She enjoins upon both the Bhau and Nanasaheb the necessity of getting matters settled and thus discharging the trust placed in them by her.*

3476

No. 233] [1753?

श्री

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब
साहेबाचे सेवेसी

सेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी तमाजी देशमुख सरकार मूर्तजाबाद[1] विनंती. विनवावया प्रार्थना यैसिजे. येथील वर्तमान तर राजेश्री नारायेणराव घोरपड्यानी येऊन मिरज प्रांती धामधूम करून देशमुखी आपलीं म्हणऊन मुलुक तमाम पालथा घातला. हे वर्तमान साहेबास परभार आलियावर साहेबी हुजूर व ताकीद-पत्र तात्यास व मिरजकर यास पाठविली तेहि वर्तमान आम्ही यैकोन बहुत समधान पावलो. आहेरणीसी आपल्या चरणाचे श्मरण करून बैसलो आहो, आणि साहेबी आठवण करून आज्ञापत्र आजनीविसी सादर केले की पाटील कुलकरणीं हुजूर पाठवण. त्यास राजेश्री संताजीबावा घाटगे झुंझारराव याजकडे मुकासा आहे. यानी घोरपड्यास आजनी व जायेगव्हाण या दोनी गावीची कमावीस देऊन येक वरीस जाहले. गतवरशापासोन घोरपड्यानी आम्हासंगात घसघस लाविली आहे. साहेबी ताकीदपत्र रा॥ सिवाजी सालोखी यास व इत्यादि-कास दिल्ही ती ज्याची त्यास देऊन मिरजेत जाऊन बैसलो. खेडीपाडियास ताकीद देऊन गावकर यास आणून हकरुसुम याचे विल्हेस लाऊन घेत होतो. तो मागती येकायेकी येदा सालमजकुरी घोरपडियानी येऊन बळजोरीन मिरजत अमल बैसविला. प्रगण्यातहि राऊत पाठऊन खेडीपाडी जबरदस्तीने आणून पैका घेतला. त्यावर आंजनीस व करोलीस वेढा घालून दोनी गाव घ्यावा हा निश्चये केलियावर आम्हास आधार कोणाचा दिसनासा जाहला. मग आपले स्मरण करून अंजनीस येऊन बंदोबस्ती करून राहिलो. आम्ही काही गावकरास हती घेऊन लावणीसंचणी पाडली नाही. गाव फोडता फोडल. मुकासियाकडील कारकून यानी तमाम रयतेस बोलिल जे आम्ही कबिला घेऊन जातो, तुम्हीं कोणाच्या आधार न बैसतां गुर ढोर गला गोटा असल तो घेऊन जाण. यैसी ताकीद केलियावर गावातील कुणबी व पाटील कुलकरणी यैसे पळून मुलकावर गेले. भिताड पाडली व लाकूड फाटा व गला नेहल. ते अवघी हकीकत तुकाजी गायेकवाड व धावजी संकपाल हे विनंती करता विदित सेवेसी होईल. नाहक बदलामी आम्हावर घातली आहे. आमच्या वतनाचा अभिमान साहेबास पूर्वीपासोन आहे. मुकासी तो आमच्या बरियावर आहेत. परंतु घोरपडियाकडे

---

१ मिरज.

कमावीस जाहल्यातागायेत हरयेक बात्र गैरती येकोन साहेबाजवल विक्षेप पडाव-याचे वर्तमान विदित करतात. यात आपण धणी आसा. मनेराजुरीचे मुकामी राजेश्री नारायेणराव घोरपड्यास व मिरजकर यास साहेबी ताकीदपत्र पाठविली की देसमुखाच्या अमलास तुम्ही खलेल न करण. तुम्हीं उठोन मिरज प्रांतांतून जाण. त्यास त्यानी माने केले न हे साहेबास ठावक आहे, तेथ विस्तार काये ल्याहावे ? मिरज प्रांतीचे मुकासी घोरपड्यास सामील जाहल्यावर आम्ही कोणापासी सांगाव? आंजनीचा जागा आपण पूर्वीपासून स्थापना करून ठेवल्यावर तेथ राहून कालहरण करीत राहिलो आसो. येथहि मुकासी उपद्रव करू लागल्यावर आम्ही कोठे जावे, हे आज्ञा करणार खावंद मायबाप आसा. मिरजहून बाहेर घालविले आम्हास, घोरपडियाचा कारकून जाऊन मिरजेस बैसला आहे. जे स्तली आम्ही राहिलो ते जागा घोरपडियाची कमावीस गावास आल्यावर मग येथ कैसे राहणा-रानी राहव ? यामुले आमची फिराद साहेबापावतो आली. याचे निवारण करणार खावंद आसा. यैसा कसाला आम्हावर असता साहेबी मसाला रुा १० दाहा केला तो तुकोजी गायकवाड व धावजी संकपाल यास दिल्हे. उर्जित करणार धणी समर्थ असा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Tamaji, Deshmukh of Miraj, complains against Narayanrao Ghorpade of Ichalkaranji for trying to oust him from his Deshmukhi vatan and seeks redress.*

---

*No. 234]* *[20-1-1753 ?*

पाा छ ६ रबिलाखर

**श्री**

**तीर्थस्वरुप राजमान्ये राजश्री मामा अमात्य**
**हुकमतपन्हा: वडिलाचे सेवेसी**

अपत्येसमान मनाबाई सरदेसाई प्राा कुडाल व माहालानिहाये दंडवत विनंती. येथील कुशल पौष्य वाा प्रतिपदापर्यंत येथास्थित जाणून स्वकीये कुशल लेख-नाज्ञा करावया वडील असा विशेष. आलीकडे बहुत दिवस वडिलाकडून असीरवादपत्र येऊन परामर्श न जाहला. कायेनिमित्य निस्टुरता केली न कले. अमाठाई वडिलाची पूर्वापार माया ममता निसीम असोन पत्रास अभाव न व्हावा असा चिताचा निशा आहे. याउपर आपणाकडील सविस्तर वर्तमान असीरवाद-पत्री लेखन करून चितास हर्श होये ते करावया वडील असा. यानतरे आमा-कडील वर्तमान तर सकल सौभाग्यादिसंपन्न मातोश्री मानुबाई मामी घोरपडी व

आमची भावजई गंगाभागीर्थी जयंतीबाई निंबालकर गजेंद्रगडी आहेत त्याच्या आमच्या दर्शनास बहुत दिवस जाहले, त्यास्तव सोभाग्येवती मामी व पुण्यसील जयेंतीबाई यानी पत्रे व पालखी पाठविली, यास्तव चिरंजीव राजश्री उभयेताचा निरोप घेऊन जेस्टमासी गजेद्रगडास जावयास गेलो. च्यार पाच मास तेथे होतो. तीर्थरुप राजश्री मामा ममलकतमदार मडकसिरेस आहेत. चिरंजीव राजश्री मुरारराऊ घोरपडे त्रितनापली प्रांती आहेत. फौजहि भारी आहे. ते प्रांती चिरंजीव राजश्री मुरारराऊ याचा आक्रमहि बराच आहे. चिरंजीव राजश्री दौलतराऊ व चिरंजीव राजश्री धारराऊ निंबालकर गजेद्रगडी आहेत. गजेद्रगडीहून निरोप घेऊन मार्गसीर्ष मासी निघोन आलो. प्रस्तुत बेरेस मुकाम आहे. चिरंजीव आपा वाडीस होते, त्यास देवपणाचे पुर्तेस्तव येथे आणविले. त्याच्या शेरीरसमाधाविसी मागा वडिलास लिहिले होते त्यास वडिलाचे उतर आले की खानविलकर याचेथे मुली आहेत. त्यास वडिलानी चितास आणून शेरीरसमधाचा निछये मनास आणून उतर पाठवावया वडील असा. वरकड सविस्तर वर्तमान व्रो मूर्ती राजश्री गोविंदभट मुक्ती[1] सांगता विदित होईल. सक्रमणाचे तिलसर्करा पाठविले आहे पावेल. याचे उतर पाठवावया वडील असा. बहूत काय लिहिणे? क्रुपा असो दिली पाहिजे हे विनंती.

¶*Manabai Sardesai to Mama Amatya of Bawada giving news of various events. The letter contains many names of persons of various families of local importance.*

---

*No. 235*] [*5-2-1755?*

छ १ जमादिलोवल

**श्री**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

आज्ञाधारक आनंदराव गिरिधर कृतानेक त्रिकालीं साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ २३ माहे रबिलाखरपावेतो स्वामीचे कृपाकटाक्षें सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशे(ष). श्रीमंत महाराज व सौ बाईसाहेबाचा मोकाम वडगांव सिरोळ्या जिलेंतच आहे. दोन च्यार रोजांत करवीरास स्वारी होईल. व मल्हार गोविंद सुंदराबाईच्या शोधास्तव बावडेस आले होते. तेथें सुंदराबाई नाहींत, याकरितां मागारे गेले, म्हणून येथें वर्तमान आलें. सुंदराबाईस कैलासवास होऊन आठरा वरसें जाली. लटका षोध मल्हार गोविंद याच्या बोलण्यावरून

---

१ मुखता, मुखानें.

होतो, ऐसें माहाराज व सौ बाई बोलत होते. कागलकरानें फार घोखी आरंभिली आहे. श्रीमंत मातुश्री अनुबाईकडे आश्रय केला आहे. इचलकरंजीहून मातुश्रीस मदतेस राऊत व हशम पाठऊन कागलकरास बळ दिले आहे. मिर्जेहून राजश्री सिवाजीपंत इचलकंर्जीस जमावसुधां कागलकराचे मदतेस आले आहेत. सुतरनाळा व भांडी व जेजाला आणिल्या आहेत. व मातुश्रीकडील व मिर्जे-कडील जमाव अवांतर जमाव मेळऊन चिकोडीकराच्या राज्यांत उपद्वाप करण. * * * कागल कोलापूरची सीवसेजार; तेव्हां या जिलेतहि उपसर्ग, याकरितां उपसर्ग यांस करणेविसीं श्रीमंताची आज्ञा आहे किंवा आपल्याच मतें करितात हे नकळे, म्हणून सौ बाईसाहेब आजुर्दी आहेत. आजपावेतों सरदेश-मुखी व बाबतीविसीं वडगाव आळते सिरोळ या प्रांतीं मातुश्री अनुबाईकडोन उपसर्ग होऊन खेडी उठोन जात असतां तो प्रसंग श्रीमंताच्या मर्जीवरी दृष्टि देऊन सोसोन वडगावचे मोकामने सविस्तर श्रीमंतास लेहून पाठविलाच होता. सांप्रत कागलकराचा साभिमान धरोन रा। सिवाजीपंत देखील मिळोन चिकोडी व आमच्या जिलेत उपद्वाप करितात, याचा अर्थ काय म्हणून सेवकास बोलाऊन विचारलें. हा मजकूर पेशव्यांस दखल आहे कीं नाहीं? स्वमतेच करितात? कागलकर श्रीमंताची आज्ञा उलंघोन मवास[१] जाला असतां यांनी कागलकराचें पारपत्य करावें असे असतां, मवासाचा साभिमान धरोन धन्याच्या खासगीत उपसर्ग करणे हेच श्रीमंताच्या प्रत्यास येत असेल, किंवा आज्ञा असेल, म्हणून सेवका-समक्ष बोलत होती. आजपावेतों श्रीमंतावरील भिडेनें इचलकंर्जीकराचा उपसर्ग सोसला. यावरी सोसत नाहीं. तुम्ही खावंदास लेहून पाठवणे, म्हणून आज्ञा केली. चिकोडीकरापासून मातुश्री अनुबाई एकदोन खेडीं मागतात आणि राजश्री तात्याकडे मदतेस जमावहि पाठवणेविसीं तगादा लाविला आहे. कागलकरा-कडोन दोन खेडी कबूल करऊन साभिमान धरिला आहे. बावडेकर राजश्री कृष्णरायाकडे (अपूर्ण)

¶*Anandrao Giridhar writes to the Peshwa that Jijabai and Sambhaji have been staying at Vadgaon for some time and adds that Jijabai was enquiring whether it was at the instance of the Peshwa that Kagalkar was raiding the adjoining territory with the assistance of Anubai of Ichalkaranji, or whether he was doing it of his own accord.*

---

१ बंडखोर.

